## शिबिरांची अुपयोगिता

आज पासून शिबिराचे कार्य सुरू होत आहे, आणि तसे मीं जाहीर करावें अशी तुमची अिच्छा आहे.

आपल्या विचार-प्रचाराचीं जीं काहीं साधने आहेत, त्यात कदाचित् हे शिबिराचे साधन पुष्कळ च अुपयोगी ठरलें आहे. जरी पुष्कळशा शिबिरास मी गेलेलों नाहीं तरी जितके पाहू शकलो तेवढ्यावरून म्हणू शकतो की हे अेक यशस्वी साधन आहे. यात दुसरे काही नाहीं मिळालें तरी अेक तऱ्हेचा सत्सग मिळतो ही च दृष्टि तुम्ही ठेवावी, असे मी अिच्छितों. आपण अिथे आलो ते सत्सगाच्या अुत्कंठेने च आलो आहो. पुष्कळाचा अनुभव आहे की अेक क्षणाचा हि सत्सग लाभल्यास आणि भगवत्-कृपेने आपले चित्ताचे दरवाजे मोकळे असल्यास त्याची मात्रा बरोबर लागू पडते आणि आपलें सगळे जीवन च पालटून जाते. ह्या जुन्या काळच्या गोष्टी नव्हत. ह्या काळात हि याचा प्रत्यय आलेला आहे

ज्या स्थानी आपण जमलो आहो ते अेक महान् स्थान आहे. आणि आपल्या शिबिरासाठीं जेव्हा अशीं स्थाने लाभतात तेव्हा ते शिबिर दुप्पट लाभदायक होते. ह्या स्थानाच्या पाठीमागें अेक अितिहास आहे. हे स्थान म्हणजे अिथलीं झाडें किंवा अिथली जमीन महान् आहे असा माझा अर्थ नाहीं. तशी कोणी भावना केली तर तसा हि अर्थ होअू शकतो पण ते माझें अभिप्रेत नाहीं. अिथे कैक वर्षांपासून आश्रम चालला आहे, आणि त्या दृष्टीने मी बोलत आहे. आता

जुगतराम भाअींनी जरी नम्रता-पूर्वक सांगितलें की अिथें काही पूर्ण सिद्धि पहायला मिळणार नाही आणि मी मानतों की त्याचें हे कथन केवळ नम्र नाहीं तर यथार्थ आहे, तरी तुम्हाला अिथें चांगला सत्संग लाभेल आणि त्या च दृष्टीने तुम्ही पहावें असे मी म्हणेन.

अशा शिबिरात दुसरी गोष्ट होअू शकते ती म्हणजे आपल्या शक्तीचे भान अिथें येता च तुम्हाला तसें भान झालें असेल आणि पधरा दिवसानंतर ते पक्कें होअील, असें मी मानतों. पुष्कळ कार्यकर्ते ठिकठिकाणीं पांगलेलें काम करीत आहेत. त्याना आपल्या कामातून स्फूर्ति अवश्य मिळते आणि आपल्या आसपासच्या वातावरणाला जे आपल्या स्फूर्तीनें प्रभावित करूं शकतात ते या वातावरणाचा आपल्या मनावर परिणाम हि होअू देत नाहींत आणि आपल्या अेकट्याच्या स्फूर्तीने काम करीत राहतात पण हें काम जरा कठिण आहे, जरी तशी हिंमत आपल्या ठिकाणीं असली पाहिजे पण अेक-अेकटे काम करणारे जेव्हा अशा आश्रम-भूमींत अेकत्र होतात तेव्हा त्याना समुदाय शक्तीचे दर्शन होते. आपण जें काम करीत असू ते कितीं हि लहान का असेना, पण अशीं सारीं लहानें जेव्हा अेकत्र गोळा होतात तेव्हा आपल्याला अेक मोठी वस्तु भेटत आहे असा आभास समुदायात येतो अशा तऱ्हेच्या दर्शनाची साधकाला गरज असते गीतेत आपल्याला हे च दिसून येते सगळी गीता अेकीकडे ठेवा आणि विश्वरूप-दर्शन दुसरीकडे विश्वरूप दर्शन वगळून बाकीची गीता वाचा जरी बाकीच्या अध्यायातून कमी स्फूर्ति मिळत नाहीं, तरी विश्वरूप-दर्शनाने जो शक्ति-संचार अर्जुनाच्या हृदयात झाला तो वगळल्यास बाकीच्या गीतेचा तो अनुभव येअू शकत नाही जो विश्वरूप दर्शनाने अर्जुनास आला

तसें विश्वरूप-दर्शन अिथें होतें. विश्वरूप-दर्शनाहून हि थोर स्वरूप-दर्शन आहे असें मीं पुष्कळदा म्हटलें आहे. पण तें अेकदम होत नाहीं. जर झालें तर कुठल्या हि बाह्य पुष्टीची गरज च राहणार नाहीं. जोंपर्यंत तसें स्वरूप दर्शन होत नाहीं, तोंपर्यंत सामुदायिक शक्तीनें जें बळ मिळतें त्याची अुपेक्षा करता कामा नये. आपल्या अेकट्याच्या च शक्तीनें काम भागेल असें मानता कामा नये, जरी त्यावर विश्वास जरूर असला पाहिजे. तथापि त्या बरोबर च नम्रता हि असली पाहिजे. म्हणजे विश्व-शक्तीचा हि लाभ आपल्याला होतो. आपण शिबिरात येतों तेव्हा आपल्याला तसा लाभ होतो. अीश्वरानें केवळ आपल्याला च प्रेरणा दिली आहे, अथवा केवळ आपल्याला च तो कृपा पाहतो आहे आणि बाकीच्या जगाला त्यानें स्फूर्ति दिलेली नाहीं असें नाहीं. अितरांवर अीश्वरानें कृपा केली आहे आपण भक्त-गण आहोंत, तो गण-पति आहे. आपण अेकटे नाहीं, विश्व-शक्ति आपल्या बरोबर आहे, अशा प्रकारचें काहीं दर्शन असल्या शिबिरातून होतें. ज्याला कल्पना-शक्ति आहे तो असल्या शिबिरात आल्या शिवाय देखील ही गोष्ट समजूं शकतो आणि तशी मी समजून घेतों. पण जेव्हा आपण प्रत्यक्ष समुदायात बसतो तेव्हा अेक असामान्य दर्शन होतें. अशा प्रकारच्या दर्शना साठीं जर कुठें दूर प्रवासास जावें लागलें तरी मी जाअीन. किती सुंदर असतें ते दर्शन, जेव्हा आपण सगळे कर्ममय, परिश्रममय अुपासनेला अेकत्र बसतो ज्यात वाणीच्या अैवजी वृत्तीचा च अुपयोग होतो! वृत्ति वाणीहून विशेष आहे. वाणीनें प्रार्थना करता येत नाहीं अशी हि स्थिति माणसाला येअू शकते. कितीकांना देवानें वाणी च दिलेली नसेल. संगीत हि लोकांना कमी येत असेल. स्पष्ट

अुच्चार हि सर्वांना साधत नसतील. पण प्रत्यक्ष कृतीने अुपासना पुष्कळ लोक सुलभतेने करू शकतात. म्हणून कृतिमय प्रार्थनेत आपण अेकत्र झालों तर सगळा भेद भाव दूर होतो. या दृष्टीचा अनुभव जर तुम्ही पधरा दिवसात घेतला, हा अेक अमृत-बिंदु जर तुम्हीं आपल्या हृदय-सपुटात साठवला, आणि दुसरें काहीं ग्रहण केलें नाहीं तरी मी म्हणेन तुमचे काम झालें. हा अेक महान् मत्र आहे, आणि तो तत्र-युक्त हि आहे. प्रत्यक्ष क्रियेच्या द्वारें निर्मिति करणे हे तंत्र होय. जिथें आतरिक भावना असते आणि प्रत्यक्ष निर्मिति हि होत असते तिथें मत्र आणि तत्र दोहोंचा मिलाफ होतो. असा मिलाफ तुम्ही अिथून घेअून जाल तर शिबिराचा अुत्तम अुपयोग होअील.

ही अेक स्फूर्तिदायी कल्पना गाधीजींनी आपल्याला दिली अेकोणिसाव्या आणि विसाव्या शतकात तशी कुणी च दिलेली नाहीं. या दोन शतकाचा अुल्लेख मीं अेवढ्यासाठी केला की अिंग्रजाच्या आगमनानतर अुत्थानाची कल्पना आम्हाला ज्यानी दिली ते सगळे अेकोणिसाव्या आणि विसाव्या शतकात होअून गेले आहेत. त्या सर्वांच्या कल्पनेपेक्षा ही वरचढ कल्पना आहे. दरेकाने अीश्वराची अुपासना परिश्रमाच्या द्वारा केली पाहिजे. या कल्पनेने देशाचे कल्याण झालें आहे गरीबाशी अनुसधान झाले आहे. श्रम-निष्ठा वाढली आहे आणि अीश्वराची खरी सेवा यात आहे मी आपल्या समाजवादी मित्राना पुष्कळदा विचारतों कीं काय या पेक्षा अधिक स्फूर्तिदायी कल्पना तुम्हा अेखादी दाखवू शकता ? आणि जर नाहीं दाखवूं शकत तर हिचा प्रचार का करीत नाहीं ? तेव्हा ते म्हणतात की ही कल्पना जरूर स्फूर्तिदायी आहे, पण काळ त्या कार्याला अनुकूल नाहीं. हे

यत्र-युग आलें आहे आणि आपल्याला जें काहीं करायचे आहे ते सारें या यत्र-युगाला धरून केलें पाहिजे. तुम्ही अेखादा असा श्रम काढला कीं जो यत्रानें होत नाहीं हातानें च होतो तर चागलें होओल चरख्याचें काम तर गिरणीने हि होते. म्हणून काळ चरख्याच्या विरुद्ध आहे. तर मग तुमचे चरख्याचे काम कसे चालणार ? मी अुत्तर देतों —बाबा, काळ विरुद्ध पाहतो म्हणून मला विशेष स्फूर्ति होते. कारण माझ्या विचाराच्या विरुद्ध अेक वस्तु अुभी आहे. समोर जर पोकळ आकाश असेल तर त्याला काठी घेअुन मारण्याची अिच्छा होत नाहीं. पण अेखादी भरीव वस्तु समोर असेल तर तिला टक्कर देण्याची अिच्छा होते तसे माझ्या विचाराच्या विरुद्ध दुसरी वस्तु अुभी आहे—जिला यत्र-युग म्हणतात—म्हणून मला विशेष अुत्साह वाटतो

आणखी अेक तिसरी गोष्ट अिथें व्हायला पाहिजे काहीं ज्ञान हि अिथें मिळायला पाहिजे कर्मयोग्याला ज्ञान हि पाहिजे ज्ञानाशिवायचे कर्मयोगी आजकाल दिसून येतात ते म्हणतात—आम्ही कर्मात मग्न आहोंत, ज्ञानाचे काय गौरव गाता ! मी त्याना म्हणतों ज्ञान-प्राप्ति तर तुमचा अधिकार आहे त्या अधिकाराची तुम्ही किंमत न कराल तर कसे चालेल ! जे काम करणारे आहेत ते ज्ञानाची कदर करीत नाहींत, आणि जे ज्ञान बाळगतात ते निरुद्योगी आहेत परिणाम हा झाला आहे कीं जे ज्ञानाचे अधिकारी नाहींत त्याच्याजवळ तें पडलें आहे, आणि जे ज्ञानाचे खरे अुपासक आहेत ते त्यापासून अलिप्त राहिले आहेत. कर्म ज्ञान-विरहित झाल्यास तें निरुपयोगी बनतें, आणि ज्ञान कर्म-हीन झाल्यास तें नि सत्त्व होतें म्हणून दोहोंचा योग साधला पाहिजे. अेवढ्यासाठीं कार्यकर्त्यांना स्वाध्याय-चिंतन आदि निरतर करीत राहिलें

पाहिजे आजवर ते झालें नाही तर ते म्हणू शकतात कीं आम्ही स्वराज्य संपादनाच्या कामात होतों म्हणून आम्हाला ज्ञान संपादनास अवकाश मिळाला नाही असा बचाव ते करू शकतात, जरी तसा बचाव करण्याची मला अिच्छा होणार नाहीं कारण ज्याला ज्ञानाच्या शक्तीची ओळख आहे, तो असा युक्तिवाद करणार नाहीं आपण कुठें असें म्हणतों कीं, स्वराज्य संपादनाचा अेक तीव्र कार्यक्रम आमच्या पुढें होता म्हणून पुष्कळ दिवस झाले खाल्लें हि नाहीं ? कारण, आपल्याला जाणीव आहे कीं खाणे शरीरासाठीं फार आवश्यक आहे खाल्ल्यावाचून शरीर काम करू शकत नाहीं तसे च मी म्हणतों का ज्ञानावाचून आत्मा काम करू शकत नाहीं आपत्काळीं हि ज्ञानावाचून राहता कामा नये आजवर झालें ते झालें पण आता आपल्या पक्क्या विचारावर आपलें काम अुभारलें पाहिजे

अशा प्रकारें संसगति, सामुदायिक पारश्रमात्मक अुपासना आणि ज्ञान प्राप्ति जर आपल्याला अिथून लाभली तर आज काळाचा जो विरुद्ध प्रवाह आपल्याला दिसून येत आहे, त्याच्याशी लढायची आपल्यात शक्ति येअील अितक्या गोष्टी तुम्ही अिथून घेअून जाल तर हे शिबिर फार अुपयुक्त ठरेल

---

(२)

## सकाळी लवकर अुठण्याचा लाभ

आपल्या जीवनाचा जी बाह्य अंगें आहेत त्यांपैकीं अेकाबाबत बोलायचा विचार आहे तशीं हीं अंगें जरी बाह्य असलीं तरी त्याचा

अतरार्शी हि पुष्कळ संबंध आहे. आणि आज ज्या बाबत बोलायचें आहे त्याचा तर तसा खास संबंध आहे. ती गोष्ट म्हणजे सकाळीं लवकर अुठणे.

सकाळीं लवकर अुठून अीश्वराचें स्मरण करण्याची रीत सगळ्या जगात आहे. आणि तशीं काहीं भजनें हि रचिलीं आहेत. आज जें हिंदी भजन गाण्यात आलें ते हि त्या बाबतचें च आहे तथापि गुजरार्थीत नरसी मेहत्याचीं या विषयीं रचलेलीं जीं भजनें आहेत तीं गुजराथची विशेषता आहे. आपल्या विशेषतेचें भान प्राय होत नाहीं. पण ज्याची दृष्टि व्यापक असते तो ती विशेषता ओळखू शकतो. आणि मीं पाहिलें आहे कीं पुष्कळ्या भाषाच्या साहित्यात असलीं भजनें आहेत. तथापि नरसी मेहत्याच्या प्रभात्या (भूपाळ्या) चें अेक खास स्थान आहे. त्याच्या अेका भजनात म्हटलें आहे

"पाछली खट घडी साधु पुरुषने सुअि न रहेवुं" शेवटच्या ज्या सहा घटका असतात, त्यात साधु पुरुषान झोपून राहू नये.

शेवटच्या सहा घटका म्हणजे सूर्योदयापूर्वीचे अडीच तास. आणि सामान्यत' सहा वाजता सूर्योदय होतो असे मानलें तर हा अुठायचा वेळ साडेतीन वाजता होतो. तमिळ साहित्यात अेके ठिकाणीं सहाच्या अैवजीं दहा घटका माझ्या वाचनात आलें आहे पण साधारणत सूर्योदयापूर्वी दोन घटकेचा काळ परमेश्वर-चिंतनाचा, ब्रह्म-चिंतनाचा असतो, असें स्मृतींचें हि वचन आहे. सर्व-साधारण लोक जिचें सहजपणे पालन करू शकतात अशी च गोष्ट स्मृति सागते. त्या दृष्टीनें सूर्योदयापूर्वी तीन घटका अुठलों तर अेक घटका शौचादिकांत जाते आणि अुरलेल्या दोन घटकात चिंतन होअू शकते. नरसी मेहता सहा घटका म्हणतो

आणि तमिळ लेखक दहा घटका म्हणतो याचें तात्पर्य हें च कीं सकाळचा जितका अधिकात-अधिक काळ आत्म-चिंतनात देता येईल तितका द्यावा.

बापूजींनी यावर फार भर दिला होता हे तुम्हाला माहीत आहे. सध्या आश्रमात अुठायची वेळ चार वाजताची आहे पण हे सर्व लोकांवर दया करून बापूजींनी कबूल केलें आहे. पूर्वी तर चार वाजता प्रार्थना सुरू होअून जात असे, आणि अुठायची घंटा ३-४० ला होत असे. आश्रमात मुलें आणि स्त्रिया हि असत आणि त्या सर्वांनी प्रार्थनेत हजर राहिलें पाहिजे असा बापूजींचा आग्रह असे. तेव्हा स्त्रियांची नेहमीं तक्रार असायची कीं मुलांची झोप पूर्ण होत नाहीं. आणि त्यांची तक्रार खरी होती. यावर पुष्कळ चर्चा झाली. पण दहा-बारा वर्षें तर बापूनी अैकलें च नाहीं. शेवटीं वीस मिनिटांची कृपा केली हा अितिहास तुमच्यांपैकी कांहींना ठाअूक असेल.

बापू तर अलीकडे सकाळीं दोन वाजता च अुठत असत, आणि पुष्कळसें काम सकाळा च करून टाकीत गीतेच्या दुसऱ्या अध्यायात स्थितप्रज्ञाच्या लक्षणाचे जे श्लोक आहेत त्यात अेक श्लोक असा आहे कीं "योगी म्हणजे परमेश्वराचा भक्त, दुसरे लोक जेव्हा झोपून असतात तेव्हा तो जागत असतो आणि दुसरे लोक जेव्हा जागत असतात तेव्हा तो झोंपून असतो" हें वाक्य काल-दर्शक नसून अवस्था दर्शक आहे. लोक फल-प्राप्ति आदि ज्या विषयात जागृत राहतात त्या विषयात योगी निश्चिंत राहतो आणि परमेश्वराची भक्ति, जन-सेवा आदि ज्या गोष्टींची चिंता दुसरे लोक करीत नाहींत त्या विषयात तो जागृत राहतो, हा त्याचा भावार्थ आहे आणि बापूनी हि तो घेतला आहे, तरी

त्याचा अक्षरार्थ घेण्याचा प्रयत्न केला आहे तो अर्थ हा की ससारी लोक विलासादिकात रात्रीं पुष्कळ वेळपर्यंत जागत राहतात आणि सकाळीं झोंपत असतात. अुलट भक्त रात्रा लवकर झोंपीं जातो आणि सकाळीं लवकर अुठून परमेश्वराचे भजन करतो पण त्या वाक्याचा असा अक्षरार्थ घेण्याची गरज नाहीं. तरी बापूनीं तो घेतला आहे हें त्याच्या अक्षरासक्तीचे लक्षण नव्हे, तर कुशल बुद्धीचे लक्षण होय.

सताच्या वाक्तींत आपण अैकतो कीं ते रात्रा परमेश्वराचे भजन करीत आणि दिवसा काम करीत रात्र विश्रातीसाठीं आहे आणि दिवस अुद्योगासाठीं आहे असे मानलें जाते आणि बोललें जाते. पण भक्ताला रात्र ध्यान-चिंतनादिकासाठीं असते आणि दिवस सेवाकार्यासाठीं. जे लोक प्रार्थनेचें अतिम कार्य करून झोपून जातात ते प्रार्थनेच्या नादात झोंपीं जातात त्यामुळे त्याची झोप निर्दोष, नि स्वप्न आणि विचार-विकासपर होते, असा अनुभव आला आहे. आपण बी शेतात पेरतों आणि मातीनें ते झाकून देतो आता बी चें काय होअून राहिलें आहे हें जरी वरून दिसत नाहीं तरी ते पडून राहत नाहीं तर त्याचा विकास होत असतो. हे तर जेव्हा त्यातून अकुर बाहेर पडतो तेव्हा आपल्याला दिसून येते. त्यापूर्वीचा विकास आपल्या दृष्टीला दिसून न येवो, पण होतो अवश्य त्याप्रमाणे जेव्हा आपण प्रार्थनेत चिंतन-बीज पेरून झोंपीं जातों तेव्हा झोंप मातीचे कार्य करते. आपल्याला पत्ता लागत नाहीं तरी अशा झोंपेंत विचाराचा विकास होत राहतो याचा अनुभव मी घेतला आहे निर्दोष निद्रेला समाधि हि म्हणतात सकाळीं अुठून अध्ययन केल्यास दिवसभर चिंतनाची सुदर प्रेरणा मिळते, सेवा अुत्तम होते, विकार-शमन होते. प्रतिभावान् कवींनी जितकें लिहिलें आहे

ते पुष्कळसे सकाळीं च लिहिले आहे माझा हि अनुभव असा च आहे. सकाळच्या वेळेचा जर मी अुपयोग करू शकलों नसतों तर गीतेवर मीं जें काहीं लिहिलें आहे ते लिहू शकलों नसतों.

म्हणून तुम्हा या शिबिरात पधरा दिवस राहून जें काहीं घेअून जाल, त्यात सकाळीं अुठण्याची गोष्ट अवश्य घेअून जा जग तसें करीत नाहीं आणि रात्रीं अनेक कामें करण्याचा मोह धरते. पण तो मोह च आहे. त्या मोहापासून दूर राहून तुम्हीं रात्रीं लवकर झोंपण्याचा आणि सकाळी लवकर अुठून चिंतन करण्याचा अभ्यास करा त्याने लोक-सेवेचे नुकसान हाणारें नाहीं, पण लाभ च होणारा आहे त्याशिवाय शारीरिक आणि मानसिक—आध्यात्मिक लाभ तर होअील च.

---

## (३)

## कासवाचा दृष्टांत

आज दिवसभर तुम्ही पुष्कळ अैकलें आहे, म्हणून अधिक सागण्याचा माझा विचार नाहा. आता प्रार्थनेनंतर चिंतनासाठीं अेक श्लोक देण्यात आला आहे आणि सर्वांनी मौन-पूर्वक त्याचे थोडा वेळ चिंतन करावें अशी सूचना देण्यात आली आहे. मला ही पद्धति आवडली. चिंतनासाठीं जो श्लोक देण्यात आला आहे त्याचे थोडे प्रकट चिंतन करतों

हा श्लोक गीतेतील आहे त्यात अिंद्रिय-सयमाचे शिक्षण देण्यात आलें आहे. आणि त्यासाठा कासवाचा दृष्टात दिला आहे. कवि काव्यात

रस निर्माण करण्यासाठीं दृष्टान्त अुपमा आदि देतात. पण तशी गीतेची पद्धति नाहीं. गीता दृष्टांत देते तेव्हा चिंतनासाठीं देते. आणि तो देखील फार कजूसपणे. जितके दृष्टांत गीतेत दिले आहेत ते सारे ध्यानयोगासाठीं दिले आहेत. आणि तसे च ते ख्याति पावले आहेत. अेकाग्र ध्यानासाठीं दिव्याचा दृष्टांत, अलिप्ततेसाठीं कमल-पत्राचा दृष्टांत, तसा अिंद्रिय-संयमासाठीं हा कासवाचा दृष्टांत आहे. तुमच्यापैकीं पुष्कळांनीं पाहिलें असेल कीं मंदिरात कासवाची प्रतिमा असते. कासव ज्याप्रमाणे आपले अवयव आवरून घेतो त्याप्रमाणे विषयापासून अिंद्रियांना आपण आवरून घेतल्यास भले होतें हें त्याचे तात्पर्य. हा अेक परिपूर्ण दृष्टांत आहे. पण त्याच्या अक्षरात अेक च भाग दाखविला आहे. आपण भाव-चिंतन करीत असताना त्या भागाला पूर्ण करून समजून घ्यायला पाहिजे.

कासव आपले अवयव नेहमीं आवरून घेत नाहीं. पण भयाच्या प्रसंगीं आवरून घेतो. आणि तसे भय नसेल तेव्हा ते पसरून त्याच्यापासून काम घेतो. तसें च आपल्या अिंद्रियांबाबत समजावयाचें. अिंद्रियांना नेहमीं आत ओढून घ्यायचें नाहीं. तीं तर वस्तुत आत्म्याच्या शक्ति होत त्यांच्या साहाय्यानें च आत्मा देहात सेवा, भजन अित्यादि करू शकतो. अिंद्रिय शब्दाच्या अर्थापासून च ही सूचना मिळते. अिंद्रिय म्हणजे अिंद्राची शक्ति आणि अिंद्र म्हणजे आत्मा. अिंद्रियें आत्म्याच्या साधक शक्ति होत, बाधक नव्हेत. समजा आपण घरात आणि घराचीं सारीं दारें आणि खिडक्या बंद केल्या तर आपण त्या घरात कोंडलों गेलों, कैद झालों, असें म्हटलें जाअील देहात अिंद्रियें नसतीं तर आत्म्याची तशी च स्थिति होती अिंद्रिये देहरूपी

घराचे दरवाजे होत. त्यांच्या वाटे आत्म्याला प्रकाश मिळतो, आणि तो काम करूं शकतो.

म्हणून कूर्माच्या दृष्टांताचा अर्थ हा समजला पाहिजे कीं अिंद्रियांवर जेव्हां विषयांचें आक्रमण होत असेल तेव्हां भयाचा प्रसंग ओळखून त्यांना आंत ओढून घ्यावें आणि तसें भय जेव्हां नसेल तेव्हां त्यांचा अुपयोग करावा. अिंद्रियांचा अुपयोग करण्याचे हि दोन प्रकार आहेत. अेक, मोकळेपणानें निर्भयतापूर्वक अुपयोग करणें. आणि दोन संकोचानें संयमपूर्वक अुपयोग करणें. आणि भयाच्या प्रसंगीं तर त्यांना आंत ओढून घेअून त्यांचा अुपयोग च करावयाचा नाहीं. कानावर वाअीट गोष्ट येअूं लागली तर भयाचा प्रसंग ओळखून कानाला आंत ओढून घेतलें पाहिजे, आणि त्या विषयाला च बंद करून टाकलें पाहिजे. व्यवहारांत हितकारक श्रवणाचा प्रसंग आला असतां कानाचा अुपयोग केला पाहिजे—पण सावधगिरीनें, संकोचानें, अंकुश राखून. गरजेहून अधिक अैकतां कामा नये. पण भगवंताचे गुण अैकण्याचा प्रसंग आला असतां मोकळेपणानें निर्भयता-पूर्वक अैकलें पाहिजे. अशा च प्रकारें जेव्हां वाणीनें भगवद्-नामाचा अुच्चार करावयाचा असतां अुदार-चित्त होअून वाणीचा अुपयोग केला पाहिजे. आणि असत्य हिंसक अथवा दुष्ट वचन वाणींतून बाहेर पडण्याचा जिथें संभव वाटत असेल तिथें वाणीला बंद च केलें पाहिजे.

अशा प्रकारें तीन तऱ्हेनें अिंद्रिय-संयम पूर्ण होतो. आणि तिहींची गरज असते. कूर्माच्या दृष्टांतावरून या तिहींचा आपल्याला बोध मिळतो.

---

(४)

## वेळेचें भान

काल आपण आश्रम-जीवनांतील अेक महत्त्वाची गोष्ट पाहिली. आज तशा च अेका दुसऱ्या गोष्टीचा विचार करूं.

आश्रम पहायला जो कोणी येतो त्याचें लक्ष अेका गोष्टीकडे ओढलें जातें. ती गोष्ट म्हणजे वेळेचें भान. आश्रमांत सर्व कामें नियमितपणें चालविलीं जातात. अितकें कीं प्रार्थनेसारखें भक्ति-कार्य हि जवळ घड्याळ ठेवून केलें जातें. भक्तिमार्गात या गोष्टीचें आतां पर्यंत थोडें हि भान नव्हतें. अितकें च नव्हे तर असें भान राखणें भक्तीला फारसें अनुकूल नाहीं अशी समजूत होती. पण ती समजूत चुकीची आहे. जसा अेखाद्या वस्तूचा कैफ असतो तसा संगीताचा अथवा भक्तीचा कैफ अनुभवणें हा कांहीं भक्तीचा अर्थ नव्हे. आणि तसा अर्थ करतां हि कामा नये. तें तर चित्त-शुद्धीचें अेक महान् साधन आहे. आणि ज्याप्रमाणें आहार, जो अेक नित्य सेवन करायची वस्तु आहे, नियमित पाहिजे त्याप्रमाणें ज्या नित्य करायच्या वस्तु आहेत त्या बाबत हि नियमितपणा असला पाहिजे. त्याप्रमाणें भक्ती बाबत हि व्हायला पाहिजे. अेवढें खरें कीं असा अेखादा महान् भगवद्-भक्त असूं शकतो की ज्याला या सगळ्या गोष्टींचा विसर पडूं शकतो. पण त्याला भक्ति-मार्ग म्हणतां येणार नाहीं. मार्ग म्हणून तर भक्तींत हि नियमितपणा असला पाहिजे.

जागें, झोपणें आदि तर सारें जग च करतें पण आश्रमांत ती सारीं कामें नियमितपणें होतात हा फरक आहे. त्यानें कर्मयोगाची

शक्ति वाढते. दिवसाच्या चोवीस तासांचा अुपयोग होतो आणि थकवा हि येत नाही. अनियमितपणानें काम कमी होतें, चागलें होत नाहीं, मनावर त्याचे ओझें राहतें—आणि शरीर हि थकून जाते. ह्या सर्व आपत्ति वेळेवर काम करण्याची संवय लावून घेतल्यानें टळतात. यांत अशी कोणती च गोष्ट नाहीं की जी कोणा सामान्य गृहस्थाच्या घरीं होअू शकत नाहीं. तीथें हि भोजनाचा अेक निश्चित वेळ राखता येतो. पण ती गोष्ट सुचत च नाहीं. त्यामुळे अनियमितपणा चालतो. आणि अशा तऱ्हेचा अनियमितपणा गृहस्थाश्रमांत अपरिहार्य आहे; असें हि मानलें जातें. पण असें मानण्याचे काहीं कारण नाहीं. प्रत्येक गोष्टींत अपवाद असतात. तितका वाव ठेवल्यास शेतीचें काम देखील नियमित-पणे होअू शकते. शेतीचे अुदाहरण मीं अेवढ्यासाठीं दिलें कीं शेती पावसावर अवलंबून असते, म्हणून ती नियमितपणें होअू शकत नाहीं असे वाटते. वर्षांतून दहा-बारा दिवस अवश्य असे येतील की त्यामुळे त्या कामात अनियमितपणा येअील, पण तेवढे वगळल्यास शेतीच्या कामात देखील नियमितपणाचे पालन करता येते. पण गृहस्थाचा देखील अेक आश्रम असतो ह्याचे भान गृहस्थाला नसते. काहीं दिवस खूप काम करतील तर काहीं दिवस आळसात काढतील. वेळेचा काहीं हिशोब च नसतो. त्या अैवजीं काम आणि विश्रांति दोन्ही नियमित झाल्यास थकवा कमी येअील आणि काम हि अधिक होअील.

आपण पाहतों कीं आश्रमात आहार नियमित आणि नियत असतो. पौष्टिक तत्वाचा विचार करून आहार देण्यात येतो. आहारात गोडाची गरज वाटत असल्यास नियमितपणें गूळ हि दिला जातो. अुलट जगात मिष्टान्न खाण्याचे दिवस असतात. त्या दिवसांत अधिक

मिष्टान्न खाअून शरीराला लाभाअैवजीं अधिक हानि च होते. सणाचे दिवस म्हणजे आजारी पडण्याची तयारी च. पण नियमितपणा पाळल्यास हे सारे टळते आणि चोवीस तासात अितकें काम होअू शकतें की तेवढें करायला दुसऱ्याला दुप्पट वेळ लागेल काल सहज नारायण बरोबर महादेवभाअींच्या कामाबाबत बोलणे चालले होतें. महादेवभाअी अितके काम कसे करीत, असा प्रश्न पडला. पण ते अितकें काम करू शकत याचे कारण त्यानीं नियमितपणे काम करण्याची सवय लावून घेतली होती हें आहे. तरी त्याच्या कामाचे स्वरूप असें होते कीं थोडा-फार अनियामितपणा होअून जायचा. पण माझी अशी धारणा आहे कीं जर तेवढा हि अनियमितपणा त्यानीं होअूं दिला नसता तर ते अधिक काम करू शकले असते अर्थात् शरीर कदाचित् अधिक काळ काम देते जितक्या अशाने अनियमितपणा झाला तितक्या अशाने काम कमी झालें, असें हिशोब केल्यास आढळून येअील.

जीवनातील प्रत्येक क्रिया नियमित वेळेवर होअील अशी खात्री देता येत नाहीं. पण ज्या मुख्य क्रिया आहेत त्यात जर नियमितपणाचे भान आपण राखलें, तर अितर कामें जीं मधून मधून येत राहतात, रोज करायची नसतात, त्यात हि सहज नियमितपणा येअून जातो. झोपण्याची वेळ, अुठायची वेळ, जेवणाची वेळ, फिरायची वेळ निश्चित करून टाकली, आहार, अध्ययन, व्यायाम आदि जीं रोज करायचीं कामे आहेत त्याची वेळ जर निश्चित असली तर बाकीच्या कामाची वेळ सहज निश्चित होअून जाते, आणि कामाचा भार हि वाटत नाहीं. या बाबत बापूजी आपला अनुभव सागत होते. त्यानीं गीतेचा पदार्थ-कोष तयार केला होता. तसा कोष अितरानीं हि केला होता.

पण हे बापूना ठाऊक नव्हते मी जेव्हा त्याना हे सागितलें तेव्हा म्हणू लागले—"जी मेहनत केली ती काहीं व्यर्थ गेली नाहीं, तिचा मला लाभ च झाला आहे " पुढें सागू लागले की, "कोपासाठीं मी रोज वीस मिनिट देत असे दुसरीं कामें सोडून देऊन जर ह्या च कामा या मागें लागलों असतों तर कदाचित् हे लवकर झालें असते, असा कुणाला भास होऊ शकतो पण तो भास च आहे त्याला मनुष्य कंगाळून जाण्याचा हि फार संभव आहे 'अनासक्तियोग' हि मीं रोज अेक श्लोक लिहून पूर्ण केलें झोंपण्यापूर्वीं रोज लिहून च टाकीत होतों तसे न करतों तर कदाचित् ते काम पूर्ण झालें नसते " आता कोपाच्या कामाचें अुदाहरण ठीक आहे कारण तें यात्रिक काम आहे पण गीतेच्या अनुवादाचें हे अुदाहरण अनुकरणीय च आहे असें मी म्हणणार नाहीं कारण असलें विचारात्मक काम वेळ निश्चित करून अुत्तम होते च असं म्हणता येत नाहीं बापूच्या बाबतींत तें ठीक होतें त्याच्या जीवनात तें बसून गेलें होतें पण प्रतिभेच्या कामात अधिक वाट टेहावा लागतो आणि स्फूर्ति पाहून काम करावें लागतें तथापि असलीं विशेष कामें सोडून दिला तरी बाकीचीं सर्वसाधारण कामें जर नियमितपणे केलीं तर त्यात रस वाढतो ही अनुभवाची गोष्ट आहे



(५)

## बुद्धि स्वच्छ करा

आता आपण तुलसीदासजींची अेक चौपाअी गाअिली. तींत मला वाटते, बिभीषण रावणाला बोध देत आहे. तो सागतो आहे कीं प्रत्येकाच्या हृदयात सुमति आणि कुमति म्हणजे सद्‌बुद्धि आणि दुर्बुद्धि दोन्ही वास करीत असतात. त्यात सद्‌बुद्धि सपत्तिरूप असते आणि दुर्बुद्धि आपत्तिरूप असते. म्हणून दुर्बुद्धि सोडून सद्‌बुद्धिचा आश्रय करा, असे बिभीषण समजावून देत आहे.

तसा तर माणसाला आयुष्यात बाहेरून किती तरी सपदा आणि आपदा प्राप्त होत असतात. पण त्याच्या मुळाशीं जाअून पाहिले तर निश्चितपणे अनुभवास येते कीं सर्व सुखाचे मूळ सद्‌बुद्धि होय, सद्‌वासना होय म्हणून जे काहीं प्रयत्न आपण करतों त्याचा परिणाम जर चित्त-शुद्धि अथवा वासना-शुद्धि होत असेल आणि बुद्धि निर्मल होत असेल तर तो प्रयत्न सफळ झाला असे म्हटले पाहिजे. ती जर होत नसेल तर त्या प्रयत्नाचा बाह्य परिणाम कितीहि चागला दिसत असला तरी तो योग्य म्हणता येणार नाहीं. आत्म-कल्याणासाठीं अनेक ऋषींनीं आणि सतपुरुषानीं केलेल्या प्रार्थना प्रसिद्ध च आहेत. पण त्या सर्वात जी सर्वोत्तम मानली गेली आहे, ती आहे गायत्री-मत्र. परमेश्वरापासून त्यात सद्‌बुद्धिची मागणी करण्यात आली आहे. गायत्री मत्र बुद्धीवादी मत्र आहे. शेवटीं आपल्याजवळ जी निर्णय-शक्ति आहे ती बुद्धि आहे. तिच्या पलिकडे जो आहे तो अतर्यामी परमेश्वर आहे. तिथपर्यत पोंचायचें साधन देखील बुद्धि च आहे. म्हणून बुद्धि शुद्ध

करणे हे च सर्व साधनाचे सार आहे. कंदिलात आत वात जळत असते. पण वर काच असते. ती काच जर मळकी असेल तर प्रकाश स्वच्छ पडत नाहीं. तशी परमेश्वराची ज्योति प्रत्येकाच्या हृदयात तेवत आहे. पण बुद्धीरूपी काच स्वच्छ असेल तर त्या ज्योतीचा प्रकाश स्वच्छ पडेल नाहीं तर आत ज्योति असून हि बाहेर स्वच्छ प्रकाश प्रगट होणार नाहीं. गीतेत सर्वोत्तम आदर्श सांगितला आहे त्याचें नाव देखील स्थित-प्रज्ञ आहे. म्हणजे ज्याची बुद्धि स्थित झालेली आहे, निष्कप झालेली आहे. स्थितप्रज्ञाचे लक्षण हे च कीं तो सर्वोत्तम निर्णय देऊ शकतो. दुसऱ्या पुष्कळशा शक्ति असून हि निर्णयकारी शक्ति जर माणसाच्या ठायीं नसेल तर तो चुकीच्या मार्गाने जाईल; आणि त्याने नुकसान होईल असा संभव आहे. म्हणून निर्णय-शक्ति ही सर्वांत महत्त्वाची गोष्ट आहे ज्याच्या जवळ अचूक निर्णय-शक्ति असते ते समाजाला फार काम देतात ते उत्तम नेते होऊ शकतात. गुरुचे स्थान हि ते घेऊ शकतात आपली बुद्धि स्वच्छ झाल्यास असें गुरु-स्थान आपल्या ठायीं च आपल्याला प्राप्त होते. मग कुठें दुसरीकडे विचारायची गरज च राहात नाहीं. आतून निश्चित निर्णय मिळून जातो आपला निर्णय जर चुकीचा असला तर भावना चांगली असून हि ती निर्णयाची चूक नुकसान करू शकते. म्हणून बुद्धि शुद्ध केली पाहिजे.

एवढ्या साठीं गीतेने बुद्धीचें सात्विक, राजस आणि तामस असे तीन प्रकार केलें आहेत. बुद्धि तर प्राणिमात्रात असते पण तींत सात्विकतेबरोबर रजोगुण व तमोगुण याचे मिश्रण असेल तर ती बुद्धि योग्य निर्णय देण्याचें काम करू शकणार नाहीं. ' तमोगुणाचें मिश्रण असेल तर निर्णय विपरीत होईल. आणि रजोगुणाचें मिश्रण असल्यास

बुद्धि संशयांत पडेल. आणि संशय म्हणजे अनिर्णय. अर्थात विपर्यय व अनिर्णय दूर केले म्हणजे स्वच्छ निर्णय मिळतो. बुद्धींत रजोगुण व तमोगुण याचे जे अंश असतात ते च मुख्यत: दूर करण्याचा आपल्याला यत्न करायला पाहिजे.

कोणाची बुद्धि तीव्र असते, कोणाची मंद असते. पण बुद्धीची तीव्रता व मंदता ही खास महत्वाची बाब नव्हे. बुद्धि स्वच्छ असल्यास ती मंद असली तरी प्रकाश देईल व निर्णय देईल. बुद्धि तीव्र असली तरी तींत जर रजोगुणाचा वा तमोगुणाचा अंश मिसळला असेल तर ती चुकीचा निर्णय देईल. म्हणून बुद्धीची स्वच्छता ही च महत्वाची गोष्ट आहे. तशी स्वच्छता असून बुद्धि तीव्र असेल तर व्यापक क्षेत्रात काम करील आणि मंद असेल तर मर्यादित क्षेत्रात काम करील. पण दोन्ही निश्चित निर्णय अवश्य देतील. निश्चित निर्णय सात्विक बुद्धि च देऊं शकते. बुद्धि सात्विक बनविली तर मंद बुद्धि तीव्र बुद्धींत परिणत होऊं शकते. शेवटीं मंद बुद्धि नेहमींसाठीं मंद च राहण्याचें काहीं कारण नाहीं. ती देखील तीव्र बनविता येते पण त्यासाठीं आधीं बुद्धि शुध्द करण्याची गरज आहे. तेव्हा आत्म्याचा प्रकाश स्वच्छ मिळतो आणि तसा प्रकाश मिळाल्यानतर बुध्दि मंद न राहता तीव्र व व्यापक बनते. कारण ती आत्म्यात स्थिर होऊन जाते. आत्म्यात लीन झाल्यानतर बुध्दि जितकी व्यापक बनू शकते तितकी ती तन्हेतन्हेची ज्ञाने मिळवून हि होऊं शकत नाहीं. म्हणून बुद्धीच्या स्वच्छतेची चिंता बाळगली पाहिजे. आणि त्यासाठीं सर्वोत्तम साधन म्हणजे परमेश्वराची भक्ति होय. तो भक्ति-भाव राखू

तर भगवान् सांगतात—"ददामि बुद्धि-योगं तम्"—ज्ञान द्यायला मी बसलों आहे. आंतून च तें ज्ञान आपल्याला मिळून जाअील.

म्हणून या चौपाअींत जें सद्‌बुद्धि आणि दुर्बुद्धि यांचें विश्लेषण केलें आहे तें फार महत्वाचें आहे. आणि आपण ज्या शिबिर आदि प्रवृत्ति चालवितों त्यांची परीक्षा आपली बुद्धि स्वच्छ होते किंवा नाहीं या वरून च होतें.

---

## (६)

## परिश्रम आणि जीवन-विकास

आश्रम-जीवनाच्या ज्या वैशिष्ट्यांबाबत मला आज बोलायची अिच्छा होती तद्विषयक च आज गीतेचा अध्याय म्हटला गेला आहे. ते वैशिष्ट्य हें च कीं दिवसाचा मुख्य भाग कोणत्या-ना-कोणत्या परिश्रमांत, आणि शक्य तर शारीरिक परिश्रमांत, आपण घालवावा.

आम जनता तर निरंतर कर्म करीत च असते. त्या शिवाय अुत्पादन होत नाहीं आणि जीवन हि चालत नाहीं, हें सगळ्यांना ठाऊक आहे. तरी प्रयत्न हा च असतो कीं शक्य तितका तो परिश्रम टाळावा. त्यासाठीं कुठल्या तरी मार्गानें अधिक संग्रह करून परिश्रमातून मुक्त होअून जायचें अथवा कमींत-कमी परिश्रम करावा लागेल अशीं अुत्पादनाचीं साधनें शोधून काढायचीं. पहिला विचार व्यक्तिगत आहे. बौद्धिक कर्मानें आपल्यासाठीं अधिक संग्रह करून परिश्रमातून सुटावयाचें हा तो विचार आहे. आणि दुसरा सामाजिक आहे. त्यासाठीं

मनुष्य यंत्राच्या पाठीमागें लागला आहे मनुष्याला विसावा मिळावा अेवढच नव्हे तर शक्य झाल्यास त्याला काम च करावं लागू नये अथवा कमींतकमीं करावे लागावे अशी वासना त्यामागें आहे मनुष्याला संस्कार आणि जीवनाचा आनंद यासाठी फुरसत हि हवी, अशी हि त्यामागें कल्पना आहे मनुष्याचा जो काहीं विकास झाला आहे तो फुरसतीमुळें झाला आहे, अशी हि दृष्टि त्यात आहे

या दोहोंत पहिला विचार व्यक्तिगत आणि सर्वार्थी म्हटला जाअील म्हणून त्याबावत खास विचार करण्याचें कारण नाहीं पण हा दुसरा विचार सगळ्या समाजाकडे लक्ष देतो त्यात नुसता स्वार्थ नाहीं त्यात दृष्टि ही आहे कीं कर्मयोगात माणसाला कमी वेळ द्यावा लागला तर फुरसतीच्या वेळीं तो जीवनाचा विकास करू शकेल साहित्याचा, धर्माचा, वा कारागिरीचा जितका काहीं विकास झाला आहे, तो सारा फुरसतीमुळे च झाला आहे, असं त्याचें म्हणणे आहे पण ही दृष्टि आश्रमात आम्ही स्वीकारलेली नाहीं माणसाला फुरसतीची गरज च नाहीं असें तर मानलें नाहीं, पण ती फुरसत कर्मयोगातून च मिळावी असे कल्पिलें आहे अेका च कामानं माणसाच्या जीवनाच्या अेका च अंगाचा विकास होतो ते च काम आयुष्यभर तो करत राहिल्यास जीवन अेकांगी बनून जाते म्हणून सर्वांगीण जीवन विकासासाठीं वेगवेगळ्या कर्म योगाची योजना केली असता जीवनात आनंद येतो आणि त्याबरोबर च ज्ञान हि मिळत ज्ञान आणि आनंद हें कर्म-योगाचे प्रतिस्पर्धी कल्पून त्याच्यासाठीं वेगळा वेळ काढण्याची वृत्ति आम्ही राखत नाहीं आणि यातून च 'नवी तालीम' चा शोध लागला आहे

तसा हा नवा शोध नाही, पण आश्रम-जीवनाचा तो स्वाभाविक परिणाम आहे. आणि सारी गीता त्याच्या बचावासाठी अुभी आहे. ज्ञान, कर्म आणि आनद तिन्हीं अेकरूप आहेत असें गीतेचें सूत्र आहे. आनदाचे विशुद्ध रूप म्हणजे च भक्ति होय. म्हणून भक्ति शब्दात गीतेने त्याचा समावेश केला आहे. अशा प्रकारें ज्ञान, भक्ति आणि कर्म या तिहींच्या योगाचा अेका च वस्तूत अनुभव करण्याला गीता समत्व म्हणते. तें प्राप्त करण्यासाठीं जीवनाची कशी रचना करायला हवी तें गीतेंत सांगितलें आहे. केवळ सन्यासानें म्हणजे अलीकडच्या भाषेंत पुरसतीनें जीवन-विकास होत नाहीं मनुष्याला जी काहीं सिद्धि मिळाली आहे ती चिंतनानें झाली आहे खरी, पण चिंतन-कर्मातून सुटका अपेक्षित नाहीं. अुलट कर्मातून च चिंतन अुत्पन्न होते. जें चिंतन कर्मातून सुटका अपेक्षितें तें माणसाला योग्य मार्गास लावीत नाहीं, अयोग्य मार्गास लावते. विकासाअैवजीं विनाशाकडे घेअून जाते. पुरसतीच्या वेळेचे चिंतन हि निरुपयोगी असते. ज्या चिंतनाचा आधार प्रत्यक्ष कर्मयोगावर, अनुभवावर नसतो ते चिंतन हवेंत राहून जातें. मनुष्याच्या शरीराची रचना देखील अशी आहे कीं त्याचे मस्तक आकाशात असलें तरी पाय जमिनीला लागलेले आहेत. मानव-मूर्ति मनुष्याचें जीवन कसें असावें त्याचे सूचन करते. म्हणून ज्ञान, कर्म व आनद, ज्याला मी भक्ति म्हणेन, या तिहींचा अेकदम अनुभव यायला पाहिजे. वैदिक ऋषि म्हणत आहे—"तव अित् अिंद्र अव आयसा हस्ते दात्र चना ददे"—हे परमेश्वरा, तुझ्या प्राप्तीसाठीं हातात विळा घेअून मी शेतात काम करतों (संस्कृत दात्र वरून गुजरातींतला 'दातरडुं' शब्द बनला आहे. दात्र वरून अितका सरळ

प्राकृत शब्द दुसऱ्या कुठल्या हि भाषेत नाहीं.) तेव्हा ऋषि दासाला ओश्वर-प्राप्तीचें साधन मानतो. यांत त्याची जी दृष्टि आहे ती च गीतेची आहे. आश्रम-जीवन आणि नओी-तालीम याच्या मागे हि ही च दृष्टि आहे.

ही नवीन नाहीं. पण तिची अंमल-बजावणी मधल्या काळांत होत नव्हती, आणि या काळात हि, जरी चोहों-बाजूस काम, काम आणि काम दिसून येत आहे, मोठमोठीं यंत्रें आणि कारखाने दिसून येत आहेत, आणि मोठ्या प्रमाणावर अुत्पादनाचा विचार होत आहे तरी, सारी धडपड कर्म टाळण्याची आहे. यंत्र आपले आपण फिरत नाहीं. त्याला हाताने गति द्यावी च लागते. म्हणून नाअिलाजाने हाताने चालवितात. पण ते हि चालवावें लागू नये आणि हाताच्या मदतीशिवाय यंत्र अखंड गतीने फिरत राहील याचा शोध करण्याचे पुष्कळ प्रयत्न करण्यात आले. परंतु त्यात यश आले नाहीं. चेतनाच्या मदतीशिवाय अखंड चालणारें कुठलें हि यंत्र निघूं शकत नाहीं हें सिद्ध झाले तेव्हा या निर्णयावर आले कीं मनुष्याचा हात यंत्राला लावला पाहिजे. परंतु नीयत तर कर्म टाळायची च आहे. कर्मांतून सुटका करून घेण्याची वृत्ति असते.

मग कर्मांतून सुटका करून घेण्यची कल्पना करण्यात येते आणि तदनुकूल तत्त्व-ज्ञाने अुभारलीं जातात. पण देह असताना कर्मांतून सुटणे म्हणजे मुक्ति नव्हे. ज्यामुळें देह अुत्पन्न झाला आहे त्या वासनेला छेदणे म्हणजे मुक्ति होय. आणि अशी मुक्ति कर्म करून च मिळूं शकते. कारण ती अंतिम अवस्था आहे. जी अंतिम अवस्था आहे ती अनारंभाने, आरंभ न केल्याने च, मिळविता येत नाहीं. नदीच्या

पलीकडच्या तीरावर जाअून जो आनंद मिळतो तो अलीकडच्या तीरावर मिळूं शकत नाहीं. डोंगर चढून त्याच्या माथ्यावर बसण्यात जो आनंद मिळतो तो डोंगर न चढता च पायथ्याशीं बसून राहिल्याने मिळत नाहीं. अंतिम कर्म-मुक्तींत देह-मुक्तीची कल्पना आहे. देह आहे तोंवर बाह्य कर्म करीत-करीत मनाने कर्म-मुक्त होण्याचा यत्न जर आपण करीत राहू तर शेवटीं देह अुडून जाअील आणि फिरून देह धारण करण्याची गरज राहणार नाहीं. याचे नाव मुक्ति होय.

सारांश, अेकीकडून वैज्ञानिक, दुसरीकडून तत्वज्ञानी आणि तिसऱ्या बाजूने आळशी तिघे मिळून कर्मांतून सुटायचे मार्ग शोधित आले आहेत. अुलट गीतेने आणि बापूजी कीं ज्यानीं आश्रम अुभारला त्यानीं देखील समजावून दिलें कीं प्रत्यक्ष अुत्पादक कर्मयोग च मुक्ति मिळविण्याचा मार्ग आहे. अुत्पादक परिश्रम तर दुनिया हि करते, पण ती लाचारीने करते. आपल्याला तो स्वेच्छेनें आणि ज्ञान मिळविण्याच्या अिच्छेने केला पाहिजे.

---

## (७)
## व्रतें आणि समाज-सेवा

आज चिंतनासाठी जो श्लोक देण्यात आला आहे तो गीतेचा आहे. त्याचे तात्पर्य हे—"मनुष्य अिंद्रियाचा आहार तोडील तर तितक्या अंशानें विषय दूर राहतील. पण मनाच्या खोल गाभाऱ्यात विषयाची जी गोडी असते ती तेवढ्याने सुटत नाहीं. त्यासाठीं स्वतंत्र

प्रयत्न करावा लागतो. आणि तो म्हणजे आत्म्याची ओळख करून घेणे हा च होय. आत्म-दर्शन झाल्यानंतर विषयांची गोडी अुरत नाहीं." या श्लोकाचें चिंतन आज मी करूं अिच्छित नाहीं. स्थित-प्रज्ञाच्या लक्षणांपैकीं हा अेक श्लोक आहे. 'स्थितप्रज्ञ-दर्शन' नावाचें माझें मराठी पुस्तक प्रसिद्ध झालेलें च आहे. माझ्या व्याख्यानाचा तो संग्रह आहे. त्यांत त्या लक्षणांचें चिंतन मीं केलेलें आहे. त्या पुस्तकाची गुजराथी आणि हिंदी आवृत्ति यथाकाळ तयार होअील च. हे श्लोक नित्य-चिंतनाचे आहेत. आणि सर्व सत्याग्रही स्त्री-पुरुष ते रोज म्हणतात. तेव्हां त्यांच्या चिंतनाची गरज होती. म्हणून तें पुस्तक मीं प्रकाशित केलें.

बापूंनी आश्रमासाठीं जीं व्रतें सांगितलीं—ज्यांना अेकादश व्रतें म्हणतात—त्यांत अस्वाद व्रत हि आहे. हा श्लोक त्या व्रताची आठवण करून देतो. त्या व्रतावर बोलायचा विचार नव्हता, पण शिबिरांत बापूजींच्या मंगल-प्रभात या पुस्तकाचा अभ्यास व्हायला पाहिजे. बापूजींनी पुष्कळ लिहिलें आहे. त्यांत मौलिक साहित्य हि पुष्कळ आहे. तथापि त्या सर्वांचें मथित जर कांहीं असेल तर हें लहानसें पुस्तक आहे. आज त्याचें भान लोकांना तितकेंसें स्पष्ट नाहीं. पण शंभर वर्षांनंतर जनता बापूंच्या 'मंगल-प्रभात' चें जितकें स्मरण राखील तितकें कदाचित् दुसऱ्या साहित्याचें ठेवणार नाहीं. आजच्या पिढीबाबत त्यांनीं जें कांहीं लिहून ठेवलें तें सारें अितिहास-जमा होअील. पण जें थोडें साहित्य निरंतर अुपयोगाचें ठरेल त्यांत 'मंगल-प्रभात' शिरोमणि होय. त्यांत जीं व्रतें सांगितलीं आहेत तीं नवीं नाहींत. पण त्या बरोबरची त्याची कल्पना मौलिक आहे.

समाज-सेवा करणारांनी मानलें आहे कीं, सेवेसाठी चारित्र्य-व्रत आवश्यक आहे. पण काहीं व्रतानें निरपवाद पालन समाज-सेवा करीत असता केलें पाहिजे, तेव्हा च खरी सेवा होऊं शकते असें त्यांनी मानलें नव्हतें. पुष्कळसे समाज-सेवक असे होऊन गेले आहेत की ज्यांनीं चांगली सेवा केली आहे आणि त्याच्या सेवेचा समाजानें अुपकार हि मानला आहे. तथापि ते सेवक असल्या व्रताची गरज मानीत होते असें दिसत नाहीं. या अुलट योगाचे अुपासक आणि जैन व बौद्ध धर्मांचे अनुयायी, भक्तिमार्गी आणि वेदांती काहीं व्रतांची गरज अवश्य मानीत असत. सत्य, अहिंसा आदि पाच व्रतें तर बापूजींनी सरळ पतंजली घरून च घेतली आहेत. पण ते लोक व्रत पालनाबरोबर समाज-सेवेची आवश्यकता मानीत नव्हते. त्या व्रत-पालनात व्यक्तिगत शुद्धीची कल्पना होती. अशा प्रकारे जे लोक समाज-सेवा करीत ते व्रताचें ध्यान ठेवीत नसत, आणि जे व्रताचें ध्यान ठेवीत ते त्याबरोबर समाज-सेवेची कल्पना करीत नसत. दोहोंची साधना वेगवेगळी होती. पण त्या दोहोंना जोडणें अपरिहार्य आहे, हा मौलिक विचार होय.

आपण खादीचा प्रचार व्हावा असे अिच्छितो. हिंदुस्थानात अखंड चरखा चालो अशा अर्थाचें भजन हि अिथे रोज गाअिलें जातें. तेव्हा या व्रतावर आमची अखंड श्रद्धा असली पाहिजे तर च चरखा अखंड चालेल. चरख्याला जर आम्ही केवळ अेक बाह्य वस्तु मानलें तर चरखा अखंड चालणार नाहीं, तर तो खंडित होअील. बापूचे विचार मानणारांमध्यें अेक अुणीव राहून गेली आहे. ते जीवनाच्या खोलींत शिरू अिच्छीत नाहींत थोडे दूर जाअून थांबून जातात. पण आमचा

विचार जर वरवर च राहील, विचाराचा खोल पाया नसेल, तर त्यावर अुभारली जाणारी अिमारत पक्की होणार नाहीं.

म्हणून आपण जें काम करीत आहोंत त्याच्या मुळाशीं जाअून त्याच्या पाठीमागें जे तत्व-ज्ञान आहे त्याचा अभ्यास करायला पाहिजे. शिबिरांत 'मंगल-प्रभात'चा अभ्यास अवश्य व्हायला पाहिजे. त्यांत अकरा व्रतांबरोबर निश्चय आणि नम्रता हे दोन आणखी जोडून देण्यात आले आहेत. अेकूण तेरा अध्याय आहेत. पंधरा दिवसात त्या पुस्तकाचा सामान्य अभ्यास होअू शकतो.

नम्रता आणि निश्चय हे परस्पर-विरोधी नसून परस्पर-पूरक होत. आम्ही सावध रहावें अेवढ्यासाठीं दोहोंची गरज आहे. जें ज्ञान मिळविलें आहे ते आचरणात आणण्यासाठीं निश्चय हवा, आणि अद्याप पुष्कळ ज्ञान मिळावयाचें शिल्लक आहे अशा वृत्तीसाठीं नम्रता हवी. आम्ही सर्व कांही ज्ञान मिळविलें आहे, असें वाटल्यास आपण अुद्धट बनू आणि ज्ञानाचे दरवाजे बंद होतील. मग विकास होणार नाहीं. पण याचा अर्थ हा नाहीं कीं जितकें ज्ञान मिळविलें त्याचें आचरण करताना मनात शंका असावी. निःशंक होअून आचरण करण्यासाठीं निश्चय पाहिजे. अशा प्रकारें आपल्या व्रताचे निश्चय आणि नम्रता हे रक्षक होत. व्रताबरोबर याचे हि सखोल अध्ययन व्हायला पाहिजे.

---

## कर्ममय अुपासना

आश्रम-जीवनाच्या व्रता अगाची चर्चा आपण करून राहिलो आहो. काल आपण कर्मयोग म्हणजे श्रम-निष्ठा या बाबत विचार केला. त्याच्या च अेका विशेष भागाची जी कल्पना करण्यात आली आहे तिच्या बाबत आज विचार करूं.

कर्ममय अुपासना रूढ करण्याचा प्रयत्न आश्रमात अेक वर्षापासून चालला आहे. अुपासनेची कांही कर्मे अुत्पादक असतात. कांही तशी अुत्पादक नसतात, जरी तीं हि अुपयुक्त असतात. परंतु आश्रमात अेक असे अुत्पादक कर्म अुपासनेसाठीं निवडून घेण्यात आलें आहे की जें सर्वजण अेकत्र जमून आणि अुपासनेची भावना राखून करू शकतात. बापूंना त्याला यज्ञ नाव दिलें. हिंदुस्थानची आजची गरज पाहून त्याचा अंगीकार करण्यात आला होता. तें म्हणजे सूत्र-यज्ञ. त्याला च मी अुपासना नाव दिलें आहे. सूत कातण्यात पेळू तयार करण्याचा हि समावेश होतो, जरी प्रारंभीं तसा अर्थ करण्यात आला नव्हता. पण तो अेक दोष राहून गेला होता. आणि तो आजपर्यंत आपल्याला त्रास देत आहे. आता त्या दोषाचें भान झालें आहे तर सूत कातण्याच्या अुपासनेचा पूर्ण अर्थ समजून घेतला पाहिजे. सूत कातण्याच्या अुपासनेचा जरी आजची गरज ध्यानात घेअून स्वीकार करण्यात आला आहे तरी ती नेहमींसाठीं अुपासना होअू शकते. प्राचीनानी देखील जेव्हा असल्या अुपासनेबाबत विचार केला तेव्हा कातण्याच्या च अुपासने चा स्वीकार केला होता कापड दरेकाची शारीरिक गरजेची वस्तु आहे. त्या च

बरोबर ती आध्यात्मिक वस्तु हि आहे कारण तिच्याशीं सत्कारितेचा संबंध निगडित आहे अशा तर्‍हेने शारीरिक आणि आध्यात्मिक दोन्ही आवश्यकता पूर्ण करणारी जी वस्तु आहे तिचा अुपासनेसाठीं स्वीकार करणे योग्य च आहे.

कर्ममय अुपासनेची ही खुबी होय कीं तात अुपासनेची भावना असेल तर श्रेय लाभते, आणि तशी भावना नसली तर अुत्पादन तरी होते च गीतेत धर्मयुद्धाचें असे च वर्णन केलें आहे "हतो वा प्राप्स्यासि स्वर्गं, जित्वा वा भोक्ष्यसे महीम् ।" धर्म-युद्धात माणसाला मृत्यु आला तरी भलें आहे आणि जय झाला तरी भलें आहे तशी योजना ह्या अुपासनेत आहे अुपासनेनें समाज आध्यात्मिक सूत्रात बांधला जातो जे वर्ग भेद पडले आहेत ते नष्ट होतात, आणि सर्वत्र साम्याचा अनुभव येतो "वेत्थ त्व अन्तर्यामिणम्, वेत्थ त्वं सूत्रम्"— तुम्ही त्या अतर्यामीला ओळखता का, जो सर्वांना अेका सूत्रात ओंवतो? अशीं प्रश्नोत्तरें अुपनिषदांत येतात सर्वांतर्यामी आत्म्यास आपण ओळखत असू तर सगळ्या सृष्टीचे अन्तरंग अवगत केल्यासारखें होते गीतेंत देखील या सूत्राच्या रूपकाचा अुपयोग करून घेतला आहे तेव्हा अशी ही सर्वांना आध्यात्मिक सूत्रात बांधणारी सूत कातण्याची अुपासना आहे

अुपासना आणि सत्कर्में यात जे अंतर आहे ते मी अेक अुपमा देअून समजावून सांगत असतों. अितर सत्कर्में त्वचेत असलेल्या असंख्य छिद्रासारखीं होत त्या छिद्राच्या द्वारें माणसाला हवा अवश्य मिळते पण अुपासना नाकासारखी आहे त्वचेच्या छिद्रांतून तशी हवा मिळत नाहीं जशी ती नाकानें श्वासोच्छ्वास करून मिळते अस

महत्तर सत्कर्में आणि अुपासना याच्यात आहे. जी चेतना अुपासनेच्या द्वारें मिळते ती सत्कर्माच्या द्वारें मिळत नाहीं.

आपले प्राचीन धार्मिक लोक देखील अुपासना रूढ करण्यात यशस्वी झाले आहेत. पण त्यांची अुपासना पाथिक आहे. सामान्यत. धर्मात भेद होते च. तेव्हा प्रत्येक धर्मवाल्याने आपापली वेगळी अुपासना रूढ केली. पण त्या अुपासना कर्ममय नव्हत्या. वाङमय होत्या, ध्यानमय होत्या. म्हणून दोन्ही प्रकारें लाभ देणाऱ्या नव्हत्या. ध्यान-योगासाठीं आपण सारे बरोबर बसलों—जसे केकर पंथाचे लोक करतात — आणि त्या ध्यानात यशस्वी झालों, तर ध्यानाचा लाभ अवश्य मिळतो. पण तरी ध्यान-क्रिया ज्याच्या मनात होत नाहीं, त्याना ती आळसाची या आरामाची क्रिया होअून बसते. म्हणजे ध्यान-योगाची अुपासना अेकेरी लाभाची आहे. मनात ध्यान चाललें तर लाभ आणि तसें ध्यान न घडल्यास अलाभ. पण कर्ममय अुपासना दोन्ही प्रकारें लाभ-दायक होते. म्हणून सामुदायिक दृष्टीने कर्ममय अुपासना श्रेष्ठ ठरते.

अशी सर्व प्रकारे ही अुपासना श्रेयस्कर असून हि आम्ही ती आतापर्यंत रूढ करूं शकलो नाही करू शकलो असतो तर आता-पर्यंत सगळा समाज अेकरूप होअून गेला असता तसा थोडा प्रयत्न केला गेला, पण आम्ही तितके शक्तिशाली नव्हतों आम्ही ती वस्तु आत्मसात केली नाहीं म्हणून तिचा प्रचार झाला नाहीं आश्रमाने आणि चरखा सघाने तसा थोडा प्रयत्न केला पण त्यात यशस्वी झालों नाही. अजून हि आपण त्यात तन्मय होअून जाअू तरी आज-पर्यंत झाला नाहीं अितका प्रचार पुढें होअील. परंतु प्रचाराची अितकी *चिंता नाहीं, जितकी तो विचार आत्मसात् होण्याची आहे*

जुन्या अुपासनेचा विचार आम समाज आतापर्यंत ग्रहण करू शकला नाहीं. कारण तो प्रचलित विचारायीं जुळत नव्हता. परतु कातण्याची अुपासना आधुनिक मन समजू शकते. यात पार्थिकतेचा आभास नाहीं. आणि अव्यक्त वस्तु मानण्याची हि गोष्ट नाहीं. सूत कातण्याने आपण आम जनतेशीं अेकरूप बनतो, म्हणून हीं व्यक्त वस्तु आहे, असे आधुनिक माणसाला समजावून देता येते.

माझ्याकडून झाला तितका मीं या दिशेने प्रयत्न केला आहे. कताअीच्या साधनात जितके शोध मीं केले आहेत, ते या दृष्टीने च केले आहेत. खादी-अुत्पत्ति अेक गोष्ट आहे, वस्त्र-स्वावलंबन दुसरी. परतु कर्ममय अुपासना या दोहोंहून हि वेगळी आहे. तींत अुत्पादन आणि वस्त्र-स्वावलंबन तर आपोआप होअून च जातें. परतु ती आध्यात्मिक वस्तु आहे. आणि आध्यात्मिक कर्ममय अुपासनेसाठीं साधनें अतिशय साधीं असलीं पाहिजेत. म्हणून मीं तकली पुष्कळ चालविली. तिची गति वाढविण्याचें हि प्रयोग केले. चरख्यापेक्षा तिच्यावर सूत कमी च निघत होते. चरख्याची बरोबरी तकली करू च शकत नव्हती. तरी तिच्यापायीं पुष्कळ वर्षे घालविलीं. कारण त्यात सामुदायिक व्यापक प्रचाराची दृष्टि होती. आणि ही च दृष्टि तुनाअीच्या शोधात होती. आपल्या पिंजण्यात दोष होते हें कारण तर होतें च. पण त्या प्रयोगात मुख्य दृष्टि व्यापक प्रचाराची होती.

याचा प्रचार करण्याची शक्ति तेव्हा च येअील की जेव्हा आपण त्या वस्तुला आपल्या जीवनाचें अग बनवू.

---

## (९)

## आपल्या मंडळींत

तुम्हां मंडळींस पाहून मला फार आनंद होत आहे. या पूर्वी मी अिथें येअू शकलो नाहीं, याबद्दल मला वाअीट वाटतें, आणि वाटत हि नाहीं. वाअीट अेवढ्यासाठीं वाटतें कीं तुम्हां भावा-बहिणींशी मी आता-पर्यंत भेटूं शकलो नाहीं. आणि वाअीट वाटत नाहीं तें अेवढ्यासाठीं कीं बापूंनी जें काम मला सोंपविलें होतें तें करण्यांत मी मग्न होतो.

शेवटीं माणसाचा खरा परिचय तर मानसिक च असतो. बाह्य परिचयाला मर्यादा असते. मानसिक परिचय करोडोंशी होअू शकतो— जे जिवंत आहेत त्यांच्याशी हि आणि जे दिवंगत आहेत त्यांच्याशी हि. अिथें मी बसलो आहे तो परिचितात, आपल्या कुटुंबियांत, बसलो आहे असें वाटते. आतां तुमचा परिचय करून देण्यांत आला. पण तो तर मी पुष्कळसा विसरून जाअीन. अशा गोष्टी प्रायः मी विसरून जातो. पण तुमची अेक आठवण तर मी केव्हां हि विसरणार नाहीं. तुम्ही सर्वजण मला अतर्यामीरूप आहा. आतां तुलसीदासजींची चौपाअी गाअिली गेली, तींत ते म्हणतात — "सत्संगाशिवाय विवेक होत नाहीं आणि प्रभु रामचंद्राच्या कृपेशिवाय सत्संग लाभत नाहीं." तुम्हां मंडळींना अिथे फार चांगला सत्संग लाभला आहे. बुद्धापासून गांधीजीपर्यंतच्या चांगल्या तसबिरी अिथें लावण्यात आल्या आहेत. आणि त्यांच्या छत्र-छायेत अिथें सारीं कामें केलीं जातात. अिथली सृष्टि हि पुष्कळशी तुमची बनविलेली आहे. अिथले पुष्कळसे कार्यकर्ते तुम्ही तयार केलेले आहेत. कैक वर्षांपासून अिथें सेवा-कार्य

होत आहे. आपसात बंधुभाव राखून लोक कामें करताहेत. अिथे मी बसलो आहे तो सत्संगतींत बसलों आहे, असें वाटतें.

अीश्वराची मजवर अपार कृपा होत राहिली आहे. लहानपणापासून त्यानें मला सत्संगति च दिली आहे. तुमच्या बैठकींत मला आभास होत आहे कीं अिथें अेक सत्ता काम करून राहिली आहे. ज्याची गुरुभावना असेल तो तिला गुरु म्हणू शकतो. ज्याची पितृ भावना असेल तो तिला बापु म्हणू शकतो आणि सार्‍या जगात आत्म-स्वरूप प्रभूला पाहण्याची ज्याची भावना असेल तो तिला अीश्वर म्हणू शकतो. नाव काहीं हि द्या, पण अशी अेक सत्ता आहे खास आणि तिचा च आशीर्वाद, तिचा च वरदहस्त आम्हा सर्वांवर आहे. अिथल्या प्रार्थनेंत मीं जीं प्रवचनें दिलीं त्यात माझी अुपदेश देण्याची भावना नव्हती. मीं आपल्या विचार-पोथींत लिहिलें आहे—"वेद स्वभावानें बोलतात. गुरु अुपदेशार्थ बोलतात. मी जपार्थ बोलतों." माझी भावना दृढ करण्यासाठीं च मी बोलतों.

तुम्ही माझा आशीर्वाद अिच्छिता, पण मजवर ज्याचा आशीर्वाद आहे त्याचा तुमच्यावर हि आहे. तो तर अुत्सुकतेनें पहात आहे की कोण माझ्या आशीर्वादाची अिच्छा करतो आहे. सार्‍या जगात प्रकाश आणि सत्य प्रेरणा भरून रहावी अशी त्याची अिच्छा आहे. पण आम्हा बालकाना तो प्रयोग करू देत आहे. चुका करू देत आहे. चूक करू तरी बर-आली, मागेंपुढें तो च बसला आहे, त्याची दृष्टि आपल्यावर आहे च. मासोळी पाणी सोडून पुढें-जाणार ? पाण्याचा तरंग पाणी च असतो.

तुम्हा मडळींनी अिथे तप केलें आहे. तपस्येनें च सारें कांहीं मिळतें. आता आपण चौपाअीन अैकलें आहे कीं अुमेला भगवान शंकराची अिच्छा होती तर तिला तप करण्यास सागण्यात आलें. तपस्येनें च भगवान् सृष्टि चालवून राहिला आहे. अुपनिषदात आपण पाहतों कीं शिष्य जेव्हा गुरुजवळ ब्रह्म-विद्येसाठीं जातो तेव्हा गुरु त्याला सागतो—"तपसा ब्रह्म विजिज्ञासस्व. तपो ब्रह्म." तप च ब्रह्म आहे. तप करून त्याला जाण, त्याची ओळख करून घे.

बापू गेल्यानतर आता आपल्या कसोटीची वेळ आली आहे. त्यासाठीं आपल्याला अधिक तपस्या करावी लागेल. अेक प्रकारचें स्वराज्य मिळालें आहे, पण ज्याला आपण राम-राज्य म्हणतों त्या साठीं आता प्रयत्न करायचा आहे. या आश्रमाचें नाव देखील स्वराज्याश्रम आहे. भगवंताचा आशीर्वाद तर आपल्यावर आहे च. आम्ही अधिक जोमानें कामास लागावें अेवढें च अीश्वरापाशीं मागून मी सपवतों.

---

(१०)

## आश्रमची आहार-दृष्टि

आश्रमाच्या विविध अंगात आहार शुद्धीचा आग्रह आणि तसले प्रयोग हे अेक विशेष अग चालत आलें आहे. हा विषय भारतीय समाजास नवा नाहीं. सगळे भारतीय मानस असले प्रयोग करीत आलें आहे—जरी सामाजिक दृष्टीनें पाहिल्यास फार मोठा परिणाम ते घडवून आणू शकलेलें नाहीं. तरी आपल्या अनुभवावरून जो कांहीं

अल्प पण निश्चित परिणाम ते घडवून आणू शकलें तो जगातील दुसऱ्या धर्मांशी तुलनेस ठेवता विशेष लक्ष खेंचून घेतो.

आहार-शुद्धीची दृष्टि ठेवून त्यात पुष्कळ प्रयोग करण्यात आले आहेत. अेक म्हणजे शारीरिक आरोग्याची दृष्टि. त्याबाबत वैद्य-शास्त्राने पुष्कळ कार्य केलें आहे. आपल्या वैद्य-शास्त्रात पथ्य-विचाराला अेक महत्वाचें स्थान आहे—जरी ते त्या अंगाचा विशेष विकास करू शकलेलें नाहीं. पाश्चात्य लोकांनी प्रयोग करून नैसर्गिक आहार आणि नैसर्गिक अुपचार याचे शास्त्र विकसित केलें आहे. याचा विचार आश्रमात हि झाला आहे, पण ते अंग अ-विकसित असे च राहिलें. नैसर्गिक अुपचारावर च संतुष्ट राहू तेव्हा च ते यशस्वी मानले जातील. रोग-लक्षण दिसू लागलें म्हणजे नैसर्गिक अुपचाराने आणि आहार नियमनाने त्याची चिकित्सा करण्याचा नर आम्ही प्रयत्न केला, पण त्यात फारसे यशस्वी झालेलों नाहीं

आहाराबाबत आपल्यात जो दुसरा प्रयोग झाला तो मानसिक शांति कशी मिळेल ही दृष्टि समोर ठेवून केला गेला. त्यात मग सात्विक, राजस, तामस असे वर्गीकरण झालें. योग-शास्त्राने हि याचा विचार केला आहे. गीतेत देखील त्याचा अुल्लेख येतो.

तिसरा प्रयत्न झाला तो सर्व सामान्य समाजाला खाद्याखाद्य-विवेकाची दिशा दाखविण्याच्या दृष्टीने झाला. हा प्रयोग समाज-शास्त्र्यांनी केला. याचा अुल्लेख स्मृतींतून आपल्याला पहायला मिळतो. तो व्यग असला तरी या दृष्टीने प्रयत्न मानतात आणि अभिमान हि धरतात. त्यातून मग अुच्च-नीच भावना हि अुत्पन्न झाली आहे. अेका स्वच्छ विचाराचा हा मलिन परिणाम झाला आहे. त्या विचाराची स्वच्छता

टिकवायची आणि वाढवायची असेल तर हा मलिनतेचा स्पर्श होऊ देता कामा नये

या बाबतीत हिंदुस्थानची विशेषता तर आहे च, पण त्यात हि गुजरातची अधिक आहे, असे म्हणता येअील गुजराथ च असा प्रात आहे कीं जिथला शेतकरी हि मासाहारातून मुक्त आहे अितर प्रातात विशेषत वैश्य आणि काहीं ब्राह्मण मासाशन करीत नाहींत पण शेतकरी निरामिषाहारी नसतात ते देखील रोज मासाशन करतात असातली गोष्ट नाहीं मधून मधून च करतात त्याचा शारीरिक लाभ हि त्याना होत नाही स्वाद तेवढा जोडा मिळत असेल अवढा च लाभ त्यावन अधिक काहीं लाभ होत नाहीं तरी हा वाअीट चाल जशी अितर प्रातातल्या शेतकऱ्यात रूढ आहे, तशी गुजराथमधे नाहीं वैष्णव आणि जैन सप्रदायाच्या लोकाना केलेल्या कामाचा हा परिणाम आहे हें तर मी आहार-शुद्धि बाबत अैतिहासिक दृष्टीने आतापर्यंत काय प्रयोग झाले त्याचे विवेचन केलें आश्रमात जे प्रयोग झाले त्यात हा सगळ्या गोष्टी आहेत च, पण त्याबरोबर गरिबाच्या जीवनाशी अनुसधान राखण्याची हि दृष्टि आहे गरिबाचे हि जीवन मान वर अुचलायला पाहिजे आणि त्याचा आहार परिपुष्ट करायला पाहिजे तथापि आज ते ज्या स्थितीत आहेत त्या स्थितीत आपल्या जीवनाचा हि त्याचा सबध असला पाहिजे ही दृष्टि आश्रमचा आहार निश्चित करताना ठेवण्यात आली आहे म्हणून सात्त्विक आहाराची निवड करीत असता हि जो आहार गरीब घेऊ शकतात असा आहार ठेवण्याचा यत्न करण्यात आला आहे पण याचा प्रचार आम जनतेत व्हावा म्हणून प्रयत्न करण्यात आलेले नाहींत

ही वस्तु पुढें न्यायची असेल, आणि जी कांहीं मांसाहारांतून सुटका झाली आहे, तिचा पुरा फायदा घेअून ती आणखी पुढें न्यायची असेल तर, हिंदुस्थानांत आहारामध्ये फळ व भाज्या यांचा अुपयोग वाढवला पाहिजे. त्याचें अुत्पादन हि वाढवलें पाहिजे. परिपूर्ण मांसाहार-त्यागाच्या दृष्टीनें दूध सोडण्याचे हि प्रयोग करण्यांत आले आहेत. पण दुधाचे नियमित सेवन करायला पाहिजे अशा निर्णयावर आम्ही आलो आहो. तरी याबाबत अधिक प्रयोग व्हायला पाहिजेत. सध्या आश्रमच्या आहारात गरम मसाल्याचा अुपयोग न करणे अेवढी च विशेषता दिसून येते.

परंतु आहार-शुद्धींत आहार कोणता घ्यावा यापेक्षा किती घ्यावा ही वस्तु अधिक महत्वाची आहे. आध्यात्मिक दृष्टीनें मी या निर्णयावर आलों आहे की मिताहार च अस्वाद व्रताची मुख्य कसोटी आहे. फलाहार सात्त्विक मानला जातो. पण त्याचे सेवन अतिमात्र झालें तर मानसिक प्रगति होत नाहीं. धान्य, दूध आदि राजस आहार मानला जातो. पण तो मात्रेंन घेतला म्हणजे मानसिक प्रगति अधिक होते. अशा प्रकारें मिताहार हा हिताहाराहून अधिक श्रेष्ठ आहे.

आहार शुद्ध ठेवून औषधादि घ्यावे लागूं नये या दिशेनें जे प्रयत्न झाले आहेत ती हि आश्रमची अेक विशेषता म्हणता येअील. पण त्या प्रयत्नात आम्हाला फारसे यश आलेलें नाहीं. तरी औषधादिंचा अुपयोग न करण्याची दृष्टि असल्यामुळें अेखाद्या वेळीं त्याचा अुपयोग करावा हि लागला तर तो सकोचानें करतो. परंतु या दिशेनें हि अधिक प्रयोग व्हायला पाहिजेत. बापूंनीं यासाठीं अुरळीकांचन येथें अेक स्वतंत्र आश्रम स्थापन केला. अेवढ्या दिवसात तर ते नाम-

स्मरणावर च अधिक जोर देअूं लागले होते. ही गोष्ट काही लोकांना आक्षेपार्ह देखील वाटली. नुसत्या नाम-स्मरणानें सारे रोग दूर होतात असें बोलणें अेक प्रकारें जादूवर विश्वास ठेवण्यासारखें च आणि भोळी श्रद्धा वाढविण्यासारखें आहे, असा आक्षेप करण्यात येअी. पण तो आक्षेप बरोबर नाहीं. नाम-स्मरणात रोग दूर करण्याची शक्ति अवश्य आहे. आम्ही नाम-स्मरण-पूर्वक आहार घेअू तर तो अधिक मात्रेंत घेतला जाणार नाहीं. स्वादाला आम्ही जिंकू शकू. अयोग्य वर्तन आमच्याकडून होणार नाहीं. हे सारे नाम-स्मरणानें होअू शकतें. म्हणून नाम-स्मरणाहून अुत्तम दुसरें कुठलें च औषध नाहीं. असें अनुभवावरून आम्ही निश्चयानें म्हणू शकतों. हा सारा आहार-शुद्धीचा निष्कर्ष झाला.

---

## (११)
## सार्वजनिक प्रार्थनेचें चतुर्विध स्वरूप

*आज मला विचारण्यात आलेल्या अेका प्रश्नाची चर्चा करूं अिच्छितों. प्रश्न असा आहे कीं जिथे सर्व संप्रदायाचे लोक—जसे या शिबिरात—अेकत्र होतात तिथें प्रार्थनेचें रूप कसें असावें.* पुष्कळदा असा प्रश्न अुभा होतो. म्हणून या बाबत आपल्यापाशीं काहीं निश्चित अुत्तर असलें, तर काम सोपें होअून जातें.

हिंदुस्थान समन्वय-विचाराची भूमि आहे. या भूमीवर सत्य-दर्शनासाठीं जितके प्रयत्न झाले आहेत तितके क्वचित च दुसऱ्या

भूमीवर झाले असतील. जग देखील मानते की हिंदुस्थानांत सत्य-दर्शनासाठी पुष्कळ तपस्या झाली आहे.

पुष्कळसे प्रयोग करून आमचे लोक ज्या निर्णयावर आले आहेत तो निर्णय प्राचीन ग्रंथात, जो जगातील पहिला ग्रंथ आहे त्यात, लिहून ठेवला आहे. “ अेकं सत्, विप्रा बहुधा वदंति ” हे ऋग्वेदाचें वचन प्रसिद्ध आहे. सत्य अेक आहे, पण अुपासक अनेक नावात आणि अनेक रूपात त्याची अुपासना करतात. ऋग्वेदाच्या काळीं च हा निर्णय होअून चुकला होता. याचा अर्थ हा कीं त्या पूर्वी च याची चर्चा आणि तपस्या होअून चुकली होती. त्या तपस्येची नोंद देखील वेदात पहायला सापडते. त्या नंतर अनेक पंथ निर्माण झाले. आणि काहीं पंथाच्यामध्ये काहीं कटुता हि निर्माण झाली होती. परंतु अेकंदरींत सर्वांनीं मिळून समन्वय करून घेतला होता. देवी-देवताचीं अनेक नावें असून हि परमेश्वर अेक आहे याचे भान हिंदुस्थानच्या जनतेला झाले होतें. काहीं जण समजतात त्या प्रमाणे हिंदुधर्मांत अनेक अीश्वराची कल्पना केलेली नाहीं. हिंदू देखील अीश्वर अेक आहे असें मानतात. अीश्वर अनेक आहेत असा भ्रम कुणाला च नाहीं. परंतु अीश्वराची शक्ति विविध प्रकारची असते. म्हणून त्याची अुपासना करणारे वेगवेगळ्या शक्तींची अुपासना करतात. तसें तर अेक च अुपासक विविध शक्तींची अुपासना करूं शकतो. तो आखाड्यात गेला म्हणजे हनुमानाची अुपासना करील. सूर्योदयाच्या वेळीं तो स्नान करून सूर्यदेवाची पूजा करील. विद्यालयात गेला म्हणजे सरस्वतीचें स्तोत्र गाअील. रसोअी-घरात गेला म्हणजे अन्नपूर्णेचें स्तोत्र गाअील. अीश्वराची शक्ति अनंत आहे.





त्याची नीति हि अनंत असू शकतात, आणि रूपें हि अनंत असू शकतात. अेक च मनुष्य भोजन, अध्ययन, व्यायाम आदि विविध कामें करू शकतो, त्या प्रमाणे अेक च मनुष्य विविध अुपासना करू शकतो. त्याच्यात विरोध कल्पिण्याचें काहीं कारण नाहीं. सर्वांचा मेळ बसूं शकतो.

आता जिथें अनेक पंथाचे, सप्रदायाचें आणि धर्माचें लोक अेकत्र जमतात त्या ठिकाणीं प्रार्थनेचें स्वरूप विविध असू शकतें. शुद्ध निर्विकार परमेश्वराचे नाम-स्मरण, अथवा अीश्वराच्या अनेक विभूतींचें अेकत्र अुच्चारण, अथवा त्याच्या अेका च नामाचे अुच्चारण, ज्यात अितर सर्व नामाचा अंतर्भाव मानता येअील.

पहिली पद्धति वेदांताची आहे. स्वामी विवेकानंदानीं हिम्मत-पूर्वक अमेरिकेंत जाहीर करून दिलें कीं सगळ्या जगाचा वेदांत हा च अेक धर्म होअू शकतो तेव्हा जगाला आणि हिंदुस्थानला हि हिंदु-धर्माच्या महत्तेचे यथार्थ भान झालें. वेदांताची अुपासना च अशी अेक निर्गुण निराकार सर्व-व्यापक अुपासना आहे कीं जींत अुपासक देखील वेगळा राहत नाहीं. सर्व भेद तिथें मावळतात, सर्व नाम-रूपाचा तिथें लोप होतो. हा अेक प्रकार झाला. यात कुठल्या च पंथाची काहीं-अेक तक्रार राहत नाहीं. सगळ्या नद्या ज्या प्रमाणे समुद्रात विलीन व्हायला तयार असतात त्याप्रमाणे या महान पंथात सगळे पंथ विलीन व्हायला तयार होअू शकतात.

दुसरा प्रकार म्हणजे अनेक देवताचा अुच्चार करणें. हिंदू, मुसलमान, ख्रिस्ती, पारशी, यहूदी आदि सर्वांच्या धर्मांत सांगितलेल्या परमेश्वराच्या नावाचा अेकसाथ अुच्चार करणे—जसे आपण कधी-कधी करतों—हा दुसरा प्रकार झाला.

तिसरा प्रकार म्हणजे अुपासना चालविणारे ज्या धर्माचे अधिक असतील त्या धर्माची अुपासना व्हावी. तीत अितर सर्व लोकांनी सामील व्हावें कोणा अेका च नामाचा अुच्चार तिथे होत असला तरी सगळी नामें त्या अेका नामात येअून जातात अशा अविरोध वृत्तींचा अभ्यास करावा. रामाच्या नामात कृष्णाचे नाव येअून जातें, कृष्णाच्या नावात शंकराचे नाव येअून जातें, शंकराच्या नावात अल्लाचे नाव येअून जातें, आणि अल्लाच्या नावात मज्दाचे नाव येअून जातें अित्यादि. तिथें राम, अल्ला अथवा मज्दा अशीं वेगळीं नावे घेण्याची गरज नाहीं. सर्व नावाचा अेका च नावात समावेश हाअून जातो असें मानावें.

हे अुपासनेचे तीन प्रकार झाले याच्या जोडीला नीति म्हणजे हृदय-विकासाचा अथवा गुण विकासाचा विचार ज्यात आहे. असा भाग असावा. स्थित-प्रज्ञाच्या लक्षणासारखे श्लोक कुठल्या हि पथवाल्याला बाधक वाटणार नाहींत. सर्व अुत्साहपूर्वक त्याचा स्वीकार करतील. कारण प्रत्येक धर्मात असा नैतिक विभाग असतो च.

तेव्हा अुपासनेचे अितके प्रकार होतात—(१) आत्मचिंतनाचा निर्विकार तात्विक भाग. (२) प्रत्येक धर्मामधून अेक-अेक भाग सामुदायिक रीत्या अुच्चारणे. मीं जी प्रार्थना तयार केली आहे तींत आठ-दहा धर्मांचीं वचनें घेतलीं आहेत. त्याचा मराठींत अनुवाद केला आहे आणि तो मी केव्हा-केव्हा म्हणतों. (३) कुठल्या हि अेका नावाचा अुच्चार, ज्यात अितर सगळ्या नावाचा समावेश होतो असें मानणे. ज्या प्रार्थनेत हिंदूंची संख्या अधिक असेल तिथें 'रघुपति राघव राजाराम' म्हटलें जाअील. आणि त्यात अितर सगळे जण

भाग घेतील. ज्या बैठकींत पारशाची संख्या अधिक असेल तिथे मज्दाचे नाव गाअिलें जाअील. आणि त्यात सगळीं नांवे येअून जातात असें समजून सर्व लोक त्या प्रार्थनेत भाग घेतील. (४) सर्व-साधारण गुण-विकास-पर कांही भाग, ज्यात सर्व धर्मांचें सार येअून जात असेल असा. मी ह्याला नीति-पर भाग म्हणणार नाहीं, गुण-विकास-पर च म्हणेन. कारण नीति-पर म्हणण्यांत थोडी बाह्य वृत्ति वाटते. गुण-विकास शब्द अधिक आंतरिक आहे. गुण-विकास होतो तेव्हा च आत्म-दर्शन होते. त्यासाठीं कुठें जावें लागत नाहीं, वा शिकावें लागत नाही. चित्ताच्या गुणाचा अुत्तम विकास झाल्यानें आत्म-दर्शन आपोआप होअून जाते.

प्रार्थनेचें असे हे चतुर्विध स्वरूप आहे.

---

## (१२)
## प्रेम-वृत्ति आणि विवेक-बुद्धि वाढवा

आज मी अधिक बोलूं अिच्छित नाहीं. तुलसीदासाची वाणी आज तुम्ही अैकली आहे. तींतच पुष्कळसे मिळून जातें. आज मी जात आहे. या शिबिरात जी प्रेम-वृत्ति तुम्ही ठेवली आहे ती च सबंध समाजासाठीं नेहमीं ठेवण्याचा तुम्ही यत्न करा.

प्रेमाचा हि अेक अभ्यास असतो. क्रोधादि विकार अनिवार्य आहेत असे मानले जाते. परंतु ते बरोबर नाहीं. ते विकार मनाच्या आश्रयानें असतात; आणि आपण तर मनाहून वेगळे आहोत. हे भान

जर आले तर घड्याळ जसें आपण हातात घेतो आणि तें दुरुस्त हि करतों त्याप्रमाणे मन हि पारखूं शकूं आणि त्याचे दोष हि पाहूं शकूं. डोळा बिघडला असता आपण वाचणे सोडून देतों आणि आपल्या जीवनाचा अुपयोग अन्य प्रकारें करतो. कारण, आपल्याला माहीत असते कीं वाचणे चालू च ठेवले तर त्याने डोळा आणखी च बिघडून जाओल. डोळ्याचा अुपयोग कसा करावा हे आपण जाणतों. कारण डोळ्याहून आपण वेगळे आहों याची आपल्याला जाणीव आहे. त्या प्रमाणे मनाहून हि आपण वेगळे आहों हे ओळखू तर मनाचा नीट अुपयोग आपण करूं शकूं. मनात जे विचार-तरंग अुठतात त्याच्याशीं आपला संबंध नाहीं, अशी निष्ठा अंतरात असेल तर मनाची लीला तटस्थपणे आपण पाहू शकूं. मग मनात काय दोष आहेत आणि काय गुण आहेत, याचें परीक्षण करण्याची आणि मनाला शुद्ध करण्याची रीत आपल्या हातीं येओल.

क्षणोक्षणीं जो मनुष्य रागावतो तो क्रोधाचा अभ्यास करतो. मत्सराचें देखील असे च आहे. अशा च रीतीने आपण प्रेमाचा हि अभ्यास करू शकतो. समाजात वागताना प्रेम-पूर्वक वागल्यास समाजात प्रेम व्यापक होते आणि आपल्या हृदयात खोल ठसते. सद्‌गुण-प्रचाराची ही च खुबी आहे. आपल्या हृदयात ते खोल रुजले तर समाजात सुलभतेनें व्यापक बनतात. जिथे ज्या बंधु-भावानें तुम्ही राहिला, त्या च बंधु-भावाने संबंध समाजात राहण्याचा तुम्ही यत्न कराल आणि प्रेमाचा अभ्यास कराल, अशी मी आशा करतों.

दुसरी अेक गोष्ट समजून घेतली पाहिजे. किती हि चांगली गोष्ट असली तरी तींत काहीं दोष असू शकतात च. म्हणून आपल्याला

विवेकाने काम केलें पाहिजे. किती हि सुंदर स्थान असले, अथवा सर्वोत्तम शास्त्र-वचन असलें, तरी विवेक-बुद्धीने कोणती वस्तु मुख्य आहे व कोणती गौण आहे याचा विवेक राखला पाहिजे. प्रकाशाबरोबर अंधार असतो च नुसता पांढरा कागद असेल तर चित्र तयार होणार नाहीं. त्यासाठीं काळा आणि पांढरा दोन्ही प्रकार पाहिजेत. प्रत्येक वस्तु गुण-दोष मिश्रित असते तींतून गुण घेतले पाहिजेत, दोष टाकले पाहिजेत. ही क्रिया आपण व्यवहारात करीत च असतो. शेतांतून धान्य येते. त्यातून आपण खडे निवडून टाकतों. पिठात कचरा असतो तो आपण चाळून टाकतो. भाकरी खातो त्यात हि शरीराला अनुकूल असलेला भाग ठेवून घेऊन बाकीचा फेकून देतो. अशा प्रकारें गुण-दोष ओळखण्याची आणि गुण घेण्याची क्रिया सर्वत्र च करायला पाहिजे.

---

# निवेदन

१ प्रेरणा परमात्म्याची महात्म्याची प्रसन्नता
वाणी सत-कृपेची ही विन्याची कृति-शून्यता

२ सत्याग्रह-गुरूचे हे मोहनाचे सम्मोहन
ज्ञान-विज्ञान-संपन्न मोह-मोचन दर्शन

३ अम्लान-व्रत-पुष्पाची मंजु मंगल माळ ही
रहावी सर्वदा कंठी रमावी हृदय-स्थळीं

४ गूळची मोकळी गद्य गूजरी साजरी गिरा
न भंगिता अभंगात गुंफिली परमादरें

५ अद्वितीय चि अेकत्व गुरूचें गौरवूनि जें
विन्या शून्य विना-भूत फावला गणितापरी

---

(१)

# सत्य

१

१ सत्य विश्वाचें ह्या मूळ । सत्य धर्माचें जें बळ
सत्याग्रह-तत्त्वसार । सत्य हे चि परमाधार
सत्य आधीं तें अुलगडूं । वाणीचे हि दोष फेडूं
सत्य गाअूं सत्य ध्याअूं । विन्या म्हणे सत्य पाहूं ॥

२

२ सत् स्वयें असणारे सत्य असणेंपण
त्याहूनि जें अन्य तें चि शून्य ।
नसे चि जें मूळीं टिकेल तें कैसे
नसे आणि नासे लटिके वायां ।
वेगळे विरोधी अभाव हे तीन
पदार्थालागून वर्ग होती ।
सत्यसंबंधांत तिन्ही वर्ग अेक
जो मिथ्या-नामक विन्या म्हणे ॥

३

३ अीश्वरासि मिथ्या न होणें अगत्य
म्हणूनि तो सत्य स्वयें होय ।
सत्य हे चि नाम सत्य हे चि रूप
सत्य चि संकल्प अीश्वराचा ।

ग्रासकावांचूनि आमुचें न चाले
ह्यामुळे रूढलें ओीश्वर-नाम ।
विचारितां ओोल सत्य-नाम अेक
पूर्णार्थ-सूचक विन्या म्हणे ॥

४

४ ब्रह्म सत्य हा तो लौकिक अुच्चार
तात्त्विक विचार सत्यं ब्रह्म ।
सूर्य तेथ प्रभा सत्य तेथ ज्ञान
विशुद्ध विज्ञान चिद्रूप जें ।
सत्य ज्ञान दोन्ही मिळतील जेथ
तेथ शोकातीत नित्यानंद ।
सच्चिदानंद ही ऐसी ब्रह्मसंज्ञा
वेदार्ची जी प्रज्ञा विन्या म्हणे ॥

५

५ सत्याचें ह्या आराधन । साधावया हें जीवन
कार्य-मात्र सत्यासाठीं । श्वास-मात्र सत्यासाठीं
ऐसें वळण लागता । नियम सहज जडती हाता
सत्याविण नियम केला । दंभ अथवा भास झाला
अेस्या नियमाचें पालन । शुद्ध न घडे सत्याविण
नियम सत्यें सोपे जाती । विन्या म्हणे ही निश्चिती

६

६ सत्य बोलणें हा सत्यार्थ सामान्य
जगीं असे मान्य संकुचित ।

# (१)

## सत्य

### १

१ सत्य विश्वाचें ह्या मूळ । सत्य धर्माचें जें बळ
सत्याग्रह-तत्त्वसार । सत्य हे चि परमाधार
सत्य आधीं ते अुलगडू । वाणीचे हि दोष फेडू
सत्य गाअू सत्य ध्याअू । विन्या म्हणे सत्य पाहू ॥

### २

२ सत् स्वयें असणारें सत्य असणेंपण
त्याहूनि जें अन्य ते चि शून्य ।
नसे चि जे मूळीं टिकेल तें कैसें
नसे आणि नासे लटिके माया ।
वेगळे विरोधी अभाव हे तीन
पदार्थालागून वर्ग होती ।
सत्यसंबंधात तिन्ही वर्ग अेक
जो मिथ्या-नामक विन्या म्हणे ॥

### ३

३ अीश्वरासि मिथ्या न होणें अशक्य
म्हणूनि तो सत्य स्वयें होय ।
सत्य हें चि नाम सत्य हें चि रूप
सत्य चि संकल्प अीश्वराचा ।

अभ्यास वैराग्य हे दोन अुपाय
म्हणे करित जाय साक्षेपेंसी ।
सत्याचा चि ध्यास ह्या नाव अभ्यास
अन्यत्र अुदास वैराग्य ते ।
धन ऋण दोन्ही मिळूनि साधन
परिपूर्ण जाण विन्या म्हणे ॥

९

९ सावकासि येथें असावी सूचना
सत्याची कल्पना बहुविध ।
अेकाचे सत्य त अेकाचें असत्य
अनुभव नित्य येअील हा ।
परी येथ नाहीं भिण्याचें कारण
असेल प्रयत्न शुद्ध जरी ।
अेकविध भाव मोकळे चिंतन
निष्ठेचे हे दोन पक्ष थोर ।
गगन-विहारी सत्याची भरारी
दोन्ही पक्षावरी विन्या म्हणे ॥

१०

१० पानें मोजिता अगणित । वृक्ष अेक हें गणित
तेसीं सत्यें भिन्न भिन्न । मूळ सत्य तें अभिन्न
अेक अीश्वर अैसें । भक्तामाजीं विविध भासे
तैसा सत्याचा प्रभाव । सत्य अीश्वराचें नाव

वाणींत कृतींत विचारात सत्य
विशाळ हा अर्थ घेऊं आम्ही ।
व्यापक हें सत्य संपूर्ण जो जाणे
त्यासि तों जाणणे उरलें नाहीं ।
ज्ञान-मात्र सत्यीं असे सामावलें
सहज हाता आलें विन्या म्हणे ॥

७

७　सत्यावेगळें ते ज्ञान मिथ्या होय
आनंदासि साय तेथें कैंची ।
ज्ञान आनंद ह्या सापेक्ष कसोट्या
भुलवण्या मोठ्या व्यवहारीं ।
सत्याची कसोटी निरपेक्ष निश्चित
सांगेल त्वरित कार्याकार्य ।
पहावें न पहावें पढावें न पढावें ।
सत्यासि पुसावें विन्या म्हणे ॥

८

८　सत्य कामधेनु सत्य परिस मणि
परी त्रिभुवनीं दुर्लभ कीं ।
सत्याचें तें मुख हिरण्मय पात्रें
झाकिलें विचित्रें मायामोहें ।
मोह निरसूनि सत्य जडे कैंवी
दयावंत दावी अुपाय तो ।

१३

१३ दधीचि प्रल्हाद शिबि हरिश्चंद्र
प्रभु रामचंद्र भीष्मदेव ।
हसन हुसेन मन्सूर सुक्रात
ख्रिस्त-आदि संत निष्ठावंत ।
प्रसंगीं चिंतावे सत्याचे हे मूर्त
ज्वलंत दृष्टांत लहानथोरीं ।
चालतां बैसतां खातां पितां गातां
हासतां खेळतां सत्य ध्यावें ।
सत्याचे चि ध्यानीं लावूनिया मन
निर्दोष नि स्वप्न निद्रा घ्यावी ।
रत्न-चिंतामणि सतां सत्य जैसें
आम्हां व्हावें तैसें चिन्या म्हणे ॥

---

त्यासि भासलें जें सत्य । तेणें सेवावें तें नित्य
ह्यात काहीं दोष नाहीं । विन्या म्हणे कर्तव्य हि ॥

११

११ सत्य देखण्यात असू शके भूल
आप चि निर्मूळ होईल ती ।
सत्य-शोधकें तों तप चि करणें
आपण सोसणें दु:खभार ।
सत्य शोधण्यात मरूनि सुटणें
स्वार्थाचें साडणें करूनिया ।
*नि:स्वार्थ शोधनीं त्रुटी असतरी*
न चुके निर्धारीं विन्या म्हणे ।

१२

१२ चुके टेंच लागे पुन्हा ये सरळ
सत्याचा प्राजळ मारग हा ।
सत्याराधना ही भक्ति म्हणविते
फार आवडते हरीते जी ।
भक्ति परी मिळे जीवाचिये साटीं
भ्याडपणें गोष्टी बोलू नये ।
हरीचे मारगीं नसे हार जाणें
मरूनिया जिणें यंत्र येथ ।
सत्य चर्या ऐसी करिता ही भली
अहिंसा लाभली विन्या म्हणे ॥

१३

१३ दधीचि प्रह्लाद शिबि हरिश्चंद्र
प्रभु रामचंद्र भीष्मदेव ।
हसन हुसेन मन्सूर सुक्रात
ख्रिस्त-आदि संत निष्ठावंत ।
प्रसंगीं चिंतावे सत्याचे हे मूर्त
ज्वलंत दृष्टांत लहानथोरीं ।
चालतां बैसतां खातां पितां गातां
हासतां खेळतां सत्य ध्यावें ।
सत्याचें चि ध्यानीं लावूनिया मन
निर्दोष निःस्वप्न निद्रा घ्यावी ।
रत्न-चिंतामणि सत्ता सत्य जैसें
आम्हां व्हावें तैसें विन्या म्हणे ॥

(२)

# अहिंसा

१

१४ सत्य अहिंसेचा सरळ हा जैसा
अरुंद हि तैसा पथराज।
असि-धारा तीक्ष्ण निशिली साहाणे
तीवरी चालणे जणूं येथ।
दोरी तरी जाड भली डोंबाऱ्याची
सत्य-अहिंसेची फार सूक्ष्म।
चुकूनि प्रमाद अल्पसा हि झाला
तोल गमावला आला खालीं।
सावध साधना करी प्रतिक्षण
तेधवा दर्शन विन्या म्हणे॥

२

१५ परी सत्याचें दर्शन। न संभवे देहीं पूर्ण
जरी प्रतिमेनें लक्षून। होऊं शको आकलन
सत्य शाश्वत ती वस्तु। देह नासकी अवस्तु
शाश्वताचा साक्षात्कार। देह कैंची साहे भार
श्रद्धेच्या चि म्हणुनी मार्गें। विन्या म्हणे जावें लागे॥

३

१६ द्यांवनि लाभली युक्ति अहिंसेची
सत्य-शोधकाची जीवन-कळा।

वाटे जाता आली विषम अडचण
सोडवूं साहून संहारूं वा ।
संहारूं पाहता प्रगति कुंठित
पुढें जाणे होत साहूनिया ।
प्रथमीं संहारीं कळलें हें तथ्य
शोधीं मी जें सत्य ब्यतरीं तें ।
संहारे सहारे सत्या अंतरावे
मागें मागें यावें हें चि लाभे ।
मुख्य अतराय वसे अंतरात
बाह्य तें निमित्त विन्या म्हणे ॥

४

१७ लुटावया चोर येता । त्यासि दडूनि लाविता
पळे तेथुनी तो जरी । अन्य घरीं चोरी करी
तें हि आमुचे कीं घर । आंधळी ही कोरिंवीर
चोर कर्तव्य मानुनी । चोरी करी आवर्जुनी
अुपद्रव चि थोरावला । विन्या म्हणे बोध झाला ॥

५

१८ दंडणें असार साहणें चि सार
सुचला विचार अनुभवें हा ।
साहता साहता शोधन होओील
दृष्टि निवळेल दुर्जनाची ।
म्हणूनि प्रयोग नवा आरंभिला
अनुभव तो आला मग नवा ।

आपणावेगळा दुर्जन म्हणूनि
नसे चि तो प्राणी जगामाजा ।
सखे हे सोयरे सकळ आम्हांसि
दडारें कोणासि विन्या म्हणे ॥

६

१९ परी केवळ साहता । निपजू पाहेल भ्याडता
म्हणूनिया शोध केला । धर्म थोर सापडला
खळ आमुचे सोयरे । आम्ही जरी मानू खरे
तरी तैशी ती भावना । अुमटावी त्याचे मना
अैसे अुपाय योजणे । आत्मीयता पसरे जेणे
हा चि पथ अहिंसेचा । विन्या म्हणे पुरुषार्थाचा ॥

७

२० सादर सहन प्रखर शोधन
धैर्य सरक्षण निरंतर ।
अैसा प्रेम पथ राजू हा जागृत
सकळ पुनीत होती येणें ।
वैरी करी साह्य चोर बंधु होय
वक्रता हि जाय खळाची ती
पाअुलापाअुलीं अीश्वराचें भान
सत्याचें दर्शन अधिकाधिक ।
भासूनि क्लेशाचा असूनि सुखाचा
पथ अहिंसेचा विन्या म्हणे ॥

८

२१ क्लेश जिरविण्यांत वाढे सुख शांति
धैर्याची ती वृत्ति दृढ होय ।
नित्यानित्यभेद नीट कळूं लागे
विवेक अुमगे कर्तव्याचा ।
दुरभिमान गळे नम्रता अुजळे
परिग्रह तो टळे सहज चि ।
देहाचें मालिन्य झिजत चि जाय
चित्त निरामय विन्या म्हणे ॥

९

२२ अहिंसा ही नव्हे वस्तु जी केवळ
अुभी राहे स्थूळ दृष्टीपुढें ।
न मारणे सीमा नव्हे अहिंसेची
रेखा आरंभाची शरीर ती ।
कुविचार-मात्र हिंसेचें लक्षण
अनृत-भाषण तें हि हिंसा ।
अुतावळी वृत्ति हिंसेची ती मूर्ति
द्वेषाची प्रवृत्ति स्पष्ट हिंसा ।
जग वाढी त्याचें स्वामित्व राखणें
ती हि सूक्ष्मपणें हिंसा होय ।
ह्या सर्वांनिराळी पूर्ण वीर्यशाली
अहिंसा बोलिली विन्या म्हणे ॥

१०

२३ भुकेलागीं पर्ही मेघूं जाता ग्राम
जगाचीं ती आम स्थान गुतें ।
अुभे राह् तेथें असंख्यात जीव
त्याचा तो चि ठाव सकोचीत ।
काय देह सोडूं तरी न सुटका
अधिक चि देखा गुंत होय ।
देहीं देह-भाव विचारें वर्जून
वर्तणें हीं खूण विन्या म्हणे ॥

११

२४ विचारें देहाचा संबंध जो फेडी
देह चि तो सोडी त्यासि अंतीं ।
मग अखंडित होय आत्म-भान
सत्य-नारायण त्याचें नाव ।
परी हें दर्शन नसे अुतावळें
लाभे योग्य वेळे साधकासि ।
तोंवरी हा देह जाणुनी राखण
घेअू प्रयोजून साधनेत ।
साधूनि साधना अनासक्ति–योगें
क्रमू पथ वेगें विन्या म्हणे ॥

१२

२५ अहिंसेचें सोपेपण । तें चि अत्यंत कठिण
*अहिंसा चि सहनवृत्ति । अहिंसा चि अनासक्ति*

येथुनी जी तेथवरी । लभ्य होय जैशापरी
लभ्य होता होता होय । विन्या म्हणे हा निश्चय ॥

१३

२६ येथें अेक मानू जे स्वयं-प्रमाण
असो त्याचें ज्ञान सकळांसि ।
सत्याचें शोधन अहिंसेवाचून
न घडेल जाण कालत्रयीं ।
सत्य अहिंसा ही नाम-मात्रें भिन्न
वस्तुता अभिन्न ओतप्रोत ।
सुपम वस्तूची दोन्ही मम अंगें
डावें अुजवें सांगे तेथ कोण ।
सत्य अहिंसेचा ह्यापरी अभेद
परी अेक भेद कल्पूं तेथ ।
सत्य म्हणू साध्य अहिंसा साधन
चालतू शोधन विन्या म्हणे ॥

१४

२७ साधन हातींचें ह्यास्तव अहिंसा
परम धर्म असा डंका गाजे ।
सत्य साध्यरूपें म्हणवे ओश्वर
नित्य निर्विकार निरंजन ।
साधन सेविता साध्य कधीं तरी
अवश्य पदरीं पडेल चि ।

(३)

# ब्रह्मचर्य

१

२९ ब्रह्मचर्य जाणूं साधनेचें बळ ,
व्रत जें अढळ नैष्ठिकांचें ।
वस्तुतां सत्य हें मूळ महा-व्रत
त्यांतुनी तदर्थ निघती अन्य ।
सत्याचा पुजारी वरला सत्यासि
भजतां अन्यासि व्यभिचारी ।
विकार सेवणें कैसें मग होय
तेणें ब्रह्मचर्य स्वभावें चि ।
प्रवृत्ति रंगली सत्याराधनेत
विषय-वृत्ति तेथ जुळे कैंची ।
विलासें तों सत्य कोणासि लाभलें
ऐसें न देखिलें विन्या म्हणे ॥

२

३० लक्षूनिया अहिंसा हि । निष्कर्ष तो हा चि येथी
पूर्ण अहिंसा-पालन । नव्हे ब्रह्मचर्याविण
अहिंसा ती संयम-वृत्ति । ब्रह्मचर्याची जी ख्याति
वना वना मेळ झाला । विन्या म्हणे तो पडताळा

३

३१ अहिंसेचें नाम अनासक्त प्रेम
तें तों स्वात्माराम फक्त जाणे ।

जयाची गुंतली विषयीं वासना
क्रोध भय तृष्णा त्याने पाठीं ।
विकारांनीं ऐसी मालिका लागली
अहिंसा मोडली भागवून ।
विकारांची गुंत तोडुनी मोकळा
अहिंसक झाला चिन्या म्हणे ॥

४

३२ अहिंसेचें नाम विश्वव्यापी प्रेम
संकुचिता धर्मे मैत्री लाभे ।
स्त्रियेची पुरुषाची अन्योन्यबद्धता
तिथें व्यापकता कल्पवेना ।
एकमेकांसाठीं प्रेम राखियलें
जगासि उरलें काय मग ।
संकुचित भाव तोडुनी मोकळा
अहिंसक झाला चिन्या म्हणे ॥

५

३३ आपुलें वेगळें कुटुंब निर्मिता
विश्व-कुटुंबता दुरावली ।
म्हणूनि विवाह अहिंसा-निष्ठेंत
होय अमंगल स्वभावता ।
असंगत जेथ विवाह-विचार
तेथ अनाचार निषिद्ध चि ।

विकार चि सर्व तोडुनी मोकळा
अहिंसक झाला विन्या म्हणे ॥

६

३४ मग जे विवाह करूनि बैसले
सत्यासि मुकले काय सारे ।
काय सत्यार्पण तयाचे हातून
व्हावया साधन नसे काही ।
ह्यासाठीं अुपाय थोरानीं योजिला
अनुभवे चागला सिद्ध झाला ।
झाला विवाह तो विसरूनि समूळ
वर्तणे निर्मळ विन्या म्हणे ॥

७

३५ अुभय दपती भावाबहिणीपरी
देखितील जरी अेकमेका
तरी तो जोजार सपला चि सारा
वासनेचा थारा मोडला की ।
माता भगिनी कन्या कल्पिता स्त्री-जाति
अुचावेल वृत्ति त्या चि क्षणीं ।
मोचक मृचक सरस सुंदर
थोर हा विचार विन्या म्हणे ॥

८

३६ दपतींची ह्यात नसे लेश हानि
लाभानी चि धाणी सापडली ।

संकोच-निस्तारे कुटुंब विशाळ
प्रेम हि निर्मळ वाढू लागे ।
अन्योन्याची सेवा अधिक चांगली
होऊं शके भली निर्विकार ।
अेकमेकांतील क्लेशाचें कारण
निरमूनि जीवन गोड होय ।
स्वार्थी संकुचित अेकांगी जें प्रेम
क्लेशाचें तें वर्म विन्या म्हणे ॥

९

३७ ब्रह्मचर्य-हेतु मुख्य हा कळला
करूनि ठसला चित्तावरी ।
मग भासतील गौण चि ते सारे
लाभ जे दुसरे शारीरिक ।
वीर्य हानीचा चि करूनि विलास
पिळणें देहास कैसी मूर्छा ।
देहाचें बुद्धीचें संजीवन-कार्य
साधावया वीर्य अपेक्षित ।
विषय भोगांत त्याची अुधळण
रोगा आमंत्रण विन्या म्हणे ॥

१०

३८ ब्रह्मचर्य हें पाळावें काया वाचा मनें
चित्त साह्य केल्याविण विफळ सा

बाह्य अंकुशांत काय राखुनी शरीर
जरी अंतरी प्रीतीनें पोषिला विकार ।
वरी वरी संयम केला वृत्ति सोडी स्वैर
अनुभवाचें शास्त्र त्यास म्हणे मिथ्याचार ।
देह-दमनें तो हानि मोकाटिता मन
मनामागें जाय अती विन्या म्हणे तन ॥

११

३९. जाणणें अवश्य भेद येथ अेक
अन्यथा साधक भांबावती ।
साधकाची दशा आणि मिथ्याचार
ह्यांतील अंतर स्पष्ट व्हावें ।
मन बलात्कारें जाय विषयांत
साधकाचा हेत नसता हि ।
तेथ त्या मनाशीं साह्य नाकारणें
साधकाची येणें सार्थकता ।
विपर्यी मनाशीं आतुनी सहकार
तो चि मिथ्याचार विन्या म्हणे ॥

१२

४० देह वश राहे मन धुंद पाहे
हा तों नित्य आहे अनुभव चि ।
म्हणूनि स्वप्नि देहासि जिंकूनि
मनानें दमना शङ्क सदा ।

प्रयत्नवाद हा साधकासि शोभे
तेणे सिद्धि लाभे परिणामीं ।
देह नियमूनि मनासवें युद्ध
ह्यात विसंवाद न मानावा ।
देह आवरूनि मनाचें लालन
विसंवाद-खूण विन्या म्हणे ॥

१३

४१ ब्रह्मचर्याचे पालन । दुःसाध्य चि मानी जन
ह्याचें शोधितां कारण । दृष्टि-दोष ये अुमगून
ब्रह्मचर्याचा तो अर्थ । फार घेतीं संकुचित
अर्थ-संकोच हा जनीं । विन्या म्हणे करी हानि ॥

१४

४२ ब्रह्मचर्य म्हणिजे अुपस्थ-संयम
व्याख्या ही निर्भ्रम मानियेली ।
परी अेकांगी ती म्हणूनि अयथार्थ
अनुभवें निश्चित कळू आली ।
सकळ अिंद्रियें राखणे संयमीं
ब्रह्मचर्य आम्ही त्यास म्हणू
अितर अिंद्रियें जरी निरंकुश
अेक चि ते वश कैंवी होय ।
तैसा तो प्रयत्न ठरेल निष्फळ
ह्यात काय बोल विन्या म्हणे ॥

१५

४३ विषयाचा शब्द श्रवणीं अैकेल
नयनीं निरखील हीन रूप ।
सविकार रस जिह्वेनें चाखील
करानीं करील काम्य स्पर्श ।
अुत्तेजक गंध घ्राणें स्वीकारील
अुघडी राखील द्वारें अैसीं ।
तरी ब्रह्मचर्य पाळावें म्हणेल
कैसा तो फळेल मनोरथ ।
आगीत पडूनि जळूं नये देह
अैसी च ती हाव विन्या म्हणे ॥

१६

४४ क्षरेल ते जरी अेक हि अिंद्रिय
तरी ब्रह्मचर्य रिता घट ।
सकळ अिंद्रियें रोधितां समग्रें
शीघ्र ते साधू ये साधकांसि ।
कठिण चि परी होअील सुलभ
जरी घेअू लाभ अनुभवाचा ।
ब्रह्मचर्याभ्यासीं सर्वांग-संयम
करूं हा नियम विन्या म्हणे ॥

१७

४५ रोधूं सर्व चि अिंद्रियें । ब्रह्मचर्य तैं साधू ये
परी त्यांत ते प्रधान । स्वादेंद्रिय घेअी स्थान

प्रयत्नवाद हा साधकासि शोभे
तेणें सिद्धि लाभे परिणामीं ।
देह नियमूनि मनासवें युद्ध
ह्यांत विसंवाद न मानावा ।
देह आवरूनि मनाचें लालन
निमवाद-भ्रूण विन्या म्हणे ॥

१३

४१ ब्रह्मचर्याचें पालन । दुःसाध्य चि मानी जन
ह्याचें शोधितां कारण । दृष्टि-दोष ये अुमगून
ब्रह्मचर्याचा तो अर्थ । फार घेती संकुचित
अर्थ-संकोच हा जनां । विन्या म्हणे करी हानि ॥

१४

४२ ब्रह्मचर्य म्हणिजे अुपस्थ-संयम
व्याख्या ही निर्भ्रम मानियेली ।
परी अेकांगी ती म्हणूनि अयथार्थ
अनुभवें निश्चित कळों आली ।
सकळ अिंद्रियें राखणें संयमा
ब्रह्मचर्य आम्ही त्यास म्हणूं
अितर अिंद्रियें जरी निरंकुश
अेक चि तें वश कैसें होय ।
तैसा तो प्रयत्न ठरेल निष्फळ
ह्यांत काय बोल विन्या म्हणे ॥

न भेदिना स्वाद-वृत्ति । विषय सारे फोफावती
म्हणुनी अस्वाद वेगळें । विन्या म्हणे व्रत योजिलें ॥

१८

४६ ब्रह्मचर्य सांगे आपुला तो भाव
सकळां स्वयमेव स्पष्टपणें ।
ब्रह्म नांवें सत्य विशाळ जें ध्येय
त्यासाठीं तें योग्य साधन मी ।
नका करूं माझा संकुचित अर्थ
होईल अनर्थ साधकांसि ।
ध्येय पूर्ण राखा साधन हि पूर्ण
शीघ्र चि प्रसन्न होईन मी ।
ब्रह्मचर्याचा हा संदेश उदार
आचरा तत्पर विन्या म्हणे ॥

स्वाद-वृत्तीने अतिरिक्त सेवन
ते व्रत-भंजन अघट चि ।
स्वाद संपादाया योजिणे मिश्रण
ती तो व्रत-हीन वृत्ति जाणं ।
लक्ष्य जरी त्याचे देही प्रयोजन
शास्त्रीय वर्तन ते चि होय ।
बुद्धया आरोपिणे मिथ्या प्रयोजन
ते दंभ-लक्षण विन्या म्हणे ॥

४

५० रस-स्वाद वर्जे शरीर-धारण
कसोटी प्रमाण अगीकारे ।
मग भोज्य वस्तु व्यर्थ भाराभर
सोडितील घर आपण चि ।
सोडता अडगळ मोकळे अंतर
सहज विकार शमतील ।
विकार-शमन देह अनामय
आत्म-रसमय विन्या म्हणे ॥

५

५१ बुद्धि-हीन मीन आमिषा भुलून
गळ चि गिळून त्यजी प्राण ।
रसनेचा दास रसे चि मारिला
जगाचा अकिला दीनवाणा ।

दुर्जनाची करी नमूनि चाकरी
चातुर्य-कुसरी ही च मानी ।
रसना-जयेंविण कदापि जीवन
न राहे स्वाधीन विन्या म्हणे ॥

६

५२ अस्वाद-साधन स्वाधीन सुंदर
नियटाया आहार समतोल ।
दुर्लक्षिला परी जनीं हा विषय
विवेक यासीय मावळला ।
मायबाप मोहे लाड चि करिती
स्वाद शिकविती नानापरी ।
तेणे रोग-बीज शिरे शरीरात
जिह्वा लोलपत भ्रष्ट होय ।
शरीर जर्जर विकारी अंतर
भिकार संसार विन्या म्हणे ॥

७

५३ नित्य पुरवूनि रसनेचा छंद
भोगी बुद्धि-मंद माना क्लेश ।
व्यर्थ वेंची धन आटवी जीवन
वैद्यासि शरण सर्व काळ ।
शरीर इंद्रिये पुरुषार्थ-साधने
राबवावीं जेणें स्वामीपणें ।

तो हा देह-दास इंद्रियाचा दीन
राहिला होऊन पंगू जैसा ।
दैन्य हें फिटाया अस्वाद-अभ्यास
करणें सोल्लास विन्या म्हणे ॥

८

५४ देह नीरोग निर्मळ । लोकां अत्यंत दुर्मिळ
स्वादें अल्प चि सेविला । देह तेव्हां चि भ्रष्टला
जिह्वा लाळिली कौतिकें । देहा दूषी हे न चुके
मग अगत्य उपवास । विन्या म्हणे होय त्यास ॥

९

५५ अस्वाद-व्रताची दुष्कर ही सिद्धि
परी येथ बुद्धि खचू नये ।
व्रत घेतां क्षणीं तयाचें पालन
न घडे परिपूर्ण सफलें चि ।
व्रत घेणें ह्याचा गति-शील अर्थ
झटणें, तदर्थ निरंतर ।
काया-वाचा-मनें मरणान्त झुंजणें
व्रत सार्थ येणें विन्या म्हणे ॥

१०

५६ व्रत मूल-स्पर्शी अवश्य कठिण
व्याख्या परी न्यून करूं नये ।
ती आत्मवचना सत्य-विडंबना
तेथून तों पतना आरंभ चि ।

आदर्श चि केला सोईसाठीं क्षीण
सांभाळील कोण साधकासि ।
ह्यासाठीं व्याख्या ती पूर्ण चि घेऊन
तोलावा प्रयत्न विन्या म्हणे ॥

११

५७ आदर्श चिंतावा देह-निरपेक्ष
तो चि आत्म-साक्ष संकल्पावा ।
सामर्थ्य-सर्वस्व समर्पावें त्यात
हा होय पुरुषार्थ शोभिवत ।
देह-पुरीमाजीं पुरुष विराजे
पूरक तो साजे अपूर्णांचा ।
अपूर्णाची पूर्ति पुरुषाचे हे ब्रीद
हा चि आत्म-वाद विन्या म्हणे ॥

१२

५८ महा-व्रतें पाळूं शके जो परिपूर्ण
वासना जिरवून सार्वभौम ।
जाणावा तो मुक्त तो चि भगवंत
त्यास कांहीं येथ कृत्य नाहीं ।
आम्हीं अल्प जीव जिज्ञासु साधक
सत्याचे शोधक सत्याग्रही ।
प्रयत्न-निष्ठा ही आमुची मिरास
सेवूं तो निरलस साधकाश्र ।

मग करीं होऊं औश-कृपे पात्र
जाळ रस मात्र विन्या म्हणे ॥

१३

५९ अस्वाद व्रताची जाणूनि थोरीव
आरंभूं अभिनव त्याचा यत्न ।
त्यासाठीं न लागे करणें रात्रदिन
आहार-चिंतन घोळ घोळूं ।
पाहिजे ती अेक अखंड जागृति
जिनें चित्त वृत्ति आकळेल ।
साधूं देह-कार्य किंवा सेवूं स्वाद
ह्याचा मग भेद अुमगूं लागे ।
देअूं स्वाद तो तो तोडूं दृढपणें
मुक्ति-लाभ येणें विन्या म्हणे ॥

१४

६० अस्वाद-दृष्टीची अेकत्र रसोय
येथ बहु साह्य करूं शके ।
सकळांचे स्वास्थ्य लक्षूनि तटस्थ
राधितील जेथ राधणारे ।
साधकासि मग नको खाद्य-चिंता
त्याचें नीं सर्वथा सोपें काम ।
राधिल्यातुनि जें आपुलें अुचित
तें आत्म शमित स्वीकारावें
हरीचें मिश्रण करूनि जेवावें
मत सरावें विन्या म्हणे ॥

१५

६१ वस्तुता अग्नीचा आदर्श स्थितींत
अरे मर्यादित अुपयोग ।
सूर्यपक्क अन्न बोलिलें अमृत
मानवा विहित ते चि होय ।
निसर्गें योजिला फळांचा आहार
स्वत्वें जो अपार तृप्ति देअी ।
परि त्यामधें हि अुणा नसे स्वाद
अिच्छीतसू छेद ज्याचा आम्ही ।
ह्या कामीं समर्थ अेक चि हत्यार
वैराग्य प्रखर विन्या म्हणे ॥

१६

६२ देह असे यंत्र मी तों यंत्री आत्मा
निश्चळ ही प्रमा सपादावी ।
अहंता न देहीं कधीं चुकू धारी
विवेके स्थापावी आत्म्यामाजीं ।
अवश्य यंत्रास स्नेहन तें देणे
जरी काम घेणें त्यापासूनि ।
स्नेहनीं न युक्त त्याग किंवा राग
युक्त ती निःसंग कार्य-दृष्टि ।
अस्वाद साधाया मुख्य हें विज्ञान
जाअू त्या शरण विन्या म्हणे ॥

(५)

# अस्तेय

१

६३ अस्तेय आमुची अधिकार मर्यादा
सर्वांसि सर्वदा सुआग्रह ।
देशी मर्यादा ही लाभ अमर्याद
भेदें चि अभेद साधूनिया ।
अस्तेय-पालनें कार्पण्य मावळे
विग्रह तो टळे सामाजिक ।
सर्व रत्नें सर्वां सदा उपस्थित
अस्तेय-फलित विन्या म्हणे ॥

२

६४ अस्तेयादि जें जें बोलिलेंसें व्रत
सत्य-अहिंसेंत तें सामावे ।
सत्य-अहिंसा हे अभिन्न युगल
व्रताची सफळ जन्म-भूमि ।
किंवा म्हणूं मूळ सत्य चि तें एक
अहिंसा ही लेक त्याची शोभे ।
अहिंसा ती मग जन्म दे व्रतांसि
लेकुरें सरिसी माउलीची ।
कल्पना ह्या भिन्न अर्थ परी एक
अद्वैत-सूचक विन्या म्हणे ॥

३

६५ सत्य तें निश्चळ निर्लिप्त केवळ
शोभतसे मूळ द्वंद्वातीत ।
अहिंसा प्रेमळ करी चळवळ
सत्याचा रसाळ अंकुर तो ।
सत्य तें निर्गुण अहिंसा सगुण
व्रतें सगुणांतून साकारलीं ।
सत्य दुर्विज्ञेय अहिंसा दुष्कर
व्रताचे प्रकार त्यासाठीं हे ।
वेगळे वेगळे सत्य-अहिंसेचे
पैलू चि ते साचे विन्या म्हणे ॥

४

६६ अस्तेय शिकवी सामाजिक धर्म
नका चौर्य-कर्म करूं कोणी ।
तेणें प्रीति लाजे सत्य हि दुरावे
श्रेय न संभवे समाजाचे ।
जाणता नेणता सगळे चि परी
करीतसू चोरी थोडी फार
ह्यास्तव पाहिजे वृत्ति सावधान
आणि विश्लेषण विन्या म्हणे ॥

५

६७ वस्तु दुसऱ्याची घेतली हिरूनि
संमतीवांचूनि पहिली चोरी ।

वस्तु आपुली हि भोगिली लपवूनि
घरच्यापासूनि दुसरी चोरी ।
वस्तु सामूहिक सेविली लपवूनि
समूहा वंचूनि तिसरी चोरी ।
वस्तु अस्वामिक मानुनी अुचलली
वाटेवरी पडली चौथी चोरी ।
चोरीचे हे असे प्रकार विचारावे
विवरूनि वर्जावे **विन्या** म्हणे ॥

६

६८ वर्जिले हे स्थूल चोरीचे प्रकार
अस्तेयाचे घर परी दूर ।
दुसऱ्याची वस्तु मागूनि घेतली
चोरी न बोलिली ती तों जगीं ।
परी त्या वस्तूची गरज नसता
चोरी चि तत्त्वता होअील ती ।
सूक्ष्म हा विवेक पारखिल्याविण
अस्तेय अपूर्ण **विन्या** म्हणे ॥

७

६९ गरज ती खरी किंवा काल्पनिक
निवाडा अचूक कोण करी ।
खाद्य वस्तूंचा तो मोह महा भारी
गरजा विस्तारी दूरवरी ।

तेणें अंगें चोरी सहज फावली
जीवनीं मुरली कळे चि ना ।
कळे चि ना मूळीं कळली हि सुटेना
विवेक भेटेना विन्या म्हणे ॥

८

७० वाढली गरज चोरींत परिणमे
धरी बहु नामें बहु रूपें ।
अेक तो शासक अेक तो रक्षक
अेक अुपदेशक क्रिया-शून्य ।
अेक अव्यापारी नटला व्यापारी
अेक धंदे करी माननीय ।
अेक काढी कर्ज अेक घेअी व्याज
अेक सोडी लाज याचनेची ।
चोरीचे विचित्र विवर्त हे सारे
विवेकें विचारें ओळखावे ।
राखावा संयम तेथ चौकीदार
तरी चि निस्तार विन्या म्हणे ॥

९

७१ संयमाची मात्रा वाढवीत जावी
चाळणा करावी अहर्निशीं ।
गरजा अनेक आरोपिता येती
सोडिल्या सुटती क्रमें क्रमें ।

सत्य सावराव्या मिथ्या निवाराव्या
गौण आवराव्या यथा-शक्ति ।
येणे आत्मा तोपे शरीर न शोपे ।
समाज हि पोपे विन्या म्हणे ॥

१०

७२ मानसिक चोरी ती तों सूक्ष्मतम
तेथ हि संयम पुरवावा ।
वस्तु अनधिकार मने अभिलाषिली
चोरी च ती झाली बीज रूप ।
मनाची ती चोरी मने चि हेरावी
मने चि वजावी मनामाजीं ।
प्रक्रिया ही सारी हृय मनोमय
अस्तेय-हृदय विन्या म्हणे ॥

(६)

# शरीर-श्रम

१

७३ देह परीश्रम जनीं अनिवार्य
शोधिले कर्तव्य गोपकानीं ।
मनने अनुभवे गळीं अुतरले
जीवनीं मुरलें साधकाच्या ।
'मजूरी करा नि मिळवा भाकरी'
आज्ञा ही ओश्वरी भगू नये ।
देहाचे ते अन्न देहे संपादावे
चिंतन राखावे आत्म्यासाठी ।
निढळाचा घाम यज्ञीय ते द्रव्य
जीवनाचे काव्य विन्या म्हणे ॥

२

७४ जगावया आम्ही सृष्टीस राबवू
अुच्छेदू मळनू क्षीण करू ।
पूर्तीसाठी नित्य श्रमरूप यज्ञ
सुचवी सर्वज्ञ गीतेमाजी ।
पशूचे पालन वृक्ष-संवर्धन
स्वच्छता-साधन अुत्पादन ।
यज्ञ हे वर्जिता जगा चोर होणे
पाप चि भक्षिणे अन्नमिषें ।

शाप हा टाळाया श्रम व्रत घ्यावें
शतजीव व्हावें विन्या म्हणे ॥

३

७५ लाक्षाधीश लोळे सदा खाटेवरी
पाक सिद्ध, परी भूक नाहीं ।
मिळे गोड घास मुखीं न ये रस
मग धरी कास व्यायामाची ।
हालविणें देह हा-ना-त्या प्रकारें
देव-बलात्कारें राया रंका ।
मग का टाळावा अुत्पादक श्रम
सकळांचे क्षेम विन्या म्हणे ॥

४

७६ शेतकरी करी शेतावरी काम
तयासी व्यायास कासयासी ।
नव्वद नव-लक्ष्मी निर्मिती ह्या परी
दहांनी ती थोरी का सोडावी ?
करूं या मजूरी सगळे मिळून
सकलायतन स्वराज्य ते ।
केवढें आरोग्य किती सुख शांति ।
नांदेल जगतीं विन्या म्हणे ॥

५

७७ बुद्धिमंत जरी शेतात राबती
सुधारेल शेती सहज चि ।

मजूराचे हाल मग टळतील
चिंतनीं राहेल समतोल ।
भक्ति आणि भूक उभय प्रेरणा
तुष्टतील जना सकळांच्या ।
नव्हे गुतागुन जीवन सरळ
होईल मंगळ विन्या म्हणे ॥

६

७८ श्रम निष्ठा जरी धरूं निरपवाद
उंच नीच भेद निवारेल ।
आज तो दुपली वर्ण-योजना हि
भेदाचा गंध हि नव्हता जेथें ।
श्रमाची व्यवस्था म्हणजे वर्ण-निष्ठा
श्रमाची अनास्था वर्ग-भेद ।
गाडाया हे भूत अंग मेहनत
मंत्र-तुल्य व्रत विन्या म्हणे ॥

७

७९ समाज भगूनि मजूर मालक
गरीब धनिक विभागले ।
गरीब मत्सर धनी तिरस्कार
करूनि चतुर म्हणविती ।
श्रमो-पासनेनें समाज साधणे
भेदासी भेदणें चातुर्य तें ।
भुकेपुरतें अन्न अन्नापुरता श्रम
सुवर्ण-नियम विन्या म्हणे ॥

८

८० देह-श्रमोपात्त तें चि निज वित्त
विनोदार्थे चित्त तेवढ्यानें ।
घरीं आलें धन नावेमध्यें पाणी
टाकावें काढूनि दो हातांनीं ।
सांचलें तें धन पर-स्व जाणूनि
लावावें कारणीं समाजाच्या ।
करो सेवेसाठीं धनाची राखण ।
थोर महाजन विन्या म्हणे ॥

९

८१ वाछी जो जीवनीं अहिंसा-पालन
सत्य-आराधन निराबाध ।
त्यास हे श्रमाचे व्रत रामबाण
श्रमें सुप्रसन्न मन बुद्धि ।
अंग मर्दनानें जळूनि कषाय
होय ब्रह्मचर्य स्वाभाविक ।
देह-परिश्रम सहज वैराग्य
साधनें चे भाग्य विन्या म्हणे ॥

१०

८२ श्रमा माजी श्रम शेतीचा उत्तम
गरज प्रथम पुरवी जो ।
भूक मानवाची भूक मानवतेची
तृप्त होय साची शेतीमाजी ।

वृक्ष पशु पक्षी मानव मिळून
कुटुंब महान किसानाचें ।
अपार माधुर्य विशाल बांधव्य
जीवन तें दिव्य विन्या म्हणे ॥

११

८३ आज सारे शेती करूं न शकती ।
परी ध्येय चित्तीं असूं द्यावें
आदर्शी अटळ राखूनिया प्रेम ।
इतर हि श्रम आदरावे ।
शेतीची पुरवणी मुख्य ते विणकाम
कांतण्याचा नेम काल-क्षेम ।
सुतारी लोहारी कुंभारी चाभारी
जीवनोपकारी विन्या म्हणे ॥

१२

८४ व्हावे सकळांनी आपापला भागी
मुरो सर्वांअंगी श्रम-धर्म ।
खाय त्यासी करणे मल-विसर्जन
त्याचे निस्तरण सहज त्यास ।
प्रत्यहीं मळासी नीट निरखूनि
टाकावें झांकूनि मृत्तिकेनें ।
येणें लक्ष्मी वाढे आरोग्य हि जोडे
देहासक्ति मोडे विन्या म्हणे ॥

१३

८५ भंगीकाम नित्य राहो व्यक्तिगत
किंवा कुटुंबात आटोपावें ।
धंदा म्हणुनी भंगी ज्या कोणी कल्पिला
जनीं रूढविला महादोष ।
श्रम-साधनेचा ह्यास्तव आरंभ
शोभवावा शुभ भंगीकामें ।
अहंता मलीन भंगूनिया भंगी
रंगला श्रीरंगीं विन्या म्हणे ॥

१४

८६ केवळ शरीर कर्म करी त्यास
कर्माचें किल्बिष न बाधे चि ।
जाणूनिया संतीं केलीसे मजूरी
श्रमाची भाकरी करूनी गोड ।
नम्रतेची अुंची माप नसे तीस
जाणीव ज्ञानास नसे जेथें ।
मजूरीचीं कामें तीं च विद्यापीठें
जेथ आत्मा भेटे विन्या म्हणे ॥

१५

८७ श्रमोपासनेंत कल्पू नये बाध
बाळ रुग्ण वृद्ध यांच्या नांवें ।

बाल मातेमाजीं सामावूनि जाय
रुग्ण कोण होय निसर्गात ।
श्रमण तो नव्हे वृद्ध हि अक्षम
श्रमाचे हे वर्म अनुभावें ।
सङ्कल्प वर्जिता मन होय निष्काम
श्रम चि विश्राम त्रिन्या म्हणे ॥

---

# प्रस्तावना

राम-नामाविषयीं गांधीजींच्या विचाराचा संग्रह अगदीं अैन वेळीं माझ्या हातात पडला. म्हणजे ज्या वेळीं मला त्याची गरज होती, त्या च वेळीं देवानें तो माझ्याकडे पाठविला. 'सर्वोदय' मासिकाकडे अभिप्रायासाठीं अनेक पुस्तकें येत असतात. त्यात च राम नामाचें पुस्तक हि येअून हजर झालें. अितर पुस्तकें तर मीं कमी च पाहूं शकतों, पण याच्या चिंतनात मी लीन होअून गेलों

माझ्यासाठीं बापूंनी आपला संदेश जणू या पुस्तकानें दिला. मी दीड-दोन वर्षे भारत-यात्रा करीत होतों. तीस वर्षे अनेक-विध रचनात्मक कामात घालविलीं. चिंतन हि नाना-विध घडलें. त्याचा निष्कर्ष लोकांना समजावीत होतों पण प्रवासाचा मला तितकासा अनुभव नसल्यामुळें अनियमितता होअून शरीरात रोगानें प्रवेश केला, आणि मला पोट-शूळ सुरू झाला. निसर्ग-अुपचार आणि राम-नाम याचा प्रयोग करण्याची संधि जणू अीश्वरानें मला दिली. 'सदा सर्वदा सन्निध' असणाऱ्या त्या 'कृपाळू' ने जणू भक्ताचें "अल्प धारिष्ट" आजमावून पाहण्याची अिच्छा केली. आपण च शिकविलेल्या विद्येची गुरु परीक्षा घेत असतात, तसा हा प्रकार मला दिसूं लागला मीं नम्रपणे प्रवास तहकूब केला आणि आत्म-संशोधनास लागलों.

या काळात अितर कामें दूर सारलीं होतीं, कारण तो विश्रांतीचा काळ मानलेला होता. तरी पण सर्वोदयाच्या संपादनापुरतें काम करीत होतों. आणि गीताअीचा कोश पुरा करायचा होता, त्यात कांहीं वेळ देत होतों. या शिवाय अितर हालचाल बहुतेक बंद होती. त्या

समयाला भारतन् कुमारअप्पानी केलेला बापूंच्या राम-नाम विषयक विचाराचा संग्रह हाती पडला. मला वाटलें, धन्वतरीने माझ्या रोगासाठी दिव्य वल्ली पाठविली. आणि मी तिचे आस्थेनें सेवन करूं लागलों.

ते विचार पचविण्यासाठी मी जे चिंतन केलें तें च लेखाच्या रूपाने 'सर्वोदय' मध्यें हिंदी भाषेंत व्यक्त केलें. माझें साधारण बहुतेक लिखाण मूळ मराठींतन होत असते. कारण ती च भाषा मला येते. पण हें लिखाण मूळ हिंदींत च लिहिलें होते. कारण मूळचे हिंदी पुस्तक च माझ्यासमोर होते. तदनुरोधानें चिंतन हि हिंदींतन च करीत होतों. त्यामुळे लेखन हि हिंदींत च केलें. त्याचें हे मराठी भाषांतर प्रभाकरने केलें. त्याने 'सेवक' मासिकाचा अेक अंक भरला. तो च हा पुस्तकाकारात प्रकाशिला जात आहे. त्याला माझी ही प्रस्तावना आहे.

मूळ हिंदी लेख वाचून अनेकानी फार समाधानाचे अुद्गार काढले. अनेकाची मला पत्रें आलीं की या लेखाने त्याच्या जीवनाला नवीन दिशा दिली. अेकाने तर लिहिलें, "बापूचे राम-नामविषयक विचार मी नेहमी च वाचत आलो आहे. तरी पण माझ्या हृदयात त्याचा ठसा तितकासा अुमटत नसे. तुमच्या या लेखानें संशयाचा छेद च केला" हा अर्थात् केवळ गौरव आहे. तथापि सदर वाचकाला हा जो अनुभव आला तो हि माझ्या कल्पनेबाहेर नाही. समुद्राचा जो अुपयोग माणसाला होत नाहीं तो समुद्रापासून च पोषण मिळविलेल्या मेघाचा होतो, असें आपण पाहतो. तसें च हे आहे. विशिष्ट पचनेंद्रियाना पौष्टिक अन्न सगळ पचूं शकत नाही. ते च पचवून दिलेलें पचतें. तशासारखी ही गोष्ट आहे.

ज्या रीतीनें नाम-स्मरणाची श्रद्धा माझ्या चित्तांत मी ठसविली आणि अनुभवली आहे त्या रीतीनें या लेखांत मी वाचकांसाठीं ती मांडली आहे. त्यानें मला माझें चिंतन आणि अनुभव नीट जुळविण्याची संधि दिली. आणि तिचा मला नेमका अुपयोग हि झाला. तुलसीदासांनीं रुग्णावस्थेंत 'हनुमान-बाहुक' लिहिलें. त्यानें त्यांच्या रोग-परिहाराला मदत झाली, असें सांगतात. मोठी अुपमा लहान वस्तूला कशी शोभणार? तथापि माझ्यापुरता हा लेख 'हनुमान-बाहुक' च झाला आहे.

---

(१)

# प्रास्ताविक

## चिरंतन साहित्य

बापूंनी वेळोवेळीं राम-नामाच्या बाबतींत जे काही विचार प्रकट केले त्याचा हा लहानसा संग्रह भारतन कुमारअप्पा यानीं तयार केला आहे आणि नवजीवन प्रकाशन मंदिर, अहमदाबाद तर्फे प्रकाशित करण्यात आला आहे. यामध्ये काही बापूचे लेख आहेत, काही त्यांची भाषणे आहेत, आणि काहीं पत्रें आहेत. परिशिष्टामध्ये बापूंच्या शेवटच्या जीवनात रामनाम कसे अंत-र्बाह्य ओतप्रोत होते त्याचे वर्णन करणारी ओक स्मरण-कथा जोडण्यात आली आहे.

हें पुस्तक थोडक्यात सर्व काहीं आहे. व्रत-चर्येचे विवरण करणारे बापूचे 'मंगल प्रभात' ही जशी ओक चिरंतन साहित्य म्हणून राहणारी वस्तु आहे तशी ही आहे तिचे थोडे चिंतन मी अिथें करू अिच्छितो.

(२)

## अंतरंग-प्रवेश

### नामाच्या निरूपणांत अभेद

परमेश्वराच्या नावाचा महिमा सर्व धर्मांनी गाइला आहे प्रत्येक धर्माची जीवनाकडे पाहण्याची आपआपली विशिष्ट दृष्टि असली तरी ह्या विषया त्यांच्यात काहीं दृष्टि-भेद नाहा की विचार भेद नाहा. ओश्वराच्या अनेक गुणाना अनुसरून अनेक नामाची कल्पना करून आपआपली रुचि आणि आवश्यकता ह्याना अनुरूप अशा त्या त्या नामाचा जप किंवा सर्व नामाचा संमिलित जप करण्याची प्रथा सर्व धर्मांनीं चालविली आहे, आणि जगातील सर्व संताना आपल्या अनुभवाच्या द्वारे तिचे समर्थन केल आहे सगुण-निर्गुणाचा देखील भेद येथे नाहींसा झाला आहे नानकाचा 'जपुजी' आणि ज्ञानदेवाचा 'हरिपाठ' दोन वेगवेगळ्या संप्रदायाचे असून देखील नाम निरूपणात त्याच्यात काहीं भिन्नता नाहीं भागवत भगवताचीं मंगल नामें गाते आणि कुराण अल्लाच्या 'अस्मा अुल हुस्ना' ची तस्बीह (जप माळ) करते अेक संस्कृत आणि दुसरे अरबी अितका च फरक

### भारतांत नाम-रसाची विपुलता

भारतातील प्रत्येक भाषेंत नाम रसाने भरलेलें साहित्य विपुल आहे. नाम-रसायनाच्या सेवनात कोणती हि भाषा दुसऱ्या कोणत्या हि भाषेच्या मागें नाहीं. तुलसीदास, चैतन्य, तुकाराम, नरसी मेहता किंवा नम्माळवार वेगवेगळ्या भाषेमधें लिहितात, परंतु जणू काय अेक-मेकाचे ते भाषांतर करीत आहेत तुलसीदासाच्या रामायणामधें तर

रामापेक्षा हि नामाला श्रेष्ठ महत्त्व आहे आणि दोघांची तुलना करणारें अेक अत्यंत गोड, लहानसें 'नामायन' च त्यांना रचलें आहे. गांधीजींना तेथून च स्फूर्ति मिळालेली आहे आणि त्याचा अर्थ स्वत: च्या अनुभवानें आपल्यासमोर खुला केला आहे.

**वेदांत नाम महिमा**

नामानुभूतीचा प्रथम अुद्गार, जो आपल्याला वाङ्मयात आढळतो तो म्हणजे वेद. ऋग्वेदात नाम हा शब्द तर शंभर-अेक वेळा आला असेल, परंतु सर्व वेदाचें सार परमेश्वर नाम च आहे, अशी अुप-निषदांनीं घोषणा केली आहे

'सर्वे वेदा यत् पद आमनन्ति ।'

सर्व वेद अीश्वराच्या नामाचें च आमनन करतात यावरून च वेदाला *आम्नाय म्हणजे परमेश्वराच्या नामाचें आमनन करणारा* अशी संज्ञा मिळाली आहे आमनन म्हणजे विस्तृत मनन. ही च श्रद्धा संतांना दृढ केली आहे. वैष्णव भक्त तुकाराम म्हणतो —

"वेद अनंत बोलिला, अर्थे अितुकाचि साधिला ।
विठोबासी शरण जावें, निज-निष्ठा नाम गावें ।।"

वेदानें जरी अनंत व्याख्यान केलें आहे, तरी सार हे च आहे का विठ्ठलाला शरण जावें, आणि त्याचे नाम निष्ठा पूर्वक गावें त्याला संस्कृत भाषा येत नव्हती, तरी त्याला वेदाच्या साराचा पत्ता लागला आहे, अितकें च नव्हे तर तो आत्म-विश्वास-पूर्वक म्हणतो,—

वेदाचा तो अर्थ आम्हासी च ठावा
येरानीं वहावा भार माथा ।

'वेदांचा भावार्थ आम्ही च जाणतों, दुसरे तर भारवाही आहेत.' वैष्णव तुकारामानें जे वेद-सार जाणले, ते च तामिळचे शैव-शिरोमणि ज्ञानसंबंधर याना हि कळले होते·

वेद नान्गिनुम् मेय पोरुळावदु
नाद-नामम् नम शिवायव ।

चारी वेदात जर काहीं सारभूत सत्य असेल तर ते म्हणजे भगवान् शिवाचे नाव.

हे काहीं केवळ दुसऱ्याच्या साक्षीचा किंवा श्रद्धेचा विषय नाहीं. वेद स्वत· आपल्याविषयीं ते च सागतात—

ऋचो अक्षरे परमे व्योमन्
यस् तत् न वेद किम्-ऋचा करिष्यति ।

वेदाच्या सर्व ऋचा म्हणजे वेद-मत्र अेका अक्षरात साठविले आहेत, अेका परमेश्वराच्या नावात, जें हृदयाच्या परम आकाशात लपले आहे, तें जो ओळखणार नाहीं तो वेदाचे मत्र घेअून काय करील ? ते अक्षर ओम् मानले गेले आहे. तो च सगळ्यात रममाण होणारा राम.

गांधीजींना वारंवार विचारण्यात आले आहे—तुमचा राम कोणता ? तेव्हा त्यानीं ह्या च परम रमणीय सर्वांतर्यामी आत्मारामाचा निर्देश केला आहे. लोक विचारतात—तो दशरथनदन आहे काय ? त्यावर मी अुत्तर देतों—दशरथाने आपल्या मुलाला ज्याचे नाव दिलें होतें तो च तो आहे. तो विश्व-नंदन आहे म्हणून दशरथ-नंदन आहे. तो विश्वरूप आहे, विश्वातीत आहे.

'तुका म्हणे जें जें बोला । तें ते साजे या विठ्ठला'

तुकाराम म्हणतो, विठ्ठलाला जें काहीं म्हणावें तें त्याला शोभून जातें.

अेकदां तुकारामाला देवाचा राग आला असतां, देवाला तो म्हणूं लागला—'हे देवा, आज मी तुला शिव्या देतों. तूं गाढव आहेस, तूं कुत्रा आहेस, तूं भारवाही बैल आहेस.' विष्णूचें सहस्र-नाम हें च तेवढें विष्णूचें, आणि हीं नावें कोणा दुसऱ्याचीं, असें का आहे? विष्णु-सहस्रनामांत पहिलें नांव च विश्वम् आहे. सगळें विश्व हरिनाम आहे. समजणारानें समजून घ्यावें.

वेदात देवाचे 'चारु नाम' गाणारे कित्येक मंत्र आहेत. परंतु त्या सर्वांमधें खालील मंत्र भक्तमंडळींत विश्रुत आहे—

> मर्ता अमर्त्यस्य ते भूरि नाम मनामहे ।
> विप्रासो जातवेदसः ॥

"हे देवा, आम्ही मरणधर्मा आहोंत, तू अमृत-स्वरूप आहेस. आम्ही ज्ञानाचे अुत्सुक [विप्र] आहोंत, तूं जाणणारा ज्ञानमय आहेस. आम्ही [अल्प] तुझ्या विशाल नामाचे मनन करतों." मंत्रामधें 'भूरि' म्हणजे विशालच्या तुलनेनें 'अल्प' शब्दाचा अध्याहार समजायला पाहिजे. ह्यामधें आपल्याला दिसून येअील, नामाच्या मननाचा अुल्लेख आहे, त्याच्या केवळ अुच्चारणाचा नव्हे. आणि हें च गांधीजी *वारंवार सांगत आहेत*—"राम-नाम हृदयापासून घ्यायचें आहे, केवळ वाणीनें नव्हे. रामनाम केवळ बाह्य क्रिया नाहीं, तें अतःशोधनाचें साधन आहे." नामचिंतनाच्या ह्या सर्व-मान्य मंत्रामधें अुपनिषदाची ती सुप्रसिद्ध प्रार्थना-त्रयी लपलेली आहे.

> असतो मा सद् गमय ।
> तमसो मा ज्योतिर् गमय ।
> मृत्योर् मा अमृतं गमय ॥

जें असत् तें च संकुचित किंवा अल्प. जें सत् तें च ह्या मंत्रामध्यें निर्देशिलेलें भूरि. बाकीच्या दोन प्रार्थना तर प्रकट च आहेत.

**नाम शब्दाचा अर्थ**

आपलें हें मनन पुढें चालवूं या. पण त्यापूर्वीं नाम शब्दाचा अक्षरार्थ काय होतो तें हि जरा पाहून घेऊं. नाम शब्द 'नम्' धातू पासून झालेला आहे. त्यापासून च नम्र आणि नमस्कार शब्द साधलेले आहेत भक्ताला नाम असत्यांतून सत्यांत घेऊन जाईल, अंधारांतून प्रकाशांत घेऊन जाईल, मृत्यूतून अमृतांत घेऊन जाईल. त्यापूर्वीं त्याला तें नम्र करील. नम्रतेशिवाय सत्याचें शोधन होऊं शकत नाहीं; त्यामुळें सर्व वैज्ञानिक नम्र असतात. नम्रतेशिवाय चित्ताचें शोधन होत नाहीं; म्हणून सर्व आध्यात्मिक नम्र असतात. बापूची ती अद्भुत प्रार्थना, 'हे नम्रतेच्या देवा, तुझी स्वतःची नम्रता तूं आम्हाला दे.' तिचें इथें स्मरण झाल्याशिवाय राहत नाहीं. ती आम्हा सर्वांना, मी म्हणणार होतों नित्य प्रातःस्मरणीय, पण नित्य निरंतर स्मरणीय आहे. नम्रतेचे उपासक श्री. किशोरलालभाई यांनीं लिहिलें आहे, "ईश्वराला उद्देशून गांधीजींचें हें संबोधन धार्मिक साहित्यांत अपूर्व होय. त्यांनीं ईश्वराला चौदा भुवनांचा स्वामी, गो-लोक, वैकुंठ किंवा स्वर्ग यांचा निवासी इत्यादि म्हटलें नाहीं, तर परमशून्य निरहंकाराचा लौकिक भाषेंत अनुवाद करून 'नम्रतेचा देव' म्हटलें." किशोरलालभाईंचें हें म्हणणें सामान्यतः ठीक आहे. परंतु जेव्हां आम्ही नाम शब्दाचा अक्षरार्थ, भावार्थ आणि अनुभवार्थ पाहतों, तेव्हां बापूच्या त्या विशेषणाला अपूर्व कसें म्हणतां येईल ?

आणि वास्तविक नाम माहित यांच्या सर्व प्रवादाशी ज्यांचा परिचय आहे ते त्याला अपूर्व मानणार नाहीत. बापूचें त्यात वैशिष्ट्य अवश्य आहे, तरी भगवंताला दिलेलें तें विशेषण पूर्वीच्या भक्तांचें सुद्धां च आहे. अुपनिषदात अेका ठिकाणी म्हटलें आहे—

तत् नम अिति अुपासीत नम्यते अस्मै कामा ।

‘नम्रतेच्या स्वरूपात त्याची अुपासना करावी अशा प्रकारें जो अुपासना करील त्याच्यापुढें सर्व कामनाना नमावें लागेल. अर्थात् तो सर्वतोपरी निर्विकार बनेल.’ वेदामधें अीश्वराला नम्रतेची मूर्ति म्हणून वर्णन करणारें अेक वाक्य असें आहे—

नम अित् अुग्रे नम आ विवासे नमो दाधार पृथिवीं अुत द्याम् ।

‘नम्रता च अुच आहे मी नम्रतेची अुपासना करतो. नम्रतेनें पृथ्वीला आणि स्वर्गाला धारण केलें आहे’ ह्या वाक्यावरून स्पष्ट होते की अिथें नम्रता हें परमेश्वराचें संबोधन आहे. बापूनी अीश्वराच्या नम्रतेचें वर्णन करताना ‘दीन भंग्याच्या हीन कुटीचा निवासी’ म्हणून त्याला संबोधिलें आहे. वेदात म्हटलें आहे—“तुझ्या मित्रत्वाला कोणा टाळू शकत नाही, कारण जो गाअीची अिच्छा करतो, त्याच्यासमोर तू गाय होअून अुभा राहतोस आणि जो घोड्याची अिच्छा करतो त्याच्यासाठीं तू घोडा होतोस”

गौ असि गव्यते, अश्वो अश्वायते भव ।

अशा नम्र अणि सहज वश होणाराची मैत्री कोण टाळू शकेल? सारांश, नाम स्मरणापासून सर्वांत पहिली आणि सर्वांहून जास्त अपेक्षा नम्रता-लाभाची आहे, आणि असायला पाहिजे, हे नाम शब्द च सांगत आहे

---

(३)

## त्रिविध मुक्ति

**अेक आख्यायिका**

आता आपण पुस्तकाच्या अंतरंगात प्रवेश करू. मला हें पुस्तक वाचून विष्णु सहस्रनामाच्या शांकर भाष्याचें स्मरण झाले. त्या भाष्यामध्यें अेकअेका नामाचें निर्वचन करीत-करीत भाव-विवरण केलें आहे. बापूच्या ह्या पुस्तकात नाम स्मरणाचें अनेक पैलू आधुनिक भाषेंत अुकलून दाखविले आहेत. ते सर्व त्या भाष्यात लपलेले आहेत. लपलेले अेवढ्यासाठीं म्हणतों कीं भाष्याची लेखन-शैली सूत्ररूप आहे त्यामुळें पुष्कळसा अर्थ स्वचिंतन करून काढावा लागतो तरी च त्यात कल्पना आहे. त्या भाष्याविषयीं अेक फार मनोरंजक आख्यायिका सांगण्यात येते अेसें म्हणतात कीं शंकराचार्यांचें ते पहिलें लेखन आहे ते शास्त्रातील अेखाद्या वचनाचें मनन पाटीवर रोज लिहून ठेवीत असत. परंतु ते टिकत नसे. सरस्वती ते लेखन आपल्या हातानें पुसून टाकीत असे शेवटीं त्यानीं विष्णु-सहस्रनामाचें मनन लिहिणें सुरू केलें पण ते सरस्वतीनें पुसलें नाहीं. कोणाचें कोणतें लेखन कालात्मा पुसून टाकणार आहे आणि कोणतें लेखन राहू देणार आहे, मला ठाअूक नाहीं. बहुत करून मनुष्याचें सगळें वाङ्मय तो पुसून टाकू अिच्छील हा च संभव फार. तरी परमेश्वराचें नाव मात्र टिकून राहणार, यात शंका नाहीं.

(अ) भय-मुक्ति

ह्या पुस्तकाचें विश्लेषण केलें तर तीन मुक्तींचें दर्शन होतें. (१) भय मुक्ति, (२) विकार-मुक्ति व (३) रोग-मुक्ति. बंगालमध्ये हिंदू

अत्यंत भयभीत असलेले बापूंनी पाहिले तेव्हा त्यावरचा अुपाय म्हणून त्यांनी सादर केलं रामनाम. अेका व्याख्यानात ते म्हणतात—

"आपल्या मनातून तुम्ही भीति काढून टाकाल तर मी म्हणेन तुम्ही मला फार मदत केली. पण तुमची ही भीति दूर करू शकेल अशी जादूची वस्तु ती कोणती? ती म्हणजे राम-नामाचा अमोघ मंत्र. कदाचित् तुम्ही म्हणाल, राम-नामावर आमचा विश्वास नाही. त्याला आम्ही जाणत नाही. परंतु त्याच्याशिवाय तुम्ही अेक श्वास-देखील घेअू शकत नाही. राम पवित्र लोकांच्या हृदयात नेहमीं असतो. रामनामाला मिळून वागाल तर तुम्हाला जगात अितर कोणाला भिण्याची गरज राहणार नाही. 'अल्ला हो अकबर'च्या घोषांनी तुम्हाला भय वाटण्याचे कारण काय? मुसलमान धर्माचा अल्ला तर निरपराध्यांचें रक्षण करणारा आहे. अीश्वरावर जर तुमची श्रद्धा असेल तर कोणाची छाती आहे तुमच्या स्त्रियांच्या आणि मुलींच्या अब्रूला हात लावण्याची? तुम्ही भय सोडून द्याल अशी मला अुमेद आहे. तुम्ही पूर्व बंगाल सोडण्याचे मनात आणता कामा नये. अिथें च तुम्ही राहिलें पाहिजे. आणि जरूर तर शूर पुरुष आणि स्त्रियाप्रमाणे अब्रूचें रक्षण करता करता मृत्यूला कवटाळलें पाहिजे. संकटाचा सामना करण्याअैवजीं त्यापासून दूर पळणे म्हणजे मनुष्याची मनुष्यावर, अीश्वरावर आणि स्वत:वर असणारी श्रद्धा नाकबूल करण्यासारखें आहे. आपल्या श्रद्धेचें असे दिवाळें काढण्यापेक्षा मनुष्यानें पाण्यात जीव देणे चांगलें.

**अभय प्रवर्तन**

ह्याचे अधिक विवरण करण्याची गरज नाही. गांधीजींनी आयुष्यभर जर कोणतें अेक सार्वजनिक काम केलें असेल तर हे च

कीं लोकांना निर्भय बनवायचें. आश्रमच्या व्रतांत निर्भयतेचें अेक स्वतंत्र व्रत च त्यांनीं घातलें निर्भयता नसेल तर मनुष्य-जीवनांत कांहीं सार च राहत नाहीं हा कांहीं नवीन विचार नाहीं सगळ्या समाज-व्यवस्थेचा आणि राज्य व्यवस्थेचा अुद्देश च आम्ही लोकांत अभय-प्रवर्तन करणें मानला आहे सांप्रत 'लॉ अॅन्ड ऑर्डर' म्हणतात, परंतु आमचा शब्द होता 'अभय.' त्या अभय प्रवर्तनांत आपण अपेशी आहों असें जिथें गांधीजींना दिसलें तिथें त्यांनीं 'रघुपति राघव राजाराम' ची धुन चालवली. परंतु 'अल्ला हो अकबर' आणि 'हर हर महादेव' हे दोन्ही अुद्‌घोष जे अेकमेकांचे जणू अनुवाद आहेत आणि जे अल्लाची तकबीर म्हणजे हराची महत्ता गातात, ते भयापहारी होण्या-अैवजी भयप्रद कां झालेत ?

**रामनामाच्या अुत्तम शस्त्राला मजबूत ठेवा.**

तोंडानें अीश्वराचें नाव घ्यायचें आणि हातानें बांधवांची कत्तल करायची हा क्रम मधल्या काळांत अितका चालला कीं, कांहीं सज्जन अीश्वराच्या नांवाला च कंटाळले आणि ते म्हणू लागले, "आम्हाला अीश्वर नको आणि त्याचें नाव हि नको. आम्हाला प्रेम पुरे." मी त्यांना म्हणतों, अशी हार खाअू नका. जे हृदयांत प्रेम राखू अिच्छितात, रामनाम त्यांचें च शस्त्र आहे. मनुष्य-द्वेष्ट्यांचें तें शस्त्र नाहीं तुम्ही आपलें शस्त्र शत्रूच्या हातीं सोंपवू नका. लोक वैराग्याचा दुरुपयोग करतात, तर आम्ही म्हणतों आम्हाला वैराग्य नको. लोक संन्यासाचा दुरुपयोग करतात, तर आम्ही संन्यास शब्दाची घृणा करूं लागलों. लोक भक्तीचा दंभ करतात तर आम्ही भक्तीचा तिरस्कार करूं लागतों. अशाप्रकारें अेक अेक पवित्र शब्द आणि अेक अेक अुत्तम शस्त्र आम्ही

दुसऱ्याचा हातीं सोंपवीत जातों. ही देखील मला भयभीत दशा वाटते. हें भय देखील आम्हीं सोडलें पाहिजे, आणि आपलीं शस्त्रें आपल्या हातीं दृढ ठेवलीं पाहिजेत.

## (आ) विकार-मुक्ति

### त्रिविध अुपाय

आता दुसरी विकार-मुक्ति, म्हणजे काम-विजय, किंवा ब्रह्मचर्य-सिद्धि. ही अेक पूर्ण साधना आहे. हिच्यात सर्व अिंद्रियांच्या संयमाचा मुख्यतः स्वादेंद्रिय संयमाचा किंवा जिभेवर ताबा ठेवण्याचा अंतर्भाव होतो; निर्विकारतेची अेक विशेष साधना म्हणून आणि तिच्या सिद्धीची अेक विशेष कसोटी म्हणून रसना-जयाची साधना परमार्थ-मंडळांत सर्व-मान्य आहे. परंतु रसनेच्या विषयाशीं जीवन निगडित असल्यामुळें दुसऱ्या अिंद्रियांचा संयम करण्याचा प्रयत्न करीत असतांना देखील प्रायः जिभेला सैल सोडलें जातें. ही अेक मोठी चूक आहे. ह्यामुळें वासनेच्या मुळाचें सिंचन होतें आणि वासना-वृक्ष वरवर शाखा तुटल्या तरी अधिक प्रफुल्लित होतो. म्हणून रसना-जयाच्या आवश्यकतेचें भान करवून देत असतां ह्या पुस्तकांत त्यासाठीं अुपाय असे सांगितले आहेत.

(अ) पहिला स्थूल आणि सर्वसामान्य अुपाय म्हणजे मसालें वगैरे अुत्तेजक पदार्थांचा यथाशक्य सर्वथा त्याग करणें.

(आ) दुसरा अधिक बलवान अुपाय म्हणजे भोजन स्वादा-करिता नव्हे तर केवळ शरीर-रक्षणासाठीं च आपण करतों अशी भावना वाढविणें. ह्याला हवेचा आणि पाण्याचा दृष्टांत दिला आहे.

"हवा जशी आपण स्वादाकरिता घेत नाहीं तर श्वासाकरिता घेतों, किंवा पाणी जसें केवळ तहान शमविण्याकरिता पितों, तसें च भोजन केवळ भूक शमविण्याकरिता केलें पाहिजे."

ज्ञानदेवाच्या सूत्ररूप भाषेत

"साधकाला प्राण-वृत्तीने जगलें पाहिजे, वासना-वृत्तीने नव्हे." त्यांनी याचे व्याख्यान असे केलें आहे—"जेवण्यात नको जिभेच्या तृप्तीची कीं शरीराला बलवान् करण्याची कीं भुकेचे कष्ट नाहींसे करण्याची वासना; तर केवळ हवी प्राण-धारणाची, शरीरापासून साधना घेण्याकरता त्याला तितका आधार देण्याची दृष्टि."

जिभेच्या तृप्तीचा निषेध तर बापूंनी वारंवार केला च आहे. परंतु शरीराला बलवान् करण्याच्या वासनेचा देखील त्यांनीं या पुस्तकात अेका ठिकाणीं निषेध केलेला आहे, तो विशेष लक्ष वेधून घेतो.

"जसा जसा आत्मा निर्विकार होत जातो, तसें तसें शरीर देखील निरोगी होत जातें. परंतु अिथें निरोगी शरीराचा अर्थ बलवान् शरीर असा नाहीं. बलवान् आत्मा क्षीण शरीरात देखील वास करतो जसजसे आत्मबल वाढत जातें तसतशी शरीराची क्षीणता वाढते. पूर्ण निरोगी शरीर अगदीं क्षीण देखील असू शकते. बलवान् शरीरात बहुत करून रोग राहतात."

हा अेक विशेष विचार आहे. ह्याच्या तार्किक परिक्षणात पडण्याचे कारण नाहीं परंतु जेव्हा ज्ञानदेवासारखे ज्ञानी आणि बापूजीसारखे कर्मयोगी अेका च परिणामावर पोंचतात तेव्हा तदनुकूल चिंतन करून त्याला अनुभवाच्या कसोटीवर कसलें पाहिजे. भुकेचे कष्ट निवारण करण्याचा देखील ज्ञानदेव निषेध करतात, ह्याचा अर्थ अितका च समजला पाहिजे कीं कोणत्या हि वृत्तीने अभिभूत होअून भोजन करायला नको, तर साधनेच्या सिद्धीकरता शरीराला भोजन देणें आम्ही ठरविलें आहे, अेवढ्यासाठीं भोजन करायला पाहिजे.

अशाप्रकारें विविध-वासना-वर्जित आहार-सेवनाची वैज्ञानिक वृत्ति हा रसनाजयाचा दुसरा उपाय सांगितला आहे.

(अि) रामनाम हा तिसरा अुपाय आहे. त्याला ते अुत्तम अुपाय किंवा सुवर्ण-नियम म्हणतात.

"आपापल्या भावनेनुसार अीश्वराच्या कोणत्या हि नामाचा जप करायला हरकत नाहीं. जपात तल्लीन होअून जायला पाहिजे. जप करताना दुसरे विचार आल्यास चिंता नाहीं. श्रद्धापूर्वक जप करीत राहिलें तर शेवटीं यश मिळाल्याशिवाय राहणार नाहीं."

**तिन्हींचा संक्षेप : रामनाम**

साराय आहार-शुद्धि, वैज्ञानिक दृष्टि आणि नामस्मरण हे निर्विकारता-प्राप्तीचे तीन अुपाय सांगितले. परंतु तिन्हींचा संक्षेप शेवटीं ते रामनामात च करतात. ते म्हणतात—

"ब्रह्मचर्य-रक्षणाचे तथाकथित नियम म्हणजे अेक खेळ च आहे. खरें आणि अमर रक्षण अेक रामनाम च आहे."

नंतर तोल सांभाळून ते म्हणतात—

"हे अचूक साधन प्राप्त करण्याकरता अेकादश-व्रते आहेत च. पण कित्येक साधनें अशीं असतात की त्यातून कोणतें साधन आणि कोणते साध्य आहे हे सांगणे मुष्कील होतें"

अितकें सांगून पुन्हा ते आपली निष्ठा दृढ करतात—

"संयमाचा सोनेरी रस्ता आणि त्याचें अमर रक्षण अेक रामनाम च होय."

हे वाचून लहानपणीं पाठ करून घेण्यात आलेलें रामरक्षा-स्तोत्र मला आठवलें. त्या स्तोत्राची कल्पना अद्भुत आहे.

## (अ) रोग-मुक्ति

**विकार-मुक्तीचा बाह्य प्रकार**

आतां राम-नामानें रोग-मुक्ति. या पुस्तकाचा अर्ध्यापेक्षां अधिक हिस्सा या विषयानें च व्यापला आहे. त्यामुळे चित्तावर असा परिणाम होअूं नये कीं नाम-स्मरणाचा सर्वोत्तम लाभ म्हणजे हा च. या विषयाचा अितका विस्तार होण्याचें हें कारण आहे कीं गरिबांकरतां नैसर्गिक अुपचाराचा शोध करीत असता बापूना हें सुचलें आहे. आणि त्याचा प्रचार करण्याच्या मागें ते लागले होते, त्यामुळें या विषयावर अलीकडे ते नेहमी बोलत असत.

"रामनाम हें सर्वत्र विद्यमान असणारें रामबाण औषध आहे. याचें चक्क ज्ञान अगदीं प्रथम अुरुळी-कांचनमध्यें च मला झालें असें वाटतें."

जेव्हा त्या वस्तूचें दर्शन झालें तेव्हा त्या वस्तूचा प्रचार ते करीत गेले. पुन्हा हें हि लक्षांत ठेवलें पाहिजे कीं रोग-मुक्तीला विकार-मुक्तीहून ते वेगळे मानीत च नाहींत. तिला ते विकार-मुक्तीचा च अेक बाह्य प्रकार समजतात. त्यांनीं निश्चयपूर्वक म्हटलें आहे कीं 'निर्विकार मनुष्याला रोग होअूं च शकत नाहींत.' या वचनांत मतभेदाला हि अवकाश असणें शक्य आहे, आणि महापुरुषांचे दृष्टांत देअून आक्षेपकांनीं ह्यावर आक्षेप घेतले हि आहेत. आणि त्याचें त्यांनीं नम्रतापूर्वक अुत्तर दिलें आहे.

"निसर्गाचे नियम महापुरुषांना हि लागू आहेत."

**मनाची दुर्बळता**

आपल्यांविषयीं ते लिहितात —

"माझ्या विचारांचे विकार क्षीण होत आहेत, पण अजून त्यांचा

नाश होऊं शकला नाहीं. मी जर विचारावर देखील पूर्ण विजय मिळवूं शकलों असतों तर गेल्या दहा वर्षांत जे तीन रोग मला झाले ते कधीं झाले नसते."

नंतर ते पुन्हां लिहितात —

"मला झालेला अपेंडिसायटिस रोग हा माझ्या मनाच्या दुर्बलतेचें फळ होतें आणि मी ऑपरेशनकरता तयार झालों हीं देखील माझ्या मनाची दुर्बलता च होती, असें मी मानतों. माझ्यामध्यें अहंकाराचा पूर्ण अभाव असता तर मीं स्वतःला भवितव्यतेच्या हवाली केलें असतें."

पचवीस वर्षांपूर्वी हे शब्द लिहिलेले आहेत. मृत्यूच्या अेक दिवस आधीं लिहिलेल्या पत्रात ते म्हणतात —

"हा वेळेस किडनी आणि लिव्हर दोन्ही बिघडलीं आहेत. माझ्यामतें रामनामात माझा विश्वास कच्चा असल्यामुळे हे आहे."

**त्यांची श्रद्धा**

त्याच्याशीं झालेल्या प्रथम संवादात च त्यांची ही श्रद्धा मीं अैकली होती. ७ जून १९१६ ला मी पहिल्यांदा त्यांच्याकडे आलों तेव्हां अहमदाबाद जवळ कोचरबमध्यें आश्रम होता. त्यांनीं भाजी चिरायला घेतली आणि मला त्या दिवशीं त्या कामाची दीक्षा दिली. नतर जो संवाद झाला त्यात माझी प्राथमिक माहिती विचारल्यानंतर त्यांनीं आपले काहीं विचार माझ्याकरता प्रकट केले. त्यात त्यांनीं पूर्ण निर्विकार पुरुष शरीरानें देखील निरोगी असला च पाहिजे ही आपली श्रद्धा तेव्हा दर्शविली होती आणि ती तावडतोब माझ्या गळीं अुतरली.

### गीतेचा आदर्श पुरुष

त्याचें कारण कदाचित् हें असेल कीं लहानपणीं मी गीतेचा अुपासक होतों आणि गीतेनें मला ही श्रद्धा ग्रहण करण्याकरता तयार केलें होते. केंद्रच्युत अेकांगी विकासाचा आदर्श गीतेमध्यें नाहीं गीतेचा आदर्श पुरुष परिपूर्ण विकसित केंद्रस्थित आणि सर्व प्रकारें अनुकरणीय असा आहे. त्याचे बोलणे, चमणे, फिरणे, खाणे, पिणे, निजणे सर्व काहीं यथाशास्त्र होत असते. त्याने त्या त्या विषयाच्या शास्त्राचें अध्ययन केलेलें असतें असे नाहीं परंतु त्याला ते सहज सुचते कारण पारमार्थिक जीवनाकरता आवश्यक अशा सर्व ज्ञाने जिच्यात भरलेलीं आहेत अशी अेक वस्तु त्याने प्राप्त केलेली असते, असे अेक दर्शन त्याला लाभलेलें असते, त्यामुळे आणखी काहीं जाणण्याचे त्याला अुरत नाहीं.

### संग्राह्य श्रद्धा

जिथें परमेश्वराचे नाव तिथें निर्विकारता, जिथें निर्विकारता तिथें पूर्ण आरोग्य, ही अेक श्रद्धा आहे तिचा आम्ही अवश्य संग्रह केला पाहिजे हिला मी श्रद्धा म्हणतो, विचार म्हणत नाहीं परंतु हिच्यामागें विचार आहे, आणि तो गीतेनें सुचविला हि आहे निर्विकारता तेव्हा येते कीं जेव्हा सत्त्वगुणाचा अुत्कर्ष साधून मनुष्य त्यापासून देखील निर्लिप्त राहतो सत्त्व गुण अत्यंत निर्मळ असल्यामुळे त्यापासून ज्ञान आणि आरोग्य हे दोन परिणाम निष्पन्न होतात—‘प्रकाशकम् अनामयम्’ बहुधा सामान्य कल्पना अशी आहे कीं सत्त्वगुणी मनुष्य चारित्र्यवान् असेल, नितिमान् असेल, पण बुद्धिमान् हि असला पाहिजे अशी अपेक्षा लोकात नाहा तो बुद्धिमान् हि असू शकतो, मठ्ठ हि असू शकतो, अशी लौकिक कल्पना आहे तसें व सत्त्वगुणी मनुष्य लोकाच्या विचारानें

रोगी हि असूं शकतो, निरोगी हि असूं शकतो, आणि तसें आम्ही जगांत पाहतों देखील. कित्येक चांगले चांगले सज्जन सद्बुद्धि हि असतात, रोगी हि असतात परंतु गीतेची कल्पना अशी नाहीं. गीता एक शास्त्रीय व्याख्या सांगत आहे असें समजलें पाहिजे. तिथें रजोगुण आणि तमोगुण दोनीं वर्जित परिशुद्ध सत्त्वगुण असेल तिथें काय व्हायला पाहिजे याचा विचार करताना गीता म्हणते त्या च परिणामावर यावें लागतें. बिंदूची व्याख्या करूं लागलें कीं त्याला परिणामरहित च म्हणावें लागतें, मग असा बिंदु कोठें हि दिसत नाहीं ही गोष्ट वेगळी. अज्ञान देखील एक मळ आहे, रोग देखील एक मळ आहे, तेव्हा निर्मळता ही त्याची व्याख्या आहे असा शुद्ध सत्त्व-गुण हा मळाना कसा सहन करील ?

परंतु अंतिम अवस्था ही तिन्ही गुणांच्या पलीकडे आहे असें गीतेनें सांगितलें असल्यामुळें काहीं विचारक सत्त्वगुणाबरोबर आरोग्याची अनिवार्यता मान्य करीत असले तरी गुणातीत अवस्थेंत त्याची अनिवार्यता त्या प्रमाणात मान्य करीत नाहींत. आणि 'प्रकाश येवो, प्रवृत्ति येवो, मोह येवो, गुणातीत त्यापासून विचलित होत नाहीं,' ह्या गीतावचनाचा ते आधार घेतात. परंतु गीतेचा भाव समजण्याच्या बाबतींत येथें चूक होत आहे असें मला वाटतें. गुणातीत अवस्था सत्त्वसशुद्धि नंतर च प्राप्त होते. हें जर बरोबर असेल तर त्या अवस्थेंत सत्त्वसशुद्धीहून काहीं अधिक झालें पाहिजे, कमी होण्याचें कारण नाहीं. अधिक हे च कीं त्यात सत्त्वगुणाचा देखील अहंकार नाहींसा होईल व त्यामुळें त्याचें भान देखील द्रष्ट्याला राहणार नाहीं. परंतु ह्याच्यापुढें तर्क करणें मी पसंत करीत नाहीं.

आणि म्हणून च मीं प्रारंभी सांगून टाकलें आहे कीं ह्याचा मी श्रद्धेच्या रूपात च संग्रह करूं अिच्छितो. ह्या श्रद्धेपासून मला पुष्कळ आश्वासन मिळालें आहे, त्यामुळे देखील ती मला प्रिय झाली आहे.

**'स्वस्थ' याचें लक्षण**

ह्या बाबतींत आणखी अेक च गोष्ट मी जोडूं अिच्छितो. संस्कृतांत आत्मनिष्ठेचा आणि पूर्ण आरोग्याचा निर्देश 'स्वस्थ' ह्या अेका च शब्दानें केला जातो, आणि स्वस्थ पुरुषाचीं जीं लक्षणे गीतेंत दिलेलीं आहेत तीं तशीं च चरक-संहितेमध्यें दिलेलीं आढळतात.

**अेक विशेष भाव**

परंतु आत्मिक स्वास्थ्य आणि शारीरिक स्वास्थ्य यांच्या साहचर्याचा अुल्लेख करीत असता ह्या पुस्तकात दोन-तीन ठिकाणीं गहन विचारात नेअून सोडणारा अेक विशेष भाव प्रकट झाला आहे.

"जें पाहिलें आणि धर्मशास्त्रात वाचलें त्याच्या आधारावर मी या परिणामावर आलों आहे कीं मनुष्यात ह्या अदृष्ट शक्तीविषयीं पूर्ण जीवित श्रद्धा अुत्पन्न होते, तेव्हा त्याच्या शरीरात हि आतरिक परिवर्तन होते. परंतु हे केवळ अिच्छा करण्याने होत नाहीं. त्याकरता सावधान राहण्याची आणि अभ्यास करण्याची जरूरी असते. दोन्ही असून देखील अीश्वर कृपा नसेल तर मानव-प्रयत्न व्यर्थ होतो."

हा अेका प्रेस रिपोर्टचा साराश आहे ह्या नंतरच्या दोन वर्षांनतरच्या अेका लेखात बापूनीं ह्याचे अधिक स्पष्टीकरण करण्याचा प्रयत्न केला आहे.

"अेका ज्ञानी मनुष्यानें माझा लेख वाचून असे लिहिले आहे कीं रामनाम शरीराचे परिवर्तन करणारी अेक किमया आहे. वीर्याचा

संग्रह करणें जमीनींत धन पुरून ठेवण्यासारखें आहे. त्यांतून अमोघ अशी शक्ति अेक रामनाम च अुत्पन्न करू शकते. रामनामाच्या स्पर्शानें वीर्य अूर्ध्वगामी बनतें."

**दिव्य रूपांतर**

ह्यांनीं म्हणून कोणाचा अुल्लेख करण्यांत आला आहे ते मला माहीत नाहीं. पुस्तकाच्या सूचींमध्ये देखील त्याचें सूचन किंवा अुल्लेख नाहीं. परंतु शरीराच्या दिव्य रूपांतराचा हा दावा प्राचीन योग-साहित्यांत आढळतो. आधुनिक काळांत श्री अरविंद घोषांनीं हा विचार मांडला आहे. त्यांच्या विचारश्रेणीची ती अेक विशेषता मानली जाते. योग-साहित्याच्या दाव्यांत आणि बापूंच्या म्हणण्यांत साम्य दिसतें; परंतु त्यांत फरक आहे, असें मला वाटतें. यौगिक क्रियांच्या बाबतींत विचारलें असतां बापूंनीं अुत्तर दिलें आहे—

"यौगिक क्रिया मला ठाअूक नाहींत. माझी क्रिया नाम-स्मरण आहे. त्याची शिकवण मला लहानपणीं मिळाली. माझ्या मानसिक आकाशांत त्यानें आतां विशाल रूप धारण केलें आहे. ह्या सूर्यानें अतिशय घोर अंधाराच्या वेळीं मला प्रकाश दाखविला आहे."

हें स्पष्टीकरण आपल्याला फारसें मार्गदर्शन करीत नाहीं. परंतु योगसाहित्याच्या विचारांत आणि बापूंच्या विचारांत भिन्नता आहे अितकें मात्र त्यावरून स्पष्ट होतें. मी ती भिन्नता अशी समजलों आहे. योग-साहित्यांतील दिव्य देह परिवर्तन ही अेक प्रकारची सिद्धि आहे. अुलट बापूंच्या कल्पनेचें दिव्य परिवर्तन हें परमशुद्धीचा आणि अीश्वरी आविर्भावाचा सहज परिणाम आहे. ह्याचें वर्णन ज्ञानदेव आपल्या अेका अनुपम भजनांत असें करतो—

"बुद्धि आणि बोध याच्यामधें अनेक जन्मांचा वियोग होता तो आता नाहींसा झाला आहे. दोहोंचें मिलन झालें आहे. त्यामुळे हातपाय देखील सजीव झाले आहेत. साऱ्या शरीराचें दिव्य रूपांतर झालें आहे. जणू काय त्यांत अमृत-कला भरली आहे."

'रामनामानें रोग मुक्ति' याच्या अर्थाचा पल्ला अितपर्यंत आहे. हा विकार-मुक्तीचा अेक पर्याय मात्र आहे.

---

(४)

## रामनामाचा अुपचार

**व्यावहारिक विनियोग**

मला प्रतीत झालेला ह्या पुस्तकांतील तत्त्व-चिंतनाचा मुख्य अर्थ जो 'रामनामानें त्रिविध मुक्ति' तो आतापर्यंत पाहिला. ती त्रिविध देखील शेवटीं अेकविध च आहे. परंतु तिहींचे व्यावहारिक विनियोग वेगवेगळे होतात, म्हणून त्रिविध विभाजन मी अुपयुक्त समजतों. रोग-मुक्तीच्या व्यावहारिक विनियोगाचें ह्या पुस्तकांत किंचित् विस्तारपूर्वक निरूपण आलें आहे. तें च आता पाहू.

**मृदु भूमिका**

तत्त्व-विचारांतून व्यावहारिक विनियोगांत अुतरतांना बापूंची भूमिका थोडी मृदु झाली आहे. ते लिहितात—

"रामभक्त निसर्गाच्या नियमानुसार चालेल, त्यामुळे त्याला कोणत्या हि प्रकारचा रोग च मुळीं होणार नाहीं; आणि झाला तरी

पंचमहाभूतांच्या मदतीने तो त्याला बरा करील कोणत्या हि अुपायाने भौतिक दु ख दूर करणे हे काम, जे शरीराला च मानीत नाहीत त्यांच्याकडून होणे शक्य नाही आत्म्याला अलग ओळखणारा, शरीर गेल्याने घाबरत नाही, दु खी होत नाही, आणि सहजपणे शरीर सोडतो असा मनुष्य देहधारी डॉक्टर-वैद्याच्या मागे फिरत नाही ''

**तीन विचार**

आता ह्यात लागोपाठ तीन विचार दर्शविण्यात आले आहेत.

(१) भक्ताला रोग होत नाहीत

(२) झाले तरी आहारादिकांच्या परिवर्तनाने तो ते बरे करतो.

(३) रोग बरा न झाला तर शांतपणे देहाचा त्याग करतो.

ह्याचें विवरण करण्याची गरज नाही व्यावहारिक विनियोगामध्यें विचाराच्या निरपवाद दृढतेचें सौम्य रूपांतर स्पष्ट आहे.

**अिलाजापेक्षा हि मोठा चमत्कार**

अुरळी कांचनच्या व्याख्यानात हे अधिक स्पष्ट होतें.

"काहीं रोग असे आहेत की, या जगात त्यांचा काही अिलाज च नाही शरीराचा अेखादा अवयव तुटला तर पुन्हा अुत्पन्न करण्याचा चमत्कार रामनामात नाही, पण त्यात त्यापेक्षा हि मोठा चमत्कार करून दाखविण्याची शक्ति आहे. अंग भंग झाला असता किंवा रोग झाले असता हि अखंड शांति पूर्वक जीवन व्यतीत करण्याची शक्ति रामनाम देअू शकते आणि मृत्यूचे दु ख न चितेच्या विजयाची भीति नाहींशी करू शकते.

**बुद्धिवाद्यांचें समाधान**

रामनाम घेणारा आजारी पडणार नाहीं ह्यात जो चमत्कार आहे, त्यापेक्षा रोग झाले असता देखील तो शांत राहील हा चमत्कार कमी दर्जाचा नाहीं. अुलट त्यामुळें नामाचा गौरव दुसऱ्या अेका विशेष प्रकारें प्रकट होतो, असें म्हणता येअील. व्यावहारिक चमत्कार करण्यात रामनामाच्या शक्तीची जी मर्यादा मानली आहे ती कदाचित् तुलसीदासानीं मानली नसती, परंतु ह्या च कारणामुळें हें पुस्तक बुद्धिवादी मनाला देखील समाधान देअू शकतें.

**साधनेची न्यून**

सारांश, रामनामाचा अुपचार सांगण्यांत अिथे केवळ भावनामय कल्पना-शक्तीने काम घेतलें नाहीं परंतु व्यवहारात विचार कसा अुतरविता येतो अिकडे पूर्ण लक्ष देण्यात आलें आहे. राम-नामाशीं नैसर्गिक अुपचाराचा संबंध जोडण्यात आला असला तरी ह्या विचार-श्रेणीला मी " नैसर्गिक अुपचार " म्हणणार नाहीं, त्याला ' रामनामाचा अुपचार च ' म्हणेन बापूंच्या भाषेवरून हे स्पष्ट होतें. अेका ठिकाणीं ते लिहितात—

"नैसर्गिक अुपचाराचा अुपयोग रामनामाचा पूरक नाहीं, रामनामाच्या साधनेचा निदर्शक आहे रामनामाला ह्या मदतनिसांची आवश्यकता नाहीं. अेक मागून अेक वैद्याच्या मागें जो धावतो आणि अिकडे रामनामाचा दावा हि करतो त्याचा तो दावा पटणारा नाहीं."

दुसऱ्या ठिकाणीं अेका पत्रात ते लिहितात—

"नैसर्गिक अुपचार आपणाला अीश्वराच्या अधिक जवळ नेतो परंतु त्याच्याशिवाय हि आपलें काम चालू शकत असेल तर त्याला माझा मुळा च विरोध राहणार नाहीं."

तिसऱ्या अेका ठिकाणीं ते म्हणतात—

"मला असे आओी-बाप माहीत आहेत कीं, ज्यानीं आपल्या आजारी मुलाची काळजी घेतली नाहीं आणि आपण राम-नाम घेतल्याने च तीं चांगलीं होतील असा विश्वास बाळगला."

हे अेक शेंकटच्या टोकाचें म्हणणें आहे. ह्याचा अर्थ अितका च आहे कीं नैसर्गिक अुपचाराच्या नावाने जे पुष्कळसे व्यर्थ आणि धार्मिक तंत्र अुभें करण्यात येते त्यापासून देखील रामनामाचा अुपचार मुक्त आहे.

**अुपचाराचीं तीन सूत्रें**

बापूंनीं आपल्या ह्या अुपचाराच्या बाबतींत जें तपशीलवार विवरण केलें आहे, त्या सर्वांचे सार मी तीन सूत्रात मांडीन.

(१) देहाची अधिक आसक्ति ठेवता कामा नये. त्यामुळें देहाला कदाचित् परिपुष्ट ठेवता येअील परंतु त्यानें आत्मा क्षीण होअील. पुष्कळ वेळा तर त्यामुळे आम्ही देहाची देखील हानि करतों.

(२) गरिबांशीं अेकरूप व्हायला पाहिजे. कमींत-कमी आजाराच्या वेळीं तरी स्वत करता निश्चित मर्यादा ठरवून टाकली पाहिजे. करोडों गरिबाना जो अुपचार घेता येत नाहीं त्याची आशा सोडली पाहिजे.

(३) आसपासची सृष्टि आपली शत्रू नव्हे तर मित्र आहे असें आपण समजलें पाहिजे. सृष्टीला भिअून वागायला नको प्रकाश, हवा, अुन वगैरेंची नि संकोच पूर्ण मदत घेतली पाहिजे.

हीं तीन सूत्रें आपण लक्षात ठेवलीं तर पुस्तकाच्या सर्व विवेचनाचें आपण सहज ग्रहण करू शकू.

**विखरलेल्या सूचना**

आतां पुस्तकात फकून-फकून आलेल्या कांहीं सूचना पहा —

" माझ्या नैसर्गिक अुपचारात सूक्ष्मदर्शक यंत्र, क्ष-किरण वगैरे साधनाची आवश्यकता नाहीं "

" त्यात क्विनाअीन, पेनिसिलीन सारख्या औषधाना अवकाश नाही "

" नैसर्गिक अुपचार करणाऱ्या अनुभवी किंवा तज्ञ मनुष्याच्या सल्ल्याची देखील त्या करता गरज असायला नको "

" नैसर्गिक अुपचार शिकण्याकरता शरीर शास्त्र शिकलें च पाहिजे असे नाहीं "

" मोसंबीं आणे नैसर्गिक अुपचाराचे अंग नाहीं. "

वरील त्रिसूत्री हृदयंगम झाली तर हे विचार पचू शकतील. ह्याचा केवळ अक्षरार्थ घ्यावयाचा नाव भावार्थ घ्यावयाचा आहे

**जीवन-चर्या**

जीवन परिवर्तन हें ह्या सर्वांचे थोडक्यात तात्पर्य आहे

(अ) नेहमीं शुद्ध, स्वच्छ, शुक्त आणि मित आहार आणि विशेष प्रसंगीं अल्प आहार व निराहार

(आ) देहाची, वाणीची व मनाची शुद्धि आणि आसपासच्या सर्व वातावरणाची स्वच्छता

(अि) निसर्गावर प्रेम आणि त्याचे अुमुक्त सेवन.

(अी) योग्य परिश्रम आणि विश्रांतीची व्यवस्था

(अु) स्वत ला देहापासून भिन्न जाणणे, प्राणिमात्राच्या सेवेस लागणें आणि शुद्ध चित्ताने परमेश्वराचें निरंतर स्मरण करणे

ही आहे जीवनचर्या हिला च ब्रह्मचर्य म्हणतात ह्या च रामनामाचा अुपचार आहे

(५)

## त्रिविध चिंता

वैष्णव भक्तांनी ज्या निष्ठेनें रामनामाचा महिमा गाइला आहे ती च निष्ठा ह्या पुस्तकाच्या पाना-पानांतून दृग्गोचर होते. तरी पण दोहोंत अेक फरक आहे. त्याची थोडी चर्चा आपण अिथें करूं. फरक हा आहे कीं भक्ताचा नाम-प्रचार स्वच्छंद, स्वैर आणि सर्व चिंताविमुक्त होता. परंतु याच्या नाम-प्रचारामागें तीन चिंता लागलेल्या आहेत. त्याचा क्रमशः विचार करूं.

### पहिली चिंता सकामता

पहिली चिंता ही आहे कीं रामनामाचा सकामतेशीं संबंध नसला पाहिजे ते लिहितात—

"अशा पवित्र मंत्राचा आर्थिक लाभाकरितां कोणीं हि अुपयोग करूं नये. पुष्कळशा ठिकाणीं केवळ आडंबराकरतां आणि कांहीं ठिकाणीं स्वतः च स्वार्थाकरता नामजप करण्यात आलेला आम्ही पाहिला आहे.

### कथनाचे दोन प्रकार

भक्तांनी तर अितपर्यंत सांगितलें आहे कीं व्यक्तिगत स्वार्थाकरतां का होईना नाम-स्मरण करण्यात आलें तरी तें कांहीं ना कांहीं कल्याण च करतें. मी दोन्ही भाषाचें रसास्वादन करतों. अेक भाषा बुद्धि-युक्त तत्वार्थ कथनाची आहे, जी विश्लेषणाची चिंता ठेवते. दुसरी आहे भावनामय अर्थवाद, जो अेकणाऱ्यांत कांहीं अक्कल आहे

असें गृहीत धरतो. गीतेनें दोन्ही हि भाषांचा अुपयोग केला आहे, तरी पण निष्कामतेचा च विशेष आग्रह ती ठेवते.

**निष्काम अीश्वरभक्त**

अिथें थोडी गीतेची चर्चा करतों. ह्यांत कांहीं विषयांतर झालें तर माझी गीता-भक्ति ध्यानांत घेअून वाचणारे मला माफ करतील.

गीतेच्या सातव्या अध्यायांत आर्त, जिज्ञासु आणि अर्थार्थी असे तीन भक्त मागितले आहेत पुष्कळ टीकाकार हे सकाम भक्त आहेत असें मानतात, पण मला हें पटत नाहीं. कारण ह्या तिघांना गीतेनें "अुदार" अशी संज्ञा दिली आहे अुदार कृपणाची विरोधी संज्ञा आहे आणि 'कृपणा फलहेतवः' ह्या वचनांत कृपण म्हणजे सकाम अशी स्पष्ट सूचना आहे अर्थात् हे तिन्ही भक्त निष्काम च आहेत. परंतु ते अेकांगी आहेत आणि ज्ञानी सर्वांगी असतो. रोग पीडित आणि रोगमुक्ति अिच्छिणारा म्हणजे आर्त नव्हे आर्त म्हणजे भावप्रधान भक्त जिज्ञासु म्हणजे केवळ स्थूल अुत्सुकता (क्युरिऑसिटि) ठेवणारा नाहीं, तर बुद्धीनें अीश्वरतत्त्वाला जाणण्याचा प्रयत्न करणारा. अर्थार्थी म्हणजे पैसा अिच्छिणारा नाहीं तर सर्व-भूत-हितार्थी कर्म प्रधान. ह्याची अधिक चर्चा मी अिथें करीत नाहीं. माझ्या गीता-प्रवचनामध्ये ह्याचें मी विस्तारानें विवेचन केलें आहे जिज्ञासु ते पाहू शकतात. गीतेनें मान्य केलेले तिन्ही आणि चार हि भक्त माझ्यामतें पूर्ण निष्काम आहेत

**सकाम देवताभक्त**

सकाम भक्तांचा ह्याहून भिन्न वर्ग गीतेनें केलेला आहे. आणि जरी तिनें त्याला मान्यता दिली नाहीं, अुलट दूषण च दिलें आहे तरी

थोडी अनुकंपा त्याच्या विषयीं तिनें ठेवली आहे. ह्याचा अुल्लेख ह्या च अध्यायात 'भिन्न-भिन्न देवताच्या मागें धावणारे कामनाग्रस्त' ह्या नावानें केला आहे.

जे कामना-ग्रस्त आहेत ते अन्य देवताभक्त च असतात मग ते अीश्वराचे नाव भले घेत असोत. अेका गृहस्थाशीं चर्चा चालली होती. ते म्हणाले —' मुसलमान धर्मानें अेका परमेश्वराची निष्ठा वाढवून अनेक देवताचें निरसन केलें हे अेक मोठें काम केलें.' मी म्हणालो, हे मी देखील मानतों, परतु असें समजू नका कीं अल्लाचें नाव घेणारे निश्चितपणे अेका च परमेश्वराचे भक्त असतात. जो अल्लापासून धन मागतो तो लक्ष्मीदेवीचा च अुपासक आहे. 'हे लक्ष्मीदेवी तुझी कृपा माझ्यावर असू दे.' अशी प्रार्थना करणारा हिंदु आणि 'हे अल्ला, मला दौलत दे' अशी दुआ मागणारा मुसलमान दोन्ही अेका च संप्रदायाचे अुपासक आहेत. अुलट जो लक्ष्मीचे नाव घेतो, परतु त्यापासून चित्त-शुद्धि किंवा मन शातीची च अपेक्षा करतो, तो अेका परमेश्वराचा अुपासक आहे. अितकें च नव्हे तर जो लक्ष्मी, शक्ति, सरस्वती अित्यादि अनेक देवताची प्रार्थना करतो आणि चित्त-शुद्धीशिवाय काहीं मागत नाहीं, जसें तुलसीदासानीं विनयपत्रिकेंत केलें आहे, तर तो देखील अेका परमेश्वराचा च अुपासक आहे. आणि अितकीं सारीं विविध नामें घेअून हि तो रामनाम च घेतो.

"कांक्षत· कर्मणा सिद्धि यजत अिह देवता·"
'कर्माचें फल अिच्छिणारे अन्य देवताचे अुपासक असतात.'
ह्या वाक्यात गीतेनें हा विचार विशद केला आहे.

**रामनाम दूषित होअील**

रामनाम घेत गेलों आणि भिन्न-भिन्न कामना राखीत गेलों तर, मग त्या कामना फळल्या तरी देखील, रामनाम ह्याने दूषित होअील, ते अन्य देवता-नाम होअील आणि काहीं वेळा तर ते रावण-नामात देखील परिणत होअील, ही चिंता ह्या पुस्तकात पदोपदीं व्यक्त झाली आहे आणि ती सर्वथा योग्य हि आहे.

**अकांतिक अर्थ करूं नका**

परंतु जो मनुष्य चालू प्रवाहानुसार डॉक्टरी अुपचार करवितो तो रामनाम घेण्याचा अधिकारी नाहीं असा याचा अेकांतिक अर्थ मी करणार नाहीं. बापूंची देखील तशी अिच्छा असणे शक्य नाही. येथे लहानपणची अेक गोष्ट मला आठवते. लहानपणीं मी नेहमी आजारी राहात असे आणि डॉक्टरी औषधें मला चालू असत. औषध पिताना आअी मला म्हणायला सांगत असे, "औषधं जाह्नवीतोयं वैद्यो नारायणो हरिः." आणि तसे मी म्हणत असे. परंतु अेक दिवस त्याच्या अर्थाचा विचार आला आणि मी आअीला म्हणालो, "ह्याचा अर्थ तर मला असा दिसतो कीं गंगोदकाला औषध समजा आणि अीश्वराला वैद्य माना." ती म्हणाली, "हा अर्थ बरोबर आहे, परंतु त्याच्याकरता तशी योग्यता पाहिजे. तुझ्या-माझ्यासाठीं ह्याचा दुसरा अर्थ आहे."

मी विचारलें, "कोणता ?"

अुत्तर — "डॉक्टराला अीश्वर समजा आणि तो जें औषध देअील ते गंगोदक माना"

आअीचें हे म्हणणे त्या भूमिकेवर मला आज देखील पटते. परंतु ह्या वाक्याचा अेक तिसरा अर्थ मला परवा च अेका वैद्याने सांगितला.

तो म्हणाला, "रोग असाध्य होअील तेव्हाचे हे वचन आहे." मी हा हि अर्थ मान्य केला. कारण मरेपर्यंत औषध पाजणारे आणि पिणारे रोज च आपणाला दिसतात. मेल्यानंतर औषध देत नाहीत अितकी मेहरबानी आहे. परतु ही हि मर्यादा पुढें नाहीशी होअील अशी मला शंका आहे. कारण मेलेल्याला देखील जिवत करण्याचे प्रयोग करण्याचा विचार आता वैद्य-शास्त्र करीत आहे.

अेक निसर्गोपचारक मला म्हणाला, "हें शास्त्र दैव-शरणता सागत नाहीं, निसर्गोपचार सांगते. औषधें घेअू नका, पाण्याचा अुपचार करा, आणि नारायण हरीला म्हणजे सूर्यनारायणाला वैद्य माना, अर्थात त्याच्या किरणाचें यथाशास्त्र सेवन करा असा त्याचा अर्थ आहे." हे देखील मी मान्य केलें. परतु रामनामाचा अुपचार निसर्गोपचाराहून हि भिन्न आहे, हे मी त्यावरून समजलों.

**स्वरुपावस्थान ही कामना नाहीं**

यावर कोणी प्रश्न करील, "तुम्ही राम-नामाची निसर्गोपचाराला जोडता आणि त्यापासून त्याला वेगळें करता, नामाबरोबर सकामतेला दूषण हि देता आणि आरोग्याची कामना हि ठेवता, हा काय प्रकार आहे ? ह्याचें अुत्तर हे की नाम-स्मरणापासून आरोग्याची अपेक्षा ह्या करता ठेवण्यात येते की आत्मा स्वरूपतः रोग-रहित आहे. त्यामुळें रोगरहित राहण्याच्या अपेक्षेचा अर्थ 'स्वरूपावस्थेमध्ये राहणे' अितका च होतो. म्हणून ह्या अपेक्षेची गणना कामनेमध्ये करायला नको. आत्मा रोग-रहित आहे, तसा देह-रहित हि आहे. त्यामुळें नाम स्मरण करीत असता शरीर पडलें तरी हरकत नाहीं. आणि तशा प्रकारें शाति-पूर्वक शरीर गळून पडणे ह्यात नामोपचाराची निष्फळता नाही

तर सफलता आहे. नाम स्मरणाशी निसर्गोपचार जोडण्यानें कारण हे आहे कीं निसर्गोपचाराचा युक्ताहारविहारादि जीवनचर्येशीं संबंध आहे. रामनामाशीं तो न जोडला तर अयुक्त आहार-विहार जोडावा लागेल, अर्थात ते विपरीत वर्तन होअील. निसर्गोपचाराहून रामनामाला वेगळे हि करतात. कारण निसर्गोपचाराने आज-काल अेक मोठें लाव-रुद, कधीं कधीं तर औषधापेक्षा हि जास्त खर्चिक ढोंग झालें आहे.

**दुसरी चिंता अंधश्रद्धेची भीति**

ही अेक चिंता झाली. रामनामाच्या मुक्त प्रचाराची दुसरी चिंता, जी या पुस्तकांत पुष्कळ दिसून पडते, ती म्हणजे अंधश्रद्धेच्या प्रचाराची. अुपचार म्हणून रामनाम लोकांसमोर बापूनीं ठेवलें तेव्हा लोकांनीं त्याच्यावर प्रश्नाचा भडिमार सुरू केला. कोणीं विचारलें, "आम्ही मरीआअी देवीची पूजा करतों आणि पुष्कळसे रोग बरे होतात. तसा च हा प्रकार आहे काय?"

"पोट दुखणे बरें होण्याकरता पुष्कळसे लोक तिरूपती येथील देवीला नवस करतात. चांगले झाल्यावर देवीचे हात पाय धुतात आणि केलेले नवस अुतरतात. ह्यासंबंधीं आपण खुलासा करण्याची कृपा करावी."

**निसर्गाची करणी**

बापू ह्याचें अुत्तर देतात—

"वर जीं अुदाहरणें दिलीं आहेत तीं निसर्गोपचाराचीं नाहींत किंवा रामनामाची हि नाहींत. त्यावरून अितकें मात्र जरूर दिसून येतें कीं पुष्कळशा रोगांना निसर्ग कोणत्या हि अिलाजाशिवाय देअील बरे करतो."

### तुलनेकरतां दोघांची आवश्यकता

हें अुत्तर वाचून मला मार्केटिमच्या गोष्टीचें स्मरण होतें. कोण्या अेका मंदिराच्या दर्शनानें लोकांचे रोग बरे होतात असा दावा होता. अशा प्रकारे बऱ्या झालेल्या लोकांची नावें त्या मंदिरात लिहून ठेवलेलीं होतीं मार्केटिमला तीं दाखविण्यात आलीं तेव्हा तो म्हणाला हा यादी बरोबर जे बरे झाले नाहींत त्यांच्या नावाची हि यादी देण्यात यायला हवी होती, त्यामुळें दोन्ही यादीची तुलना करून त्याचें तारतम्य ठरविता आले असतें

### शुद्ध विचाराचा आरोग्यावर प्रभाव

पुढें बापू लिहितात—

"रामनाम अंधश्रद्धेचे यत्र आहे. तें विश्वास-चिकित्सेहून भिन्न आहे मी ठीक समजलों असेन तर विश्वास-चिकित्सा 'रोगी अंध-विश्वासानें चांगला होतो' असे मानते. असे मानणें म्हणजे जिवंत औश्वराच्या नावाचे हसे करणे आहे रामनाम केवळ कल्पनेची वस्तु नाहीं. औश्वरात ज्ञानाबरोबर विश्वास असेल आणि त्याबरोबर निसर्गाच्या नियमाचे पालन केलें जाअील तेव्हा च दुसऱ्या कोणाच्या मदतीशिवाय रोगी चांगला होअू शकेल. आपल्या आत औश्वराला ओळखले तर अेक हि मलिन किंवा व्यर्थ विचार मनात येअू शकणार नाहीं जिथें विचार शुद्ध असतील तिथें रोग येअू च शकत नाहीत"

बापूंचे हें रामनाम शुद्ध बुद्धिवादाशीं थोडें देखील विसंगत नाहीं हें स्पष्ट आहे

### गणिताचें सूत्र

दुसऱ्या ठिकाणीं बापूंनीं हें आणखी स्पष्ट केलें आहे—

"रामनाम कांहीं जादूटोणा नाहीं. रामनाम गणिताचें अेक असें सूत्र आहे कीं जें थोडक्यांत अगणित शोध आणि अनुभव जाहिर करतें."

### सांख्य शास्त्र

माझ्या गणित-प्रेमी बुद्धीला ह्या वाक्यानें आनंद होत आहे. योग आणि गणित अेका च वस्तूच्या दोन बाजू आणि दोन नांवें आहेत. जेम्स जिन्स नामक अेका गणितज्ञानें 'मिस्टीरियस युनिव्हर्स' म्हणजे गूढ विश्व नावाचें अेक सुंदर पुस्तक लिहिलें आहे. त्यांत त्यानें अीश्वराच्या गणिती बुद्धीचें वर्णन केलें आहे. आम्हाला ही नवी गोष्ट नाहीं. आम्ही तर सर्व सृष्टि-शास्त्राला 'सांख्य' असें नांव दिलें आहे. 'सांख्य' याचा सरळ अर्थ 'संख्या-शास्त्र, असा आहे. आत्मज्ञानाला देखील 'सांख्य' म्हणतात. कारण चित्ताच्या प्रत्येक व्यापाराचें त्यांत सख्यान म्हणजे हिशेब आणि परीक्षण करावें लागतें. सांख्य आणि योग दोन्ही गणितें आहेत. सांख्य आहे शुद्ध गणित (प्युअर मॅथेमॅटिक) आणि योग आहे त्याचा विनियोग म्हणजे व्यावहारिक गणित (ॲप्लाअिड मॅथेमॅटिक).

### नास्तिकतेचीं लक्षणें

परंतु सगळे भक्ति-पंथ, नाना प्रकारच्या अंध-श्रद्धांनीं भरलेले आहेत ही दुःखाची गोष्ट आहे. कुराणाचा अभ्यास करीत असतांना मी प्रत्येक कुराणाच्या प्रस्तावना कुतूहलानें वाचीत असे. त्यांत कुराणासंबंधीं काहीं नवा प्रकाश मिळेल अशी माझी अपेक्षा होती.

परंतु अनेक प्रस्तावनामें रोगनिवारणाचे मांत्रिक अुपचार दिलेले आढळले. पोट दुखत असेल तर फलाण्या सूरतची फलाणी आयत कागदावर लिहा, तो कागद जाळून त्याची रक्षा शरीराला लावा किंवा ती पाण्यात घोळून प्या, डोकें दुखत असेल तर अमक्या आयताचा अिलाज करा; असे अनेक अुपचार मटेरिया मेडिकाच्या शैलीत त्यात दिलेले असत. सप्तशति, ग्रंथसाहेब, तुलसी रामायण, मराठी गुरुचरित्र अित्यादि अनेक ग्रंथाची ही च स्थिति आहे. रोज शनिमहात्म्य वाचणें, देवी-देवताना नवस करणें किंवा औश्वराच्या नावाने खरे, परंतु बुद्धिहीन आणि चित्त-शुद्धीशी यत्किंचित् हि संपर्क नाही असे अनेक तऱ्हेचे प्रयोग करण्यात येतात. मला नेहमीं हीं सारीं नास्तिकतेचीं लक्षणें वाटलीं आहेत. हिंदु धर्माला ह्या अंधश्रद्धारूपी नास्तिकतेपासून सोडविण्याचा सर्वांत श्रेष्ठ प्रयत्न माझ्या माहिती प्रमाणें शंकराचार्यांनीं केला होता. कर्मकांडाचा त्यांनीं ह्या च कारणामुळें घोर विरोध केला. जड श्रद्धेचें अुन्मूलन ते करूं अिच्छीत होते. परंतु त्यांच्या महान् प्रयत्नानें देखील ती समाजा-मधून निर्मूळ होअू शकलेली नाही.

बापूनीं हें च काम ह्या पुस्तकात केलें आहे. रामनामाच्या प्रज्वलित निष्ठेनें भरलेल्या ह्या पुस्तकात अंध-श्रद्धेबरोबर झगडण्यात आणि रामनाम त्याहून भिन्न आहे हें दाखविण्यात त्यांची अर्धी शक्ति खर्च झाली आहे. नाम-स्मरणाला मंत्र-तंत्राचें रूप देअून लोकाना अंधश्रद्धेच्या कृपात ढकलण्यात आलें आहे. ह्याचा तीव्र विरोध टिक-ठिकाणीं त्यांनीं केला आहे. अेका ठिकाणीं तर ह्या करता मी रामनामाच्या प्रचाराला भितों अितकें देखील त्यांनीं सांगून टाकलें आहे

**रामनामाची मर्यादा**

नंतर रामनामाच्या देखील मर्यादाचा हिशेब ते करू लागले ते लिहतात—

"बादीचा अिलाज प्रार्थना नाहीं, अुपवास आहे अुपवासाचें कार्य पुरें झाल्यानंतर च प्रार्थनेचे कार्य सुरू होते. मात्र प्रार्थनेने अुपवासाचें काम सोपें आणि हलकें होते हे खरे आहे."

"मनापासून अीश्वराचे नाव घेणाऱ्या मनुष्याचें हे कर्तव्य आहे का त्याने निसर्गाचे नियम समजून घेतले पाहिजेत आणि त्याचें पालन केलें पाहिजे, कारण अीश्वरानें ते मनुष्याकरता बनविले आहेत."

"तुमच्या विचारावर तुमचा ताबा नसेल, अरुंद अंधाऱ्या खोलींत सर्व दारे-खिडक्या बंद करून निजण्यात तुम्हाला काहीं हरकत वाटत नसेल आणि तुम्ही घाण हवा घेत असाल किंवा घाण पणी पीत असाल तर मी म्हणेन कीं तुमचे रामनाम घेणं व्यर्थ आहे."

**खिस्ती विज्ञान**

पश्चिमेकडे खिस्ती विज्ञान नावाचा अेक विश्वास रूढ आहे. त्यात सर्व रोग हे पापाचे परिणाम आहेत आणि मृत्यूचे कारण पाप च आहे असे मानलें जाते म्हणून जो जो पूर्ण निष्पाप आहे, निर्विकार आहे, त्याचा शारीरिक मृत्यु देखील व्हायला नको बापू ह्या बाबतींत अेका ठिकाणा म्हणतात—

"रामनामात खिस्ती-विज्ञानाचा गुण आहे तरी पण ते त्याहून अगदीं वेगळे आहे. खिस्ती विज्ञानाशीं माझें भांडण नाहीं मी तो सिद्धांत पूर्णपणें मान्य करू शकतों. परंतु खिस्ती विज्ञानानें शारीरिक

स्वास्थ्याच्या आणि रोगाच्या प्रश्नाला जें अतिशय महत्त्व दिलें आहे तें मी समजू शकत नाहीं."

अिथें बापूंनी शारीरिक मरण देखील पूर्ण निर्विकार नसलें पाहिजे ह्या विश्वासाकडे अिशारा केला आहे.

परंतु त्यापेक्षा अधिक स्पष्ट शब्दांत हें सांगण्याची गरज होती. तें झालेलें नाहीं. अुलट दुसऱ्या ठिकाणीं नाम-महिम्याच्या पुष्टीकरता ख्रिस्ती-विज्ञानाचा आधार घेण्यांत आला आहे. ते म्हणतात—

"ख्रिस्ती-विज्ञानाचा संप्रदाय अगदीं हें च नाहीं तर जवळ-जवळ अशा च सारखी म्हणजे रामनामासारखी गोष्ट सांगतो"

मला ह्या पुस्तकांत हें अेक घोटाळ्याचें विवेचन दिसतें. ख्रिस्ती-विज्ञानाच्या सिद्धान्ताला संपूर्णपणें मानणें आणि त्यातला मुख्य मुद्दा च समजत नाहीं म्हणणें, रामनाम त्याहून अगदीं वेगळें आहे म्हणणें आणि त्या च बरोबर तें जवळ-जवळ त्यासारखें आहे असें जाहीर करणें हें सर्व वस्तूंचें स्वच्छ दर्शन करवीत नाहीं. कोणत्या हि वस्तूच्या चांगल्या अंशाचा अस्वीकार होअू नये, ह्या विचारानें हा सर्व घोटाळा निर्माण झाला आहे हें मला माहीत आहे परंतु अिथें अधिक स्पष्टपणाची गरज होती. ह्या बाबतींत माझे विचार असे आहेत पूर्ण निर्विकार मनुष्याचें शारीरिक मरण व्हायला नको ही मूढ विश्वासाची पराकाष्ठा आहे तत्त्वविचार तर असें म्हणेल का संपूर्ण निर्विकारी मनुष्याला शरीरांत राहणें च असंभव होअील; आणि जर प्रारब्धवशात किंवा दुसऱ्या शब्दांत विकाराचा काही निर्जीव अंश शिल्लक राहिल्यामुळें देहांत रहावें लागलें तर कमींत कमी त्याला दुसरें शरीर तर

घ्यावे लागणार च नाहीं. स्थूल शरीराची आसक्ति ओश्वर-भक्तीच्या विरुद्ध आहे आणि शरीराच्या अमरत्वाची कल्पना, माझ्या नम्र मते नास्तिकता च आहे. खिस्ती-विज्ञानाने ही कल्पना जर सोडली नाही तर ते खिस्ती राहणार नाही आणि विज्ञान हि राहणार नाहीं. शारीरिक अमरत्वाच्या आकांक्षेने किमयेला जन्म दिला आहे, आणि असे म्हणतात की केमेस्ट्री ही त्यातून च जन्मली आहे. कदाचित् आपल्या अिकडील यौगिक क्रियाचा जन्म हि त्या पासून च झाला असेल. परंतु आत्म-ज्ञानाला जन्म देण्याची शक्ति त्यात नाहीं.

**आत्म-प्रयत्नाची पराकाष्ठा**

अशा प्रकारे जगातील भक्तिमार्गात जड मूढ भावना भरलेली पाहून काही समाज-शास्त्री ह्या निर्णयावर आले की आदि मानवाच्या विज्ञान-रहित भय-ग्रस्त मनामध्ये ओश्वर-कल्पनेची निर्मीति झाली असली पाहिजे. ते मानतात की विज्ञानाचा प्रकाश जसजसा पसरेल तसतसा ओश्वर-रूपी अंधकार नाहींसा होओील. ओश्वर जर अंधकार च असेल तर त्याचे नाहींसे होणें अवश्यभावी आणि लाभदायी आहे. ज्यांनी ओश्वराला आत्म्याहून अत्यंत भिन्न, जगताचा निर्माण-कर्ता, जगताच्या बाहेर अेखाद्या कोपऱ्यात सातव्या किंवा अेकोणपन्नासाव्या आकाशात बसलेला असा मानला असेल त्याच्या ओश्वराला जरूर धोका आहे, परंतु वेदांताने अशा ओश्वराची कल्पना आम्हाला शिकविली नाहीं. आत्म्याचे च प्रेम आणि स्वच्छतम रूप परमेश्वर आहे, आणि ओश्वर-भक्ति आत्म-प्रयत्नाची पराकाष्ठा आहे असे वेदान्त शिकविते. रामनामाची श्रद्धा बापू आमच्या समोर ठेवतात तेव्हा त्यात त्याची ही च दृष्टि आहे. मूढ आणि दांभिकांना त्रासून 'रामनामाच्या प्रचाराला मी

भिन्नें' असे जरी त्यांनी म्हटलें असलें तरी ते त्याचा प्रचार करीत च राहिले. ते लिहितात, 'लोक दुरुपयोग करीत च आहेत. तरी खरी गोष्ट आम्ही लपवू शकत नाहीं.'

ईश्वर-भक्ति आत्म-प्रयत्नाहून किंवा हृदय-शुद्धीहून भिन्न नाहीं तर त्यांची पूरक आहे हें त्यांनी असे प्रकट केलें आहे---

"अेखाद्याचें हृदय जर पवित्र असेल तर त्याचें आरोग्य रामनाम न घेता देखील तितकें च चांगलें राहू शकेल हें म्हणणें चुकीचें होणार नाहीं. परंतु अेवढें खरें की, रामनामाशिवाय पवित्रता प्राप्त करण्याचा आणखी अेखादा प्रकार मला माहीत नाहीं."

### साधनेचें विधायक रूप

आत्म-प्रयत्नानें हृदय शुद्ध करणें ही च मूळ साधना आहे. तिच्या बरोबर ईश्वर-भक्ति जोडण्याचा अर्थ अितका च होतो की परम स्वच्छतेचा अेक आदर्श आपण आपल्या चिंतनापरता समोर ठेवतों. त्यामुळें साधनेला विधायक रूप मिळतें आणि ती सोपी होते. नाहीं तर आत्म शुद्धीच्या प्रयत्नात धुण्याच्या विचारानें का होईना, मलिनपणाशीं च जास्त संबंध येतो. ह्यामुळें साधनेला थोडें निषेधात्मक रूप येतें, आणि ती कठीण बनतें. ह्या शिवाय फुप्फुसाच्या प्रयत्नाला जशी जगात पसरलेल्या हवेची मदत मिळते तशी देह-बद्ध आत्म्याच्या प्रयत्नाला देह-मुक्त विश्वरूप परमात्म्याची मदत मिळते, ही अनुभवसिद्ध गोष्ट आहे.

### आत्म-शोधनाची प्रक्रिया

सारांश, रामनाम आत्म-शोधनाची प्रक्रिया आहे, मूढ विश्वासानें काल्पनिक देव-देवतांना किंवा आत्म्याहून अत्यंत भिन्न अशा अेखाद्या सर्वाधिकारी परमेश्वराला फूस लावण्याची प्रक्रिया नाहीं.

### तिसरी चिंता मौखिकत्व

तिसरी चिंता ह्या पुस्तकात व्यक्त करण्यांत आली ती ही कीं राम-नाम केवळ मौखिक क्रिया होऊ नये. तो फक्त शब्द नाहीं, तर अेक अनंत सूक्ष्म आणि परिपूर्ण विचार आहे. परतु ह्या सबधीं प्रचलित रूढ कल्पना तर ही आहे कीं रामनामाचा जप म्हणजे फक्त अक्षराचा जप करणे. मरताना 'र' आणि 'म' हीं दोन अक्षरें कशींतरी तोंडातून निघालीं कीं झालें. अेका भक्ति-मार्गी मनुष्याने तर मला असें सांगितलें कीं 'मरणें' यात अक्षरें आहेत 'म' आणि 'र' तर रामनामात याच्या अुलट्या क्रमाने अक्षरें आहेत 'र' आणि 'म' म्हणून हीं दोन अक्षरें त्या दोन अक्षराचा छेद अुडवितात. अर्थात ह्या भक्ताच्या मते 'रामनाम' अेक विशेष शब्द होतो; पण त्याला शब्द हि म्हणता येत नाहीं. कारण, शब्दाला अर्थ असतो; पण त्याचा 'राम' शब्द म्हणजे अक्षर-समूहमात्र होय. आपली भावना दृढ करण्याकरता अक्षर-चिंतनाच्या युक्त्या काहीं लोक काढतील तर त्याच्या श्रद्धेचा मी भग करू अिच्छिणार नाहीं. परतु अशा आरोपित कल्पनानीं मनुष्य फारशी अुन्नति करू शकत नाहीं.

### नामोच्चारणाचा तत्त्ववाद

काहीं भक्ति-मार्गी लोकानीं आणि कर्मकांडी लोकानीं तर जपा-करता घेतलेला शब्द अर्थवान् असू नये येथपर्यंत आग्रह धरला आहे. वेदाच्या अर्थ-चिंतनानें वेदाच्या मत्र-शक्तीचा क्षय होतो हा वाद प्राचीन काळापासून आजपर्यंत चालत आला आहे. ते म्हणतात, मंत्र-शक्ति अक्षराच्या अुच्चार-पद्धतींत असते. आपण भाकरी खातो तेव्हा भाकरी खाण्याचे चिंतन काय करायचे ? अीश्वर-नामाचें अुच्चारण किंवा वेद-मंत्राचे पठन भोजनासारखें स्वयफलदायी आहे. अितकें च नाहीं तर

जाताना जाण्याशिवाय जर आपण काही चिंतन करीत राहू तर जशी पचनात बाधा पडते तसें च राम-नामा बरोबर जर अर्थ-चिंतनाची पीडा लागली तर पचन बिघडेल आणि जप लाभ मिळणार नाही. चिंतनाकरता रामनामाची आवश्यकता च काय ? चिंतन तर नामाशिवाय आपल्या मनाने कोणी हि अिच्छेनुसार करू शकतो. नाम घेत असाल तर चिंतनाचा प्रश्न च नाही. नाम स्वतःच तारक आहे. अशा प्रकारें केवळ नामोच्चाराचा देखील अेक तरवाद बनलेला आहे.

बापूनी ह्याच्या अुलट चिंतन, मनन आणि आचरण यावर जोर दिला आहे. त्या सबंधी अेक च अुतारा पुरेसा होअील.

" केवळ तोंडाने रामनाम रटण्याने काही शक्ति मिळत नाही. शक्ति मिळण्याकरता समजून अुमजून नाम जपणे आणि जपाच्या शर्तींचे पालन करीत जीवन क्रमणे आवश्यक आहे. अीश्वराचे नाव घेण्याकरता मनुष्याला आश्रमय जीवन जगलें पाहिजे."

**सर्व धर्मांत श्रेष्ठ धर्म**

विष्णु-सहस्रनामाने वक्ते भीष्मदेव यानी देखील सहस्रनामाचा अुपदेश करीत असता अशी च अपेक्षा ठेवली आहे. विष्णूच्या सहस्रनामाना त्यांनी—

" यानि नामानि गौणानि विख्यातानि महात्मनः "

म्हणजे परमेश्वराची विश्व-विख्यात गौण नामें म्हटले आहे. अिथे गौण शब्दाचा मराठीतील अर्थ अभिप्रेत नाही, त्याचा मूळ संस्कृत अर्थ अभिप्रेत आहे गौण नामें म्हणजे गुणवाचक नामें. अीश्वराचे प्रत्येक नाव त्याच्या अेक-अेका गुणाचे सूचक असते. अर्थात् त्या त्या नावाबरोबर त्या त्या गुणाचे चिंतन साधकाने केलें पाहिजे त्याबरोबर *आचरणावर हि विशेष च जोर दिला आहे.*

सर्वागमानाम् आचार प्रथम परिकल्पत ।
आचार-प्रभवो धर्म धर्मस्य प्रभुरच्युत ॥

सर्व शास्त्राचा पाया आचार आहे आचारातून धर्माची अुत्पत्ति आहे आणि धर्माचा स्वामी परमेश्वर आहे ह्याचा भाव हा आहे कीं धर्म स्वामी परमेश्वराच्या नाम-स्मरणान आणि त्याच्या गुणगणाच्या चिंतनानें सदाचाराची प्रेरणा मिळत ह्या करता परमेश्वराचे नामस्मरण करणें 'सर्व धर्माणा धर्माऽधिकतमो मत ' सर्व धर्मीत श्रेष्ठ धर्म आहे. साहजिक ह्या साठीं मनुष्यानें नित्य जागृत राहलें पाहिजे भीष्मानें ही सूचना सहस्रनामाच्या प्रारंभीं च देअून ठेवली आहे

'स्तुवन् नाम सहस्त्रेण पुरुष सततोत्थित ।'

नाम स्मरण करणाऱ्या मनुष्यानें नेहमा सावध राहिलें पाहिजे

**अुच्चारणवादाचे सारग्रहण**

परतु अशा प्रकारें चिंतनाच आणि आचरणाचे महत्त्व मानलें तरी अुच्चारणवादात जो सारभूत अश आहे त्याच जोपर्यंत ग्रहण करण्यात येणार नाहा, तोंपर्यंत अुच्चारणवादाचे निरसन होणार नाहीं त्याचा सारभूत अश हा आहे वाणा बहिर् जगत् आणि अतर्-जगत् याच्यामध्ये अेका अशा जागीं अुभी आहे की जेथून परस्परातील आयात निर्यात होते म्हणून त्या जागा पाहरा ठेवला आणि ता पवित्र ठेवली तर जीवन शुद्धीचें कार्य सुलभ होतें ह्याकरता आचार आणि विचार याप्रमाणें च अुच्चाराचें देखील स्वतत्र मूल्य आहे तुलसीदासाना अेका समर्पक दृष्टातान हें विशद केल आहे—

रामनाम मणि-दीप धरु जीह देहली द्वार
तुलसी भीतर बाहर हू जौं चाहसि अुजियार ।

त्याकरता नामोच्चारणाच्या स्वतंत्र मूल्याचा देखील स्वीकार करावा लागेल बापूनी हें मोकळ्या मनानें स्वीकारलें हि आहे अेक प्रश्नोत्तर पहा—

"प्रश्न— रामनाम हृदयात ठेवणें पुरेसें नाहीं काय ? कीं त्याच्या अुच्चारणात काही विशेषता आहे ?

अुत्तर — रामनामाच्या अुच्चारणाचे विशेष महत्त्व आहे असा माझा विश्वास आहे अीश्वर खरोखर आपल्या हृदयांत वास करतो आहे असें जर कोणा जाणलें असेल तर मी मानतो कीं त्याला तोंडाने रामनाम जपणें आवश्यक नाहीं परंतु असा कोणी मनुष्य मला माहीत नाहीं, अुलट माझा स्वत चा अनुभव मला सांगतो की तोंडानें रामनाम जपण्यात काहीं विशेष आहे ते का किंवा कसें हें जाणणे आवश्यक नाहीं"

आणखी अेक वचन पहा वरील वचनापेक्षा देखील हें अधिक स्पष्ट आहे—

"परंतु रामनामाचा निरंतर जप चालू राहिला तर अेक दिवस तें तुमच्या कंठातून हृदयात अुतरल्याशिवाय राहणार नाहीं"

तुकारामानीं हें च सांगितलें आहे—

"नसे तरी मना नसो, परी वाचे तरी वसो।"

"मनात नसल्यास नसू दे, पण कमीत कमी वाणींत तरी रामनाम वसू दे". साराश हा की कालांतरान ते आपलें काम करील

अुच्चारणवादाचे सार अशा प्रकारें ग्रहण केल्यावर मनन, निदिध्यासन आणि आचरण याचा महिमा त्यामुळें खंडित होत नाहीं,

अुलट तो अधिक च प्रकाशित होतो. आणि तो च प्रकाशित व्हावा ह्या अुद्देशाने बापूनीं मौखिक रामनामाचे खंडन केलें आणि मंडन हि केलें आहे.

**रामनामाची गाडी**

भक्ति-मार्गाचें तीन धोके—सकामता, मूढ विश्वास आणि मौखिकता ह्याना टाळण्याची अत्यत आवश्यकता आहे. या त्रिदोषांनीं भक्तीच्या सुगम मार्गात काटे पसरलेले आहेत. म्हणून रामनामाचा महिमा गात असता ह्या पुस्तकात सर्वत्र सावधगिरीच्या भाषेचा प्रयोग झाला आहे. ज्ञान आणि कर्म योग ह्याच्या दोन रुळावरून रामनामाची गाडी येथे चालली आहे. त्यात विमानातील विहार नाही.

---

(६)

## नाम-साफल्य

**वैज्ञानिकांची आकांक्षा**

परतु अेका ठिकाणी अितके अुच अुड्डान आहे कीं त्याला सामान्य विमान-विहार म्हणता येत नाही. त्याला विमानाने मगळ आदि ग्रहावर जाण्याची अुपमा द्यावी लागेल. वैज्ञानिकाची ही अेक आकांक्षा आहे कीं जर कोणत्या हि प्रकारे पृथ्वीच्या आकर्षणाच्या बाहेर जाता आलें तर आपण मगळावर पोहचू शकू. त्याची ही आकाक्षा ह्या पुस्तकात अेका ठिकाणी सफल झाली आहे. चिंतन पृथ्वीच्या आकर्षणाच्या पार झालें आहे आणि रामनामाचा जप करता करता रामनाम च अुडालें आहे. बापू लिहितात —

"अेक खरा विचार सर्व जगावर पसरू शकतो, त्याला प्रभावित करू शकतो. तो कधी व्यर्थ जात नाहीं. विचाराला शब्दाचा किंवा कर्माचा पोशाख चढविण्याचा प्रयत्न च त्याची शक्ति सीमित करतो. जो आपल्या विचाराला शब्दात किंवा कर्मात पूर्णपणें प्रकट करूं शकला असा कोणी तरी आहे काय ?" ते पुढें म्हणतात—

"तुम्ही विचारू शकता कीं जर असे आहे तर मग मनुष्याने नेहमीं मौन च रहावें हे चागलें नाहीं काय ? सिद्धाताच्या दृष्टीने हे शक्य आहे परतु ज्या शर्तीनुसार मौन-विचार पूर्णपणें क्रियेचे स्थान घेअूं शकतात, त्या शर्ती पुऱ्या करणें अतिशय कठिण आहे. मी स्वत. आपल्या विचारावर अशा तऱ्हेचा पूर्ण ताबा प्राप्त केला आहे असा दावा करूं शकत नाहीं. परतु माझ्या मनात ह्याचे अेक चित्र मात्र अुमटलें आहे."

## चित्र संन्यासाचें

यात जियें शब्दाचा निषेध केला आहे तिथे कृतीचा हि निषेध केला आहे. बहुधा आपण म्हणतों आणि बापूनीं देखील पुष्कळदा म्हटलें आहे कीं विचाराला कृतीमध्यें अुतरविलें पाहिजे. कृति-शून्य विचार शक्ति हीन असतो. परंतु येथें तर त्याच्या अगदीं अुलट सागितलें आहे.

"विचाराला कामाचा पोशाख चढविण्याचा प्रयत्न च त्याच्या शक्तीला सीमित करतो."

येथें आपण संन्यासाजवळ पोहोचतों. सन्यासाचे नाव घेता च काहीं लोक माझ्यावर रुष्ट होतील हे मला माहीत आहे परतु कर्मयोग

गांधींच्या मनांत जें चित्र अुमटलें आहे ते सन्यासाचें आहे. त्याला माझा अिलाज नाहीं. शंकराचार्यांची ही च स्थिति होती. ते देखील आमरण कर्मयोगी राहिले, परंतु सन्यासाचा घोष करीत राहिले.

### क्रियातीत शक्ति

सन्यास म्हटला कीं आपल्या मनात दुर्बल निष्क्रियतेची कल्पना येते. परंतु क्रियातीत अशी ही अेक शक्ति आहे. तिचा सामना तीव्रतम क्रिया देखील करू शकत नाहीं. ती च ज्ञानमय सन्यासाची शक्ति होय. जशी अेक दुर्बल अहिंसा असते आणि अेक बलवान् अहिंसा असते, आणि जी बलवानाची अहिंसा असते तिच्यात हिंसेहून शतपट शक्ति भरलेली असते, तशी च सन्यासाची गोष्ट आहे. सन्यासाची परम भूमिका असेल तिथे कोणती हि क्रिया, सात्त्विक देखील, हिंसेंत दाखल होते. ही अवस्था देहात प्राप्त होअू शकली नाहीं तरी हि तिचा च निदिध्यास असला पाहिजे. मनुष्याचा जन्म तिच्या च प्राप्तीकरता आहे. मानव आकृति देखील आम्हाला ह्या च बोध देते. तिचा पाय जमिनीवर राहील, परंतु मस्तक आकाशात राहिलें पाहिजे. अेका मर्यादेपर्यंत क्रिया विचाराची सहायक होते, त्या नंतर ती त्याची बाधक बनते. गीतेनें हे फार चांगल्या प्रकारें समजावून सांगितलें आहे. "कर्मात अकर्म आणि अकर्मात कर्म" हे गीतेचें सूत्र आहे. आत्मदर्शी ज्ञानी कर्म करीत असता करीत नाहीं आणि करीत नसता हि करीत असतो, ह्या गोष्टीचा ज्यानें अनुभव घेतला त्यानें सर्व ज्ञान मिळविलें, सर्व योग साधले आणि सर्व कामें केलीं.

स बुद्धिमान् मनुष्येषु स युक्तः कृत्स्न-कर्म-कृत् ।

"मी आपल्या जीवनात अशा वेळेची अवश्य आशा करतो कीं जेव्हां रामनामाचा जप देखील अडथळा वाटू लागेल. राम वाणीच्या हि पलीकडे आहे हे जेव्हा मी समजेन तेव्हां मला त्या नामाची अुजळणी करण्याचे कारण पटणार नाहीं."

**शद्वाच्या पलीकडे**

विष्णुसहस्रनामात हा च विचार दोन शद्वात सूचित केला आहे. सहस्रनाम काहीं विचाराची चर्चा करणारा ग्रंथ नाहीं. त्यात अेकामागून अेक अीश्वराची नावे देण्यात आलीं आहेत. त्यात दोन नावे हीं दिलीं आहेत ——

"शद्वातिगः शद्वसह:"

"अीश्वर शब्दाच्या पलीकडे आहे, परंतु शब्द सहन करून घेतो." त्याला आपल्या शब्दाची जरूर हि असण्याचे कारण काय? आणि शब्दानी त्याचे वर्णन हि कितीसे होअू शकेल ! आपण आपल्या अिच्छे-प्रमाणें त्याची स्तुति करायला जातों, परंतु वास्तविक त्याने त्याची निंदा च होते. तर मग चूप राहणे च बरोबर नाहीं काय?"

बापू अुत्तर देतात—

"हे शक्य आहे. परंतु कृत्रिम चूप राहण्यापासून काहीं फायदा नाहीं. जित्या जागत्या मौनाकरता तर फार मोठ्या साधनेची गरज आहे"

**कट्टर कृतिवाद**

परंतु ह्याचा अर्थ देखील चागला समजून घेतला पाहिजे. साधारणपणे ह्याचा अर्थ आम्ही निरंतर सत्कृति असा समजतों.

कृतिवादी नेहमीं म्हणतात कीं विचारानुसार आपण कृति करूं तर बोलण्याची गरज राहत नाहीं. बापूंनीं देखील अनेक वेळा असें म्हटलें आहे. परंतु ह्या ठिकाणीं त्याचा अभिप्राय दुसरा आहे. तो कोणता हें पाहण्याच्या आधीं कृतिवादाला च आपण आपल्या मनांत अधिक स्पष्ट करून घेअूं. कृतिवाद म्हणतो, 'प्रार्थना, नामस्मरण, पूजापाठ अित्यादि गोष्टींची वास्तविक कांहीं गरज नाहीं. आपण चोवीस तास सत्कर्मांत निमग्न राहिलो कीं पुरे. अितकें करता न आल्यास त्याची भरपाअी करण्याकरतां प्रार्थना अित्यादि गोष्टी आपण करतो. त्या करायला हरकत नाहीं, परंतु त्यापासून फारशा लाभाची अपेक्षा ठेवता येणार नाहीं. त्यांत पुष्कळदा वेळ व्यर्थ जाअील. दांभिकपणा देखील होअील. मनाचें काल्पनिक समाधान झाल्यानें आचरणांतील दोष सहन करण्याची वृत्ति निर्माण होअील. कदाचित् निष्क्रियता देखील वाढेल. अुत्तम म्हणजे हे कीं आपण कर्मांत निमग्न राहिलें पाहिजे. कर्म-शुद्धीचा मार्ग देखील कर्म च दाखवील. कर्मावर अन्य निष्ठा ठेवण्याअैवजीं थोडी निष्ठा कर्मावर, थोडी प्रार्थनेवर अशा तऱ्हेचा द्विधाभाव ठेवणें चांगलें नाहीं. द्वैत प्रत्येक अवस्थेत त्रास देतें. म्हणून निश्चय करा कीं 'कर्मभिर् निःश्रेयसम्'—कर्म च मोक्षदायक आहे. आपण वर अेक अुच्चारणवाद पाहिला तसा च हा कृतिवाद आहे. वादी नेहमीं कट्टर असतात. तसे हे देखील कट्टर आहेत.

अुंच अुड्डान

बापू जिथें रामनामापासून हि मुक्त होण्याची भाषा बोलतात तिथें ते कृतिवादाचा विचार करीत नाहींत. त्यांच्या विचाराची झेप अतिशय अुंच आहे. तिची कल्पना देखील कृतिवादाला असह्य होअील. बापूंचा भाव त्यांच्या शब्दांत बघा—

कृतकृत्यता

शंकराचार्यांच्या संन्यास-विवरणावर अेखादा कृतिवादी गरजेल, "ह्यांत तर कर्तव्यतेची हानि होते." तेव्हां त्याच शब्दाला मान्य करून ते अुत्तर देतात—"अलंकारो हि अयम् अस्माकम् यत् ब्रह्मात्मावगती सत्याम् सर्व कर्तव्यता-हानिः कृतकृत्यता चेति"

—आत्म-दर्शन झाल्यावर सर्व कर्तव्यतेची हानि होते आणि मनुष्य कृतकृत्य होतो, हें आम्ही आपलें भूषण समजतों.

हे च रामनामाचें साफल्य आहे, आणि अिथें च त्याची समाप्ति होते.



# नाम-माला

ॐ तत् सत्-श्री नारायण तू, पुरुषोत्तम गुरु तू,
सिद्ध बुद्ध तू, स्कंद विनायक, सविता पावक तू।
ब्रह्म मज्द तू, यह्व शक्ति तू, ओशु-पिता प्रभु तू,
रुद्र-विष्णु तू, राम-कृष्ण तू, रहीम ताओ तू।
वासुदेव गो-विश्वरूप तू चिदानंद हरि तू,
अद्वितीय तू, अकाल निर्भय, आत्मलिंग शिव तू।

(१)

या तीन श्लोकांत छत्तीस नामें आहेत. ही ओक नवीन वस्तु आहे, आणि हिचा आरंभ समजून घेणें चिंतनाला लाभदायक आहे.

मी अनेक धर्मांपासून भिन्न-भिन्न संस्कृतींची अुपासना करीत आलों आहे. ज्या वेळेस ज्या धर्मांची अुपासना करीत असे त्या वेळेस त्या धर्माच्या खास खास नामांचें हि चिंतन करीत असे. कुराणांत अल्लाहची अनेक नामें येतात, त्या सर्वांत गुणवाचक 'रहमान' अथवा 'रहीम' हें मुख्य आहे. तसें च चिनी तत्त्वज्ञानाचें मथन केल्यास "ताओ" शब्द मिळतो अशा प्रकारे अनेक धर्मांची आणि संस्कृतींची अुपासना माझ्या मनात चालत असे. परंतु यावेळीं जेव्हा मी हृषीकेशाहून हरिद्वारला जात होतों तेव्हा मार्गांत काली कमलीवाल्यानीं मला अेक चंदनाची मणिमाला भेट म्हणून दिली. अशा प्रकारच्या माळेचा अुपयोग मी फार च कमी केला आहे. तकली आणि चरखा याचा मला माळेसारखा अुपयोग झाला. तिने माझ्या चित्ताची चटकन्

अेकाग्रता होते तथापि त्यानीं मला माळ दिली च होती म्हणून रात्रीं निजताना ती मी आपल्याजवळ ठेवीत असे, त्या च बरोबर कांहीं चिंतन हि चालें त्यातन तीन श्लोक निमाण झाले परमेश्वराचे गुण अनत आहेत आणि म्हणून त्याचा नावें हि अनत आहेत भक्त-मटळींना जीं नामें आवडलीं त्यातन कांहींची निवड मी केली या निवडीची खुबी ही आहे कीं तींत सर्व धर्माचा समावेश झाला आहे हिंदुधर्मातील अनेक पथाचा निर्देश हि त्यात येअून गेला आहे सर्व मिळून नामस्मरणाचें हे अेक सुश्लिष्ट भजन बनलें आहे

या नाम मालेने माझें समाधान झालें आहे आणि माझ्या सायप्रार्थनेंतील तो अेक भाग झाला आहे

(२)

**ॐ तत् सत्** — या तीन शब्दात सर्व वेदाचें सार येअून जाते गीतेच्या १७ व्या अध्यायात त्याचा अुल्लेख आहे

**श्री** — ॐ तत् सत् नतर "श्री" पद आहे "श्री" शब्द लक्ष्मी-वाचक आहे, म्हणजे श्रमाचें प्रतीक आहे श्रमातन निर्माण होणारें अुत्पादन म्हणजे "श्री" सृष्टीमध्यें सर्वत्र जी शोभा दिसून येते तिचे सूचन "श्री" शब्दात आहे "सत् श्री" अेकत्र केल्यास शिखाचा अुपास्य मत्र बनतो

**नारायण** — नरसमुदायाची देवता आहे ती सर्व भूतांतर्यामी आहे परतु विशेषेकरून मानवासाठीं तिचा अुपयोग होतो

**पुरुषोत्तम** — सर्व पुरुषात अुत्तम रागद्वेष रहित, जो आदर्श गीतेच्या १५ व्या अ यायात सांगितला गेला आहे

**गुरु** — पंथ-प्रवर्तक; अिस्लाम, अीसाअी-धर्म, सीख हे सारे गुरु-पंथ आहेत, कारण हे सारे विशिष्टगुरूच्या नावावर प्रचलित झाले आहेत. जरी हिंदु-धर्म गुरु-पंथी समजला जाणार नाहीं तरी पण त्यात हि गुरु-प्रथा आहे. गुरु दत्तात्रेयाचा अेक विशिष्ट संप्रदाय आहे; त्याचें हि स्मरण यात गृहीत आहे. "नारायण पुरुषोत्तम गुरु" हे तिन्ही अेकत्र केल्याने चिंतनासाठीं अेक महान् आदर्श मिळतो.

**सिद्ध, बुद्ध** — जो समजला आणि जागा झाला. या दोन शब्दांनीं यथानुक्रम जैन आणि बौद्ध आदर्शांचें स्मरण होअून जाते.

**स्कंद** — दोष-स्कंदन, दोष-निर्दलन करणारी देवता. ब्रह्मचारी, कुमार, प्रसिद्ध देव-सेनानी.

**विनायक** — गणपति, समुदायाची देवता. कोणत्या हि कार्यारंभीं विनायक-स्मरण म्हणजे गणपति-स्मरण केलें जाते. सर्वांचा जो विशेष नायक तो विनायक.

**सविता, पावक**— प्रेरणा देणारा आणि पावन करणारा. सविता शब्दानें सूर्याचें आणि पावक शब्दाने अग्नीचें स्मरण होतें. सविता परमेश्वरी कृपा आहे. अग्नि निर्माण करण्यात आपलासुद्धा हिस्सा आहे. पारश्यात अग्नीची तसे वैदिकांत सूर्य, अग्नि दोहोंची अुपासना चालते.

**ब्रह्म** — बृहत् व्यापक तत्त्व, निर्गुण निराकार. जिच्यापासून ही सारी सृष्टि अंकुरित होते, टिकते व शेवटीं जिच्यात लीन होते.

**मज्द्**—अहुर मज्द. अहुर म्हणजे असुर. पारश्याची परमेश्वर-वाचक संज्ञा. वेदात सुद्धा असुराचा अर्थ परमेश्वर होतो. मज्द म्हणजे महान्.

**यह्व** — म्हणजे जुहोवा. यहुद्याची आराध्य देवता. हा सुद्धा मुळात वैदिक शब्द आहे.

**शक्ति** — प्रेम-स्वरूपात परमेश्वराची भक्ति करणारे ते भक्त म्हटले जातात त्याप्रमाणे ओश्वराची शक्ति-रूपात अुपासना करून समाज-रचनेची चिंता करतात ते "शाक्त" म्हटले जातात.

**ओशु-पिता** — परमेश्वर जगत् पिता तर आहे च परंतु विशेष अर्थाने तो भक्त-पिता आहे भक्ताचे प्रतिनिधि म्हणून ओशूचें नाव घेतलें आहे. ओशु पिता यात भक्त आणि भगवान् दोहोचे स्मरण होते.

**प्रभु** — प्रभावशाली परमेश्वर, लोकस्वामी.

**रुद्र** — संसाररूपी बंधनात जखडून रडविणारा, आणि कठिण साधनेनंतर संसारपाशातून सोडविणारा. संहार-देवता पण ती आहे.

**विष्णु** — विश्वाचे पालन करणारा. विश्व-व्यापक भगवान्. "रुद्र-विष्णु" शैव व वैष्णव भक्ताचे अुपास्य संकेत आहेत

**राम-कृष्ण** — सत्य व प्रेमाचे प्रतीक. राम-कृष्णाची संमिलित अुपासना आपल्या येथें साऱ्या देशात प्रचलित आहे

**रहीम** — जो अत्यंत दयामय आहे. शांतिपरायण अिस्लामचे स्मरण. अल्लाहचें गुण-विशेषण.

**ताओ** — चिनी संत, लाओ त्सेचा परम मंत्र. ताओ म्हणजे परमात्मा, ज्ञान-स्वरूप. मूळ 'तन्' धातूवरून हा शब्द होअू शकता. तन् वरून 'ताय' आणि 'तायी' शब्द संस्कृत साहित्यात येतात. गौडपादच्या कारिकेंत त्याचा अुल्लेख आहे, त्याच्याशी मिळता जुळता हा चिना शब्द आहे चिनी लोकांच्या संस्कृतीचा हा सूचक शब्द आहे.

**वासुदेव** — गीतेंत परमेश्वरासाठीं वासुदेव हें नाव योजलें आहे. 'वासुदेवः सर्वम्,' 'अिशावास्यमिदं सर्वम्.' हीं वचनें प्रसिद्ध आहेत. 'ॐ नमो भगवते वासुदेवाय,' हा द्वादशाक्षरी वेद-मंत्र वैष्णवांचा प्राण आहे.

**गो-विश्व-रूप**—म्हणजे गो-रूप आणि विश्व-रूप. वेद, अुपनिषद् आणि गीतेंत विश्व-दर्शन घडतें. विश्व-रूप म्हटल्यावर "गो-रूप" म्हणण्याला जागा च राहत नाहीं. कारण 'विश्व-रूपात' सर्व काहीं येअून जातें. तरी पण 'गो' म्हणजे वाणी, अर्थात् विश्व-प्रकाश शक्तीचें विश्वरूपाहून पृथक् स्मरण अभीष्ट आहे. "गो" शब्द गोरक्षेच्या अुपासनेचें हि सूचन करील.

**चिदानंद** — चैतन्य आणि आनंद आत्म-स्वरूप-दर्शनाचे शब्द आहेत. सत् जोडल्याने सच्चिदानंद होतें. "सत्" चा संग्रह प्रथम च "ॐ तत् सत्" मध्यें येअून गेला आहे.

**हरि** — पाप-संताप-हारि 'हरि'-नाम. सबंध भारतात राम-नामाच्या बरोबरीनें गाजत आहे. त्याची व्याख्या करण्याची गरज च नाहीं.

**अद्वितीय**—अेकम् सत्. अेकमेवाद्वितीयम्.
ला अिलाह लिल्लल्लाह

**अकाल**— जो कालातीत आहे. काळाचा हि काळ आहे. "सत् श्री अकाल" हा शिखांचा अुद्घोष आहे.

**निर्भय**—निर्भयता 'सद्गुण-सेना'-सेनापति. गीतेनें दैवी संपत्ती-च्या गुणांत याला प्रथम स्थान दिलें आहे. "गीते भय-द्वेषिणीम्" चें

मी मराठींत 'भय-द्वेषिणी' असे केलें आहे. भक्तासाठीं काल-भैरव पण अकाल-निर्भय होअून जातो

**आत्म-लिंग** — आ मा ही च ज्याची ओळख आहे. आपल्या-करता ओीश्वरामार्टी आत्म्यापेक्षा वरचढ कोणती च खूण होअू शकत नाही.

**लिंग** — या शब्दानें शैवाच्या (लिंगायत) विशिष्ट अुपासनेचे अनायास स्मरण होत

**शिव** — परम मगल. नम शंभवाय च मयोभवाय च. नम शंकराय च मयस्कराय च. नम शिवाय च शिवतराय च.

(१)

## गांधीजींचे बलिदान

( परंधाम, पवनार ता. ३१-१-४८ )

माझ्या प्रिय बंधूंनो आणि भगिनींनो,

आता या वेळीं दिल्लीला यमुना नदीच्या किनाऱ्यावर अेका महान् पुरुषाचें शरीर अग्नींत जळून राहिलें आहे. आपण या ठिकाणीं जशी आता प्रार्थना करीत आहांत तशी सबंध हिंदुस्थानभर प्रार्थना चालली आहे. कालचा च दिवस. संध्याकाळचे ५ वाजून गेले होते. प्रार्थनेची वेळ झाली होती व गांधीजी प्रार्थनेसाठी निघाले होते. मंडळी प्रार्थनेला जमली होती. गांधीजी प्रार्थनेच्या जागीं जात होते. अितक्यात कोणी अेक तरुण अिसम आला आणि त्यानें गांधीजींच्या देहावर गोळ्या झाडल्या. त्यांचा देह गळून पडला. रक्ताची धार वाहू लागली. वीस मिनिटांनीं देहांतील जीवन संपलें. सरदार वल्लभभाअी पटेल अेक तास भर त्यांच्याशीं चर्चा करून नुकते च घरा चालले होते. रस्त्यावरून च त्यांना परत यावें लागलें. बिर्ला हाउसमध्यें पोचल्यावर जो देखावा दिसला त्याचें वर्णन काल रेडियोवरून त्यांनीं सांगितलें. ते तुमच्यापैकीं बऱ्या च जणांनीं अैकलें असेल. पण खेड्यापाड्यांतील ही मंडळी अिथें जमली आहे, त्यांनीं तें अैकलें नसेल. सरदार वल्लभभाअींनीं अेक गोष्ट महत्त्वाची सांगितली. ती ही कीं गांधीजींच्या चेहऱ्यावर दयाभाव व माफीची भावना—म्हणजे अपराध्याविषयीं क्षमावृत्ति—दिसत होती. त्या नंतर ते म्हणाले कीं या वेळीं कितीहि दुःख होत असलें तरी क्रोध येअू नये । आला तरी तो आवरावा. गांधीजींचा शिकवण

ते जिवंत असताना आपण पाळूं शकलों नाहीं. परंतु आता त्यांच्या मृत्यूनंतर तरी ती आपण पाळावी.

असा च प्रसंग पांच हजार वर्षांपूर्वी हिंदुस्थानांत घडला होता भगवान् श्रीकृष्णाचें शेवटचें वय होतें. जीवनभर उद्योग करून ते थकले होते. गांधीजांप्रमाणे च त्यांनीं जनतेची निरंतर सेवा केली होती. थकून जंगलामध्यें एकदा ते झाडाला टेकून विश्रांति घेत होते. इतक्यांत एक व्याध, म्हणजे शिकारी, त्या जंगलांत आला. त्याला वाटलें, कोणी हरीण झाडाला टेकून बसलें आहे. शिकारी च तो, त्यानें नेम धरून बाण मारला. तो बाण भगवंताच्या पायाला लागून त्यांतून रक्ताची धार सुटली. शिकारी आपली शिकार धरण्यासाठीं म्हणून जवळ आला. पाहतो तों प्रत्यक्ष भगवान् जखमी झालेले समोर दिसले. त्याला फार दुःख झालें आपल्या हातून मोठें पाप घडलें असें वाटून तो दुःखी झाला. थोड्या च वेळानें भगवान् श्रीकृष्ण निजधामाला गेले. परंतु मरणापूर्वी ते त्या व्याधाला म्हणाले "अरे व्याधा, भिऊ नकोस. मरणाला तरी कांहीं निमित्त लागतें च. तू निमित्त झाला आहेस." असें म्हणून भगवंतानीं त्याला आशीर्वाद दिला

तसा च सारखी ही घटना पांच हजार वर्षांनंतर पुन्हा घडली आहे. दिसायला असें दिसेल कीं त्या व्याधानें अज्ञानानें बाण मारला होता, तर या तरुणानें जाणून बुजून, गांधीजींना नीट ओळखून, पिस्तुल झाडलें. त्या कामासाठीं च तो दिल्लीला गेला होता तो दिल्लीचा राहणारा नव्हता त्यानें गांधीजींना ते प्रार्थनेला जात असतां गाठून अगदीं जवळून गोळ्या झाडल्या. दिसायला असें दिसेल कीं या माणसाला गांधीजींची ओळख होती. पण खरी

स्थिति अशी नाहीं. जसा तो व्याध अज्ञानी तसा च हा तरुण हि अज्ञानी होता. त्याची अशी समजूत होती कीं गांधीजी हिंदुधर्माची हानि करीत आहेत. म्हणून त्यानें त्याच्यावर गोळ्या झाडल्या. पण जगात हिंदुधर्माचें नाव जर आज कोणी उज्ज्वल राखलें असेल तर ते गांधीजींनी च राखलें आहे. परवा ते स्वत च म्हणाले होते कीं, "हिंदु-धर्माच्या रक्षणार्थ कोणी माणूस नेमण्याची गरज जर ओश्वराला वाटली तर तो मला च या कामीं नेमील." इतका आत्मविश्वास त्यांच्या ठिकाणीं होता.

× × ×

स्वत ला जे सत्य वाटे ते अगदीं सरळपणानें ते सांगत असत. मोठमोठे लोक आपल्या रक्षणासाठीं "बॉडी-गार्ड" म्हणजे "देह-रक्षक" ठेवतात. गांधीजींनी असे देह-रक्षक कधीं च ठेवले नाहींत. देहाला ते तुच्छ लेखीत असत. मरणाआधीं च ते मरून राहिले होते. निर्भयतेचें त्यांचें व्रत होतें. जिथें अेखाद्या सैन्याला देखील जायची हिंमत व्हायची नाहीं तिथें अेकट्यानें जाण्याची त्यांची तयारी होती. जे सत्य आहे, लोकांच्या हिताचें आहे तें च सांगायचें. मग कोणाला बरें वाटो अथवा वाईट वाटो, किंवा त्याचा परिणाम कांहीं हि होवो. अशी त्यांची वृत्ति होती. ते म्हणत "मृत्यूला भिण्याचें कारण नाहीं. कारण आपण सगळे ओश्वराच्या हातीं आहोंत. आपल्या कडून जोंपर्यंत त्याला सेवा घ्यायची आहे तोंपर्यंत तो सेवा घेओील. आणि ज्या क्षणीं त्याला अुचलून न्यावेंसे वाटेल त्या क्षणीं तो आपल्याला अुचलून घेओील. म्हणून जें सत्य वाटतें तें च सांगणें हा आपला धर्म आहे. अशा वेळीं मी अेकटा जरी कदाचित् पडलों, व सगळी दुनिया माझ्या विरुद्ध गेली, तरी मला जें दिसतें तें च सांगितलें पाहिजे." अशा निर्भय वृत्तीनें ते वागले.

आणि त्याचा मृत्यु सुद्धा कशा स्थितींत झाला ? ते प्रार्थनेच्या तयारींत होते. म्हणजे त्यावेळीं त्यांच्या चित्तांत ओश्वराशिवाय दुसरा विचार नव्हता. त्यांचें सबंध जीवन च सेवामय व परोपकारमय असलेलें आम्हीं पाहिलें आहे. परंतु त्यातल्यात्यांत प्रार्थनेची भावना आणि वेळ विशेष च पवित्र म्हटली पाहिजे. राजकारणादि अनेक महत्वाच्या कामांत ते असत. पण त्यांची प्रार्थनेची वेळ कधीं चुकली नाहीं. अशा प्रार्थनेच्या वेळीं देहांतून मुक्त होण्यासाठीं जणु परमेश्वरानें माणूस पाठविला. आपण आपलें काम पार पाडीत असतांना मृत्यु आला याबद्दलचा त्यांच्या अंतःकरणांतील आनंद आणि निमित्त-मात्र झालेल्या गुन्हेगाराबद्दल दया बुद्धि असा दुहेरी भाव त्यांच्या चेहऱ्यावर मरणाच्या वेळीं होता, असें सरदारजींना दिसलें.

x x x

गांधीजींनीं आपला अुपवास सोडला त्यावेळीं देशांत शांति राखण्याचें ज्यांनीं वचन दिलें त्या निरनिराळ्या पक्षांच्या पुढाऱ्यांत कॉंग्रेस, मुसलमान, शीख, हिंदुमहासभा व राष्ट्रीय-स्वयंसेवक-संघवाले वगैरे सर्व च होते. आपण प्रेमानें राहू, असें त्यांनीं वचन दिलें व त्याप्रमाणें ते राहू हि लागले. अितक्यांत अेके दिवशीं प्रार्थनेंत गांधीजींच्या दिशेनें कोणी तरी बॉंब टाकला. तो त्यांना लागला नाहीं. त्या दिवशीं प्रार्थनेंत गांधीजी म्हणाले, "मी ओश्वराच्या प्रेरणेनें देशाची आणि धर्माची सेवा करीत आहे. ज्या दिवशीं मी जावें अशी ओश्वराची अिच्छा असेल त्या दिवशीं तो मला घेअून जाअील. म्हणून मरणाचें मला कांहीं वाटत नाहीं." दुसरा प्रयोग काल झाला ओश्वरानें गांधीजींना मोकळे केलें.

x x x

आपण सारे च देह सोडून जाणार आहोंत. त्यामुळें मृत्यूबद्दल कोणीचें हि दुःख मानण्याचें कारण नाहीं आओची आपल्या चार-दोन

मुलापुरती जी वृत्ति असते ती जगातील सगळ्याबद्दल गांधीजींची होती. हिंदु, हरिजन, मुसलमान, खिस्ती, त्या राज्य-कर्त्या विरुद्ध त्यांनी लढा दिला ते इंग्रज या सर्वांबद्दल त्यांच्या अंतःकरणात प्रेम होते. सज्जनावर जसें प्रेम करायचे तसें दुर्जनावर हि करा, शत्रूला प्रेमानें जिंका, असा मंत्र त्यांनी दिला. त्यांनी च आपल्याला सत्याग्रह शिकविला. आपण स्वतः कष्ट सहन करावेत, परंतु समोरच्याला धोका पोचरू नये, हे शिक्षण त्यांनी आपल्याला दिलें. असा पुरुष देह सोडून जातो तेव्हा ती रडण्याची वेळ नसते आई आपल्याला सोडून गेली म्हणजे जें वाटते ते गांधीजी गेल्याबद्दल वाटेल पण म्हणून आपण खिन्न होता कामा नये. अेकनाथांनी भागवतात म्हटलें आहे—"मरका गुरु नि रडका चेला, दोहोंचा बोध वाया गेला" अेक होता मरणाला भिणारा गुरु. मृत्युच्या वेळीं "मी आता मरतों रे" असें तो म्हणु लागला. तेव्हा त्याचे शिष्य हि रडू लागले अशा रीतीनें गुरु मरका न चेला रडका मिळून दोहोंचा हि बोध वाया गेला, असें अेकनाथांनी म्हटलें आहे. गांधीजी मरणाला भिणारे गुरु नव्हते. निष्काम भावनेनें सेवेंत देह झिजवावा. अशी सेवा ही च ओश्वराची सेवा आहे ती करीत असता ज्या दिवशीं तो बोलवील त्या दिवशीं जाण्यास तयार असावें. अशी शिकवण त्यांनी आपल्याला दिली. तदनुसार च त्यांना मृत्यु आला म्हणून हा उत्तम अंत झाला, असें आपण ओळखावें, आणि कामास लागावें

* * *

रलें, "तुम्हीं जर या अुपवासात गेलात तर आम्हीं कोणते काम करावें ?" त्यावर गांधीजी म्हणाले, "असा प्रश्न च तुमच्यासमोर कसा अुभा राहिला ? मी तर तुमच्यासाठीं भरपूर काम ठेवलें आहे खादी हिंद-स्थानात करायची आहे. खादीचें शास्त्र रचायचें आहे. अितकें मोठें काम तुमच्यासाठीं असताना काय करावें असा विचार का पडतो ?"

म्हणून आपल्यासाठीं त्यानीं जे भरपूर काम ठेवलें आहे ते आपण पुरे केलें पाहिजे. अमरय जाती आणि जमाती मिळून सगळे आपण अिथें अेकत्र नांदतो ४० कोटींचा आपला देश आहे. हें अेक आपलें मोठें भाग्य आहे परंतु अेकमेकावर प्रेम करून जगलों तर ते भाग्य आहे. अेवढें मोठें राष्ट्र असण्याचें भाग्य क्वचित च. आपल्या देशात अनेक धर्म आहेत. अनेक पंथ आहेत मी तर हे आपलें वैभव सम-जतो. पण आपण सगळे प्रेमानें राहू तर च ते वैभव ठरणार आहे. प्रेमानें रहावें हे च गांधीजींनीं आपल्या शेवटच्या अुपवासानें आपल्याला शिकविलें मुलानीं आपापसात प्रेमानें नांदावें यासाठीं आअीनें जसें जेवण सोडावें तसा तो अुपवास होता. सर्व मानव सारखे आहेत, हे त्यानीं आपल्याला शिकविलें. हरिजन-सेवा, खादी-सेवा, ग्राम सेवा, भंग्याची सेवा अित्यादि अनेक कामें आपल्यासाठीं ते ठेवून गेले आहेत.

आता यावेळीं मी अधिक बोलू अिच्छीत नाहीं अेका विशिष्ट भावनेनें सर्वांचीं मनें भरलेलीं आहेत. परंतु मला हे सांगायचें आहे कीं निव्वळ शोक करीत बसू नका. आपल्या पुढें असलेल्या कामाला लागा जसें मी तुम्हाला सांगून राहिलों आहे, तसें च तुम्हीं हि मला सांगा. अशा रीतीनें आपण अेकमेकाना बोध देत सगळे मिळून गांधीजींनीं मागितलेलीं कामें करू या गीतेत आणि कुराणात म्हटलं आहे कीं

सज्जन आणि भक्त अेकमेकांना बोध देतात व परस्परांवर प्रेम करतात. तसें आपण करूं या. आजपर्यंत आपण पोरकटपणानें कधी भांडत हि असू. आपल्याला ते सभाळून घेत. तसा सर्वांना सभाळून घेणारा असा माणूस आता अुरला नाहीं. म्हणून अेकमेकांना बोध देत, अेकमेकांवर प्रेम करीत गांधीजींची शिकवण सगळे मिळून पार पाडूं या.

---

(२)

## सामुदायिक प्रार्थना

(शांति-कुटिर, गोपुरी ता १-२-४८)

आज माझी विशेष काहीं सांगण्याची वृत्ति नाहीं. फक्त अेक वस्तु सांगूं अिच्छितो. हिंदुस्थानच्या अितिहास-कालांत कदाचित् कधी च न घडलेली अशी घटना आता घडली आहे. हिंदुधर्मांत सत्पुरुषाची हत्या कधी च झाली नाहीं असा मला अभिमान होता. परंतु तो अभिमान आता धुळींत मिसळला आहे. अेका महापुरुषाची हत्या झाली आहे. आणि ती देखील अशी वेळ शोधून की ज्यावेळीं तो प्रार्थनेसाठीं निघाला होता, आणि अशा कल्पनेनें की त्या योगानें हिंदुधर्मांच रक्षण होईल ! या तिन्ही गोष्टींचा मी विचार करतों तेव्हा मला फार लाज वाटते.

काल मी मागितलें या आपणांला "रडके येतें" बनायच नाहीं. म्हणून मी रडत नाहीं च. पण काहीं सुचत नाहीं. त्यामुळें आज जेव्हा मला सांगण्यात आलें या गोपुरींत तेरा दिवस सामुदायिक प्रार्थना

ठेवण्याचा विचार आहे आणि त्यात मी हजर रहावें अशी मंडळींची अिच्छा आहे, तेव्हा ती मी सहज च कबूल केली.

मला तर वाटते; बापूंच्या जीवनाची ही अुत्तम पूर्णाहुति झाली. सर्वोत्तम विचार करींत असतां देह सोडणे ही पुण्याची परिसीमा आहे, असें धर्मात सांगितलें आहे. ज्याने जन्मभर निरंतर धर्म-पालनाचा प्रयत्न केला तो आपलें दिवसाचें पवित्र कार्य पुरे करून प्रार्थनेसाठीं जात आहे, मित्राच्या बरोबर जात आहे, सर्वांना प्रार्थनेसाठीं बोलावीत आहे, आणि त्या च वेळीं त्याचा अंत होत आहे. असा मृत्यु अत्यंत पावन होय. या घटनेचा पुरा अर्थ जर आपण समजून घेतला तर त्यानें धर्माची शुद्धि होअील व देशाचें भलें होईल.

प्रार्थनेसाठीं ही संध्याकाळची वेळ फार चांगली आहे. दिवसभर काम करून संध्याकाळच्या वेळीं जर आपलें लक्ष भगवंताकडे लागलें तर आपलें काम पूर्ण झालें. आपण कुठें हि असलो तरी सामुदायिक प्रार्थना आपण विसरता कामा नये. प्रार्थनेंत आपलें सगळें चित्त लागावें. त्याने चित्तातील सर्व मळ धुअून निघेल. प्रार्थनेत अद्‌भुत शक्ति आहे. तिच्या योगानें चित्तात विजेसारखा संचार होतो. या प्रार्थने बरोबर आतां गांधीजींचे स्मरण नेहमीं च होत जाअील. भगवंतांनीं नारदाला म्हटलें आहे की, "नाहं वसामि वैकुंठे"—वैकुंठासारख्या अुत्तम स्थानीं हि कदाचित् मी नसेन; "योगिनां हृदये"—योग्याच्या हृदयात हि, की जे अेकांतात अेकटे ध्यान करतात, मी कदाचित् नसेन; "रवौ" म्हणजे सूर्य-मंडलात, सूर्यासारख्या प्रकाश-स्थानीं हि, मी कदाचित् नसेन; परंतु 'मद्‌भक्ता यत्र गायंति, तत्र तिष्ठामि नारद'—जेथें माझे भक्त अेकत्र होअून गायन करतात त्या ठिकाणीं मी अवश्य

असतो. अगदीं असें च गांधीजी म्हणून राहिले आहेत, कीं "मी अेखाद्या चांगल्या ठिकाणीं कदाचित् असणार नाहीं, पण जिथें प्रार्थना चालली आहे तिथें मी अवश्य असेन" त्यांचे हे शब्द माझे कान अैकत आहेत.

—हिंदी वरून

---

## (३)

## आमची जबाबदारी

(शांति कुटिर, गोपुरी ता. २-२-४८)

सरदार वल्लभभाअीनीं जे भाषण दिलें होतें त्यांत त्यांनीं जनतेला अशी सूचना दिली होती कीं जी दुर्घटना झाली आहे तिच्याबद्दल दुःख तर अपार च होत आहे आणि क्रोध हि येअू शकतो, पण आपण क्रोध आवरला पाहिजे. पण हे तेव्हा होअील जेव्हा आम्ही ओळखूं कीं क्रोधात शक्ति नाहीं, शांतीत च शक्ति आहे; आणि हिंदुस्थान सारख्या राष्ट्र-समूह-तुल्य देशात हिंसेला जर का मान्यता मिळाली तर मग स्वराज्य टिकूं शकत नाहीं, असा विश्वास दृढ होअून जाअील.

जें दुष्कृत्य झालें आहे त्याच्या मागें अेक हिंसक विचार-श्रेणी आहे. आणि हिंसक विचार-श्रेणी आपण हिंसेनें नाहीशी करूं शकत नाहीं. ती अहिंसेनें च नाहींशी करता येअील. परंतु आजपर्यंत हिंदुस्थान-मध्यें अहिंसेचें जे काहीं पालन झालें आहे ते पुष्कळसें लाचारीचें होतें. आणि स्व-राज्य-प्राप्तीच्या कामीं त्याची मदत होअील, अशा लोभामुळें त्याचा स्वीकार झाला होता. पण आता ती स्थिति राहिलेली नाहीं.

यापुढें आता असल्या लाचार आणि दुबळ्या अहिंसेचे कांही प्रयोजन अुरलें नाहा. आता तर वीर्यशाली अहिंसा च आम्हाला शिकली पाहिजे. त्यासाठी देवानें हा प्रसंग घडवून आणला आहे. ह्यावर आम्हाला गंभीरपणें विचार केला पाहिजे

ज्यांनी हा अविचार केला (येथें बहुवचनी प्रयोग मी बुद्ध्या केला आहे. कां की हें कोणा अेका माणसाचें काम नाहीं. याच्या मागें अेक गट आहे.) त्यांनी हें योग्य कार्य समजून च तो केला आहे. योग्य कार्यासाठीं हिंसा मान्य होअू शकते, ती धर्म हि होअू शकते, अशी धारणा जोंपर्यंत आहे तोंपर्यंत असलीं घृणित कृत्यें होत च राहणार आपण जर आपलें हृदय तपासलीं तर त्यांत हि कदाचित् आपल्याला असे भाव दडून बसलेले आढळून येतील. आपल्या हृदयात जर हा दोष थोडासा हि राहिला, तर सृष्टींत तो शतपट झालेला आढळून येईल. नुसतें क्रोध आवरणें पुरेसें नाहीं प्रेम करायला आम्हां शिकलें पाहिजे जीवनात आपण तसें परिवर्तन करायला पाहिजे. आजपर्यंत बापू होते ते आपणाला अुघडे पडूं देत नव्हते पण आता आपण दुनियेसमोर अुभे आहोत आता आपणाला जर कोणी झाकणार असेल तर तो आमचा सद्‌विचार आणि सदाचार च झाकील. आज तुलसीदासजींचें जें वचन आपण गाअिलें त्यांत सांगितलें आहे कीं आम्हाला चंदन बनलें पाहिजे. चंदनाला कुऱ्हाड तोडते, पण चंदन मात्र सुगंध च देतें. अर्थात् आम्हीं क्रोध करूं नये अेवढें बस नाहीं. अहिंसेची निष्ठा वाढविणें, संयाचा निष्ठा वाढविणें, प्रेम-भाव वाढविणें अवश्यक आहे.

आपण अितिहासात पाहतों कीं येशूच्या शिष्यांनी येशूच्या जीवतपणीं कांही विशेष तेज दाखविलें नाहा. पण येशूच्या मृत्यूनंतर त्यांच्यात

महान् तेज संचरलें. आणि सर्व संकटांना तोंड देऊन त्यांनी धर्म-प्रचार केला. त्याचा परिणाम म्हणजे आज जगात करोडों ख्रिस्ती आहेत. ते नावाचे च ख्रिस्ती आहेत, हे मी कबूल करतो. तसे हिंदू आणि मुसलमान हि नावाचे च आहेत. पण त्या त्या धर्माचे नाव घेणारे हि संख्येनें अितके आहेत त्या अर्थी त्यात काही सद्भाव मानला च पाहिजे. आणि तितकें श्रेय त्या शिष्यांना दिलें पाहिजे. शिष्यात जें तेज संचरलें त्याचें श्रेय अितिहास येशूच्या बलि-दानाला च देतो.

गांधीजींची हत्या झाली, म्हणून जर आम्ही क्रोधाविष्ट झालों आणि विवेक गमावून बसलों, तर आम्ही गांधीजींच्या हत्येंत सहभागी होअूं, आणि निस्तेज बनूं. म्हणून देहाची चिंता सोडून जर आम्ही चिंतन-पूर्वक आपल्या चित्तातील दोषांना धुअून काढू आणि नवी माणसें बनूं, तर पुष्कळ कार्य करूं शकूं. त्यासाठीं कसल्या संघटनेची गरज नाहीं, कसल्या रचनेची गरज नाहीं. गरज आहे तीव्र अंतःशुद्धीची. त्यासाठीं तीव्रात तीव्र चालना बाहेरून जितकी देणें शक्य आहे, तितकी देवानें आम्हाला दिली आहे.

—हिंदी वरून

---

(४)

## वर्ध्याच्या नागरिकांना

(गांधी चौक, वर्धा ता. ३-२-'४८)

[ प्रार्थना झाल्यानंतर विनोबांनी पुढील दोन मुद्दे सांगितले ]

माझ्या वर्ध्याच्या नागरिकांनो,

आज अधिक बोलण्याची मला प्रेरणा नाही. पण तुम्हांला अुद्देशून अेक-दोन गोष्टी सांगायच्या आहेत. तुमचा माझा संबंध पंचवीस वर्षांचा आहे. गांधीजी आमच्या या गावीं पंधरा वर्षें राहिले आहेत. अशा स्थितींत फार मोठी जबाबदारी आमच्यावर आहे. जेथें महात्माजींनीं पंधरा वर्षें घालविलीं तेथें त्यांच्या शिकवणीचा परिणाम अवश्य दिसायला पाहिजे. सर्व हिंदुस्थान तशी अपेक्षा करील, नव्हे सर्व जग करील. हे ओळखून आपलें जीवन आपण सुधारलें पाहिजे.

पहिली गोष्ट सांगायची ती ही की हिंदुस्थानांत अनेक जाति, अनेक धर्म, अनेक भाषा आदि असंख्य भेद आहेत. पण आपण ते मानायचे नाहींत. सर्वांशीं आपण सख्ख्या भावाप्रमाणें वागायचें आहे. विशेषतः तरुण मंडळींना आणि विद्यार्थ्यांना मला सांगायचें आहे. हिंदुस्थानचा संदेश जर जगांत जायचा असेल तर सर्व प्रकारचा भेद-भाव येथून नाहींसा झाला पाहिजे. आपले पूज्य कवि रवींद्रनाथ ह्यांनीं म्हटल्याप्रमाणें हिंदुस्थान अेक मानवाचा महासागर आहे. प्राचीन काळा-पासून हिंदुस्थानने सर्व मानवांना समान आश्रय दिला आहे. थोरांनी त्याचें असें गुण-गान केलें आहे. सर्वांनीं भेद-भाव विसरून अेकोप्यानें आणि प्रेमानें कसें रहावें ह्याचा आदर्श दाखवून देणारा महा-पुरुष

आपल्यास लाभला, हे आपलें भाग्य आहे. असा पुरुष हजार वर्षांत अेखादा लाभत असतो. तेव्हा आपण गट बनवण्याचे सोडून दिलें पाहिजे. गट बनविणे म्हणजे आधीं च द्विखंड झालेल्या हिंदुस्थानचे शतखंड करणे आहे. हिंदुस्थानच्या प्रेमाचा आणि अैक्याचा संदेश जगभर जावा अशी अिच्छा असली तर हिंदुस्थानने अेक होअून दाखविलें पाहिजे. आशियाचे डोळे हिंदुस्थानकडे लागले आहेत. असंख्य भेदांचीं दारूचीं कोठारें हिंदुस्थानात भरलीं आहेत. ठिणगी टाकली तर कोणत्या हि क्षणा भडका अुडू शकतो, अशी स्थिति आहे. म्हणून आपल्या येथील लोकानी सर्व प्रकारचे पंथ-भेद सोडले पाहिजेत, आणि अेकवटलें पाहिजे. त्यात च आपलें भलें आहे.

या विषयीं पानपतच्या लढाअींतील अेक गोष्ट सांगतों. ती लक्षात ठेवा. अेके दिवशीं संध्याकाळीं अहमदशहा अब्दाली आपल्या तळाबाहेर फेरफटका करीत असताना त्याने मराठ्यांच्या तळाकडे पाहिलें तों त्यामध्ये त्याला जिकडे तिकडे जाळ दिसले. त्याने विचारलें 'ह्या अितक्या आगी काय लागल्या आहे ?' त्याला सांगण्यात आलें हिंदूंत अनेक जाती आहेत, त्याना अेकमेकाचे भोजन चालत नाहीं. ते अलग अलग खातात पितात राहतात. तेव्हा तो म्हणाला, 'असें आहे काय ? मग चिंता नाहीं. मीं ही लढाअी जिंकली म्हणून समजा.' अेवढ्या वरून ओळखा कीं आपली ताकद कशात आहे आणि कमजोरी कशात आहे.

दुसरी गोष्ट सांगायची ती ही. तुम्ही आपल्या हातात कायदा घेअू नका. गुन्हेगाराचे यथायोग्य पारिपत्य सरकार करील असा विश्वास राखा. तुम्ही तसें करूं पाहणे म्हणजे अराजकता माजविणें

होईल. तसें करूं नका. सरकारशीं सहकार्य करा. सरकारचे हात मजबूत करा. लोक आपल्या हातात कायदा घेऊन स्वैरपणें वागूं लागल्यास कोणते हि सरकार टिकायचे नाहीं.

---

(५)

## खादी मध्यबिंदु

( ग्रामसेवा-कुटिर, गोपुरी ता. ४-२-'४८ )

आज मला अेक च वस्तु सांगायची आहे. बापूंनी आमच्या समोर जी विचार-सरणी ठेवली आहे, तिचा स्थूल मध्य-बिंदु खादी आहे; बाकीचें सर्व त्याभोंवतीं वसविलेलें आहे. थोड्या दिवसापूर्वी आश्रमच्या मंडळींनीं बापूंजवळ संदेश मागितला, तेव्हा त्यांनी हें च सांगितलें की 'तुम्हाला खादीचें शास्त्र रचायचें आहे, आणि त्यात च आपलें जीवन खर्च करायचें आहे.' आता बापू गेल्यानंतर आपल्यासाठीं खादी ही च त्यांची मूर्ति आहे. (मूर्ति या शब्दाचा भलता अर्थ केला जाणार नाहीं अशी मी आशा करतों. ) आम्हाला हवें आहे तसलें खादी-जीवन आमच्या येथें हि नाहीं ग्राम-सेवा-मंडळात मजूर आहेत, कुटुंबी कार्यकर्ते आहेत. अजून मजुरांच्या घरात खादी पोचलेली नाहीं. कार्यकर्त्यांची खादी देखील सर्व स्वतःच्या सुताची नसते. या ठिकाणीं जर ही वस्तु आपण सिध्द करूं शकलों नाहीं तर त्यात आपल्या शोधक-बुद्धीची उणीव आहे असें समजलें पाहिजे. आमचा मंडळी निरनिराळ्या उद्योगात गुतलेला

आहेत, हे खरें. परंतु ज्याना अितर काही अुद्योग नाही त्यानी च सूत कातावें असा थोडा च आमचा दावा आहे! आमचा दावा तर असा आहे की जो जो म्हणून कापड वापरतो त्या प्रत्येकानें सूत कातावें व तें सूत विणकराकडून विणवून घ्यावें. आमच्या ृसहातीत ही वस्तु सिद्ध करण्याचा आपण प्रयत्न केला पाहिजे.

तसें च या ठिकाणीं महिलाश्रमात मुली सूत कातनात. परंतु त्या हि भांडारातून खादी खरीदतात च. महिलाश्रम खादीच्या बाबतींत पूर्ण स्वावलंबी असला पाहिजे. सूत सर्व, मुलींकडून च विणलें गेलें पाहिजे. यात च शिक्षण भरलें आहे, असा अनुभव जीवनात आला पाहिजे. तर च गावांच्या मंडळीकडून अपेक्षित असलेलें तेज त्या दाखवूं शकतील.

ही च गोष्ट कॉलेजच्या विद्यार्थ्यांच्या बाबतींत हि म्हणता येअील. त्याच्यात जर चैतन्य निर्माण होअून खादी-जीवन सिद्ध करण्यात त्यानीं आपली शक्ति व बुद्धि खर्च केली तर ते पुरुषार्थी व गरिबाचे सेवक बनतील.

अेकतेसाठीं आम्ही अेखादें बाह्य चिह्न बनवितों. परंतु यापेक्षा चागलें दुसरें चिह्न च असूं शकत नाही. याच्यायोगानें विधायक शक्ति निर्माण होअून आज हवेत भरून राहिलेल्या हिंसेचा आपल्याला प्रतिकार करता येअील.

आम्हाला खूप च काम असतें त्यामुळे सूत कातायला वेळ मिळत नाहीं असें मानून घेण्यात आत्म-वंचना आहे. गाधीजींचे अुदाहरण आमच्या समोर आहे च. ते दिवसभर अनेकविध कार्यात मग्न असत, तरी पण कातण्यासाठीं वेळ काढूं शकत होते.

—हिंदी वरून

---

(६)

## विज्ञान आणि अहिंसा

( शांति-कुटिर, गोपुरी ता. ५-२-'४८ )

जगभरांतील महान् पुरुषांनीं गांधीजींच्या हत्येबाबत आपले शोक-अुद्गार व विचार प्रगट केले आहेत. अेका राष्ट्राच्या मुख्य प्रधानानें असें म्हटलें आहे कीं गेल्या महा-युद्धानें मानवांत पशुतेचा किती प्रचार केला आहे हें ही घटना दाखवून देत आहे. त्या च महायुद्धांतील अेक मोठे सेनापति मॅक आर्थर यानीं असें म्हटलें आहे कीं, "गांधीजींच्या विचाराचा आपल्याला आश्रय घ्यावा च लागणार आहे; त्याशिवाय जगाला शांति लाभणार नाहीं." हे अुद्गार अेका सेनापतीचे असल्या-मुळें ध्यान खेंचून घेतात.

कोठून हि का होअीना पण हिंदुस्थानात हिंसेची हवा शिरली आहे. अितक्या मोठ्या देशांत अनेक विचार-भेद व विवाद असायचे च. हे विवाद मिटविताना जर का हिंसेला मान्यता मिळाली तर केवळ अनर्थ च व्हायचा, ही वस्तु लक्षांत यायला हवी. पण अजून ती येत नाहीं. मोठमोठे विचारक हि म्हणतात कीं "शेवटीं तर अहिंसेचा च आश्रय घ्यावा लागणार आहे; पण सध्यां हिंसेशिवाय चालायचें नाहीं." परंतु आपल्याला हे समजायला हवें आहे कीं अहिंसा हा शेवटला नव्हे पण आत्ताचा धर्म आहे. तो शेवटचा हि आहे, मधला हि आहे, म्हणजे च नेहमींचा आहे. परंतु त्याची नितांत आवश्यकता जर केव्हा असेल तर ती आत्ता च आहे.

मला तर असें म्हणायचे आहे कीं सध्या 'अहिंसा विरुद्ध हिंसा' यात निवड करण्याचा प्रश्न नसून 'विज्ञान विरुद्ध हिंसा' यात निवड

करावयाची आहे. विज्ञान व हिंसा दोन्ही पतकरून चालणार नाहीं. ती दोन्ही मिळून आम्हांला खाअून टाकतील. हिंसा सोडायची नसेल तर विज्ञानाचा त्याग करून मध्य-कालीन युगांत प्रवेश करा. म्हणजे हिंसा जरी सुरू झाली तरी निदान आजच्या अितके नुकसान तरी ती करणार नाहीं. विज्ञानाला चिकटून रहायचे असेल तर मग हिंसा सोडली पाहिजे. विज्ञानात महान् शक्ति आहे. हिंसेचा जर त्याग केला तर विज्ञानाच्या साहाय्यानें पृथ्वीवर स्वर्ग अुतरवता येअील. परंतु विज्ञानाला हिंसेची जोड दिली तर ते मानवाला च नष्ट करील. म्हणून ज्याला म्हणून विज्ञानाची चाड आहे त्याने हिंसे विरुद्ध बंड पुकारले पाहिजे. शिक्षण-शास्त्रानें हि हे च लक्षात घ्यायला हवे. हिंसा त्याची वैरी आहे. जिथें हिंसा आली तिथें शिक्षण असू च शकत नाहीं. समाज-शास्त्राला हि हे लागू आहे. समाजाचा आधार हिंसा नसून अहिंसा आहे. अहिंसेच्या अभावीं समाज-शास्त्र च नाहींसे होते. अशा रीतीने विचार केला तर च हिंसेचा असुर नष्ट होअील.

बापू गेले, आणि त्याच्या स्मारकाची चर्चा चालू आहे. परंतु आपण अहिंसक-जीवन जर सिद्ध केले नाहीं तर जीं काहीं स्थूल स्मारकें होतील त्याच्या योगानें आमचे हसे होअील. म्हणून या तेरा दिवसात आपण आत्म-मथन करून आपलें जीवन सुधारूं या.

अेका गृहस्थानें लिहिले आहे कीं आपण प्रायश्चित्त केले पाहिजे. ते काय असावे? हिंसेनें काहीं हि लाभ होतो अशी शंका जर आपल्या चित्तातील अेखाद्या कोपऱ्यात राहिली असेल तर ती तेथून काढणे हे च अुत्तम प्रायश्चित्त होय. परंतु ही बोलायची वस्तु नाहीं. बोलण्यानें ती होणार हि नाहीं.

बोलण्याची तर्हा मला संशय नाही. आणि बोलण्याचा पूर्वीपासून च मला कंटाळा आहे. यावेळी अिथे बोलण्याचा तर मला भार च वाटतो. तथापि सहधर्मी अिथें आहेत त्यांच्याशी बोलल्याने आपला संकल्प दृढ होअील या कल्पनेने मी बोलत आहे. आपल्याशी च बोलाने तसें करीत आहे.

—हिंदी वरून

---

## (७)

## रामापेक्षा नाम थोर

(शांति-कुटिर, गोपुरी ता. ६-२-'४८)

आज रामायणात जें आपण अैकले त्यात अेक महान् विचार आहे. त्यात म्हटलें आहे की रूपाहून नाम श्रेष्ठ आहे. रूप थोड्या दिवसासाठी असतें; तर नाम हे शाश्वत आहे. भावार्थ हा की अेक व्यक्ति—मग ती रामचंद्रासारखी का असेना—जें करू शकते, त्यापेक्षा पुष्कळ च अधिक करण्याची शक्ति नामामें असते. रूप म्हणजे व्यक्ति आणि नाम म्हणजे विचार. व्यक्ति देखील मोठी असते ती तिच्यातील विशेष विचारामुळें च असते. म्हणजे ती व्यक्ति त्या विचाराच्या बाह्य प्रकाशनाची निमित्तरूप असते. परंतु शक्ति तर विचारात च भरलेली असते. या वस्तूचा अनुभव हि येतो. व्यक्तीचें अस्तित्व विचाराला जसें काही अंशी मदत-रूप होतें तसें त्यानें विचाराला बाधा हि पोचू शकते. व्यक्ति दूर झाली की शुद्ध विचार च अुरतो. म्हणून तुलसीदासजी

म्हणतात कीं रामापेक्षा हि रामाचें नाम श्रेष्ठ आहे. रामानें कोण-कोणते पतित तारले त्याची गणना करता येण्यासारखी आहे, परंतु नामानें त्यांना तारलें व पुढें हि तारले जातील त्यांची गणना च करता यायची नाहीं. विचाराचें हे सामर्थ्य तुलसीदासजींनी नाम-महिम्याच्या द्वारें आपल्यासमोर मांडलें आहे.

शेवटीं मनुष्याला शांति देखील विचारानें व विचारसूचक नामानें जितकी मिळते तितकी दुसऱ्या कोणत्या हि वस्तूनें मिळत नाहीं. म्हणून च नाम-स्मरणाचा महिमा गाइला आहे. नाम-स्मरणानें सहज च हृदय-परिवर्तन होऊन जातें. हें सर्व विचार-चिंतनाचें फळ आहे. त्यानें मार्ग-दर्शन हि लाभतें. संत जिवंतपणीं जितके समर्थ नव्हते त्यापेक्षा अधिक शक्तिशाली ते मृत्यूनंतर झालेले आपण पाहतों, कारण स्थूल रूप नाहींसें झालें व त्याबरोबर ज्या उणिवा होत्या त्या हि नाहींशा झाल्या, आणि परिशुद्ध, दिव्य अंश च शिल्लक राहिला. परंतु आमचा अेक मोह असतो. त्याला काय म्हणावें ? दर्शन-मोह म्हणता येअील. त्यामुळें रूप दिसेनासें झाल्यावर क्षणभर अंधार झाल्यासारखा दिसतो, परंतु प्रकाश नाहींसा होत नाहीं. आपण पाटीवर अक्षरें लिहितों व मागाहून तीं पुसून टाकतों. परंतु म्हणून त्याचा अर्थ पुसला जात नाहीं, हें आपण जाणतों. त्या च प्रमाणें अेखाद्या व्यक्तीमार्फत जो विचार प्रगट होतो तो त्या व्यक्तीच्या जाण्यानें नाहींसा होत नाहीं. अुलट विचाराचा प्रकाश अधिक च स्वच्छ होतो.

बापूंच्या जिवंतपणीं त्यांच्या विचारावर आमची श्रद्धा होती. ती या घटनेच्या योगानें कमी होणारी नाहीं. अुलट त्या श्रद्धेंत जी काहीं अधीर होती, संकोच होता, तो आता दूर होणार आहे. आणि कदा-

चित् म्हणून च अिश्वराच्या योजनेत अशा घटना साठविलेल्या असतात. 'कदाचित्' अेवढ्यासाठीं म्हणतो कीं अीश्वरी योजना निश्चितपणे आपण जाणू शकत नाहीं. ते आमच्या बुद्धि-शक्तीच्या बाहेरचें आहे. म्हणून त्या चिंतेत आपल्याला पडायचें नाहीं. अशा घटनामुळें आपल्याला आतरिक बळ काय मिळू शकते याचा च विचार केला पाहिजे. तसा विचार केला असता पुष्कळ च मिळने असे दिसून येते. आज सकाळीं चिंतन करीत असता हा विचार सुचला तो तुलसीदासजींच्या वचनाचा आधार घेअून तुमच्यापुढें माडला आहे.

— हिंदी नवन

---

## (८)

## गांधीजींचें स्मारक

(शांति-कुटिर, गोपुरी ता. ७-२-'४८)

गाधीजींच्या स्मारकाचा विचार सध्या लोक करीत आहेत. गाधीजींचें जीवन अत्यत व्यापक होतें जीवनाच्या बहुतेक शाखाशीं ते सबद्ध होते म्हणून अनेक प्रकारचीं स्मारकें होतील. राष्ट्राकडून हि अेखादें विशेष स्मारक होअील परतु ह्या सर्व स्थूल स्मारकानीं वास्तविक स्मरणाचे कार्य होअू शकणार नाहीं. मला धास्ती वाटते, त्या स्मारका-मुळें मुख्य वस्तु दृष्टीआड हि होअू शकते. पुष्कळदा असे होते कीं अेखाद्या विशिष्ट प्रसगीं भावनाची लाट अुसळते मग त्या भावनाच्या समाधानासाठीं मनुष्य काहीं बाह्य कृति करतो, आणि ती लाट हळू हळू नाशशी होते दु खाचा आवेग आला असता गभीर मनुष्य त्या

आवेगाचा अंत जिरवतो, आणि त्या पासून शक्ति निर्माण करतो. जिथें अशी गंभीरता नसते तिथें त्या दु:खाचें प्रकाशन विलाप किंवा अश्रु या रूपानें होतें आणि मग चित्ताचें समाधान होऊन जातें. त्या च प्रमाणें पूज्य बुद्धीच्या योगें मनुष्य कांहीं काळ अभिभूत होतो आणि त्याचें कांहीं बाह्य प्रकाशन करून शांत होऊन जातो. मीं असे कित्येक लोक पाहिले आहेत कीं जे अशा प्रसंगीं रात्र-रात्रभर भजन करतात. भजनाचा अेक आवेग असतो परंतु त्याचा जीवनावर कांहीं खास परिणाम झाल्याचें दिसून येत नाहीं. सद्भावाचा अंश त्यात असो बापडा, पण तो असतो आवेग च आणि तें भजन त्या आवेगाच्या समाधानाचा अेक प्रकार असतो.

परंतु आम्ही असें होऊं देता कामा नये. म्हणजे केवळ बाह्य स्मारकांनीं तृप्त होता कामा नये. अुलट गंभीरपणें विचार करण्याची वृत्ति राखली पाहिजे. जीवनात च परिवर्तन झालें पाहिजे. आमचें जीवन पापी आहे याची जाणीव झाली पाहिजे. तें तसें नसतें तर झालेली दुर्घटना झाली च नसती. अेकानें मला विचारलें—"गांधीजी सारख्या अेका महान् पवित्र पुरुषावर कोणा मारेकऱ्याचा हात च कसा चालला?" ही अेक विचार करण्यासारखी गोष्ट आहे. मीं म्हटलें—गांधीजी अेक व्यक्ति थोडे च होते! त्यांनीं आम्हा सर्वांचें ओझें आपल्या शिरावर घेतलें होतें. आमचें जीवन मलिन आहे म्हणून च ही हत्या संभवली. जर ते अेक व्यक्ति असते, त्यांनीं आमचें ओझें अुचललें नसतें तर ती वेगळी गोष्ट होती. परंतु ज्या अर्थी त्यांनीं आमचें सर्वांचें ओझें अुचललें आणि शेवट पर्यंत तें पार पाडलें त्या अर्थी ह्या हत्येची जबाबदारी आमची आहे हें ओळखून जे विचार-दोष आपल्यात

असतील ते सर्व काढून टाकले पाहिजेत, आणि जीवनात तसे परिवर्तन केले पाहिजे. नाहीतर केवळ बाह्य स्मारक—मग ते किती का अुपयुक्त असेना—कमी तर ज्यासाठीं आम्हाला तयार व्हायला पाहिजे आहे त्याची पूर्ति ते करणार नाहीं. आणि अशा प्रकारे तयार झाल्याशिवाय ह्या घटनेचे प्रायश्चित्त होणार नाहीं.

—हिंदी वरून

---

(९)

## स्मारकांबाबत विवेक

(शांति कुटिर, गोपुरी ता. ८-२-'४८)

काल स्मारकासंबंधीं सांगताना मीं असे म्हटलें होते की बाह्य स्मारकाच्या नादात आंतरिक वस्तु आपण विसरता कामा नये. तथापि बाह्य स्मारके तर होतील च. त्यात हि विवेक करण्याची गरज आहे.

मला दोन-तीन पत्रें आली आहेत. त्यात स्मारकाबद्दलच्या सूचना आहेत. अेक सूचना अशी आहे की शक्यतों दर गावात गांधीजींचे मंदिर असावे. त्यात गांधीजींची व कस्तुरबाची मूर्ति असावी. सूचना करणाराच्या भावनेची कदर करून हि मला म्हणायचे आहे की अशा प्रकारचा अुपक्रम वोखयाचा आहे. आज हिंदुस्थानात अशा हि व्यक्ति आहेत की त्यांच्या शिष्यांनीं ते अवतार असल्याचा दावा केला आहे. गांधीजींच्या बाबतींत असली मूढ भक्ति आपण करता कामा नये. ते अेक मानव होते आणि मानव च राहोत. त्यांना तसे राहू देण्यात च

आपला लाभ आहे. असे केल्याने अेका सज्जनाचे चित्र आपल्यासमोर राहील आणि अेक नैतिक आदर्श राहील, ज्याची आज जगाला अत्यंत जरूर आहे. अुलट त्याना जर आपण देव बनविलें तर त्याने देवाना तर काही च लाभ होणार नाहीं, पण आपण मात्र मानवतेचा अेक आदर्श गमावून बसू. भक्ति-भावासाठीं भरपूर सामग्री आपल्यापाशीं आहे. त्यासाठीं आणखी नव्या देवतेची जरूर नाही. जरूर जर कशाची असेल तर ती जीवन-शुद्धीच्या अेका पावन अुदाहरणाची आहे. नीतीचें नवें अुदाहरण जें काम देते ते जुने देत नाहीं. असे अुदाहरण बापूच्या रूपानें आपल्याला लाभलें आहे. त्याला देव बनविल्याने आपण ते गमावू. आणि त्याच्या बदल्यात दुसरा कोणता च लाभ आपल्या पदरात पडणार नाहीं अनेक संप्रदायात आणखी अेका संप्रदायाची भर घालून काय मिळणार ? ज्या रामाचे नाव घेअून त्यानीं देह सोडला त्याची च आपण भक्ति करावी, त्याचे च नाम गावे, हे अधिक चागले. आणि हा राम देखील कोणचा ? दशरथाचा पुत्र नव्हे, पण दशरथाने आपल्या पुत्राला ज्याचे नाव ठेवलें तो म्हणजे च अंतर्यामी आत्माराम. अीश्वराचे अनेक गुण आहेत. त्या गुणाचा विचार करून त्याचीं अनेक नावें आपण घेअू शकतों. परंतु अेखाद्या व्यक्तिचें नाव मात्र अीश्वराशीं जोडू नये. मला तर आणखी अशी धास्ती वाटते का या संप्रदायावरून पूर्वीं जसे झगडे झाले तसे भविष्यकाळीं होण्याची शक्यता यामुळे आपण निर्माण करतों.

म्हणून नम्र भाव राखून, गाधीजींच्या मानवतेबद्दल आदर बाळगून आपण त्याच अनुसरण करावें आणि करू शकलो तर त्यात वृद्धि करावी. परंतु मूर्तीत वृद्धि करू नये.

(१०)

## 'अीश्वर अल्ला तेरे नाम'

(शांति-कुटिर, गोपुरी ता. ९-२-'४८)

सर्व धर्मांच्या शुद्धीसाठीं व अेकतेसाठीं गांधीजींचे बलि-दान झालें आहे. अनेक पंथांचा व विचारांचा समन्वय हिंदुस्थानात प्राचीन काळापासून होत आला आहे. हिंदु-मुसलमानांचा जेव्हापासून संबंध आला तेव्हापासून दोहोंचा समन्वय करण्याचा प्रयत्न कबीर, नानक वगैरे संतांनी केला आहे. राम-रहीम, कृष्ण-करीम अेक आहेत हीं त्यांचीं च वचनें आहेत. परंतु अलीकडे मुख्यतः राजकीय कारणामुळें हिंदु-मुसलमानांत भेद निर्माण केले गेले व ते वाढविले गेले आहेत. म्हणून पुन्हा "अीश्वर अल्ला तेरे नाम" चा गजर गांधींनी सुरू केला व त्याच्या परिणामीं त्यांचे देह-समर्पण झालें. जेव्हा मध्यंतरीं भेद वाढविले गेले तेव्हा ते अनेक प्रकारांनी वाढविले गेले. तोंपर्यंत विचारांचा समन्वय होत होता व लोक मिळून मिसळून राहत होते. अेकमेकांच्या उत्सवांत ते भाग घेत होते व अशा रीतीनें दोन्ही समाज अेकरूप होत चालले होते. आता भेद-भावाच्या प्रचारामुळें अेकमेकां-बद्दल गैरसमज वरे च वाढले आहेत. ते दूर होतील व झाले पाहिजेत. त्यासाठीं " अीश्वर अल्ला तेरे नाम " हा मंत्र समर्थ आहे. जे अध्ययन करूं शकतात ते अेकमेकांच्या धर्मांचें अध्ययन करतील व त्या योगानें समन्वय पूर्ण होअील.

काहीं वर्षांपूर्वीं कुराणाचा अभ्यास करावा असें मला सुचलें. तसें पूर्वीं मी कुराणाचें अिंग्रजी भाषांतर वाचलेलें होतें. परंतु त्यानें तृप्ति होत नव्हती. कारण अरबी व अिंग्रजीच्या रचनेंत व शब्द-सृष्टांत

फार फरक आहे. म्हणून मूळ अरबींत च कुराण वाचण्याचा विचार केला. माझा स्वदेशी-धर्म मला पवनार सोडूं देत नव्हता. म्हणून तिथें बसल्या-बसल्या होओू शकलें तेवढें अध्ययन मीं केलें. कुराणाच्या शब्दाच्या थेट मुळाशीं जाण्याचा मीं प्रयत्न केला. या सर्व प्रयत्नात माझे आधींच च कमजोर असलेले डोळे आणखी बिघडले. परंतु मानसिक लाभ मला बरा च झाला. सर्व धर्मीत अेकता आहे ही श्रद्धा तर - आधीं पासून च होती. कारण, मानव-हृदय अेक आहे, आणि धर्म निर्माण करणारे थोर हृदयाचे असतात. परंतु या अभ्यासानें त्या श्रद्धेची प्रत्यक्ष अनुभूति आली. माझा अभ्यास चालू असता अेका चागल्या विद्वान व सद्भावना राखणाऱ्या गृहस्थानें मला लिहिलें कीं "तुम्ही कुराणाचें अध्ययन करीत आहात, तर काय कुराणात देखील अहिंसा अित्यादि गोष्टी आढळतात ?" म्हणायचा भावार्थ असा कीं अशा गोष्टी कुराणात सापडणे म्हणजे अेक आश्चर्याची च बाब आहे कुराणाच्या अभ्यासानें मला हें दिसून आलें की अिस्लाम हि अत्यत सहिष्णु धर्म आहे, त्याप्रमाणें सर्व च धर्म असले पाहिजेत. कारण सत्याच्या प्रचारात जबरदस्ती असू च शकत नाहीं. हे कुराणानें स्वत च सागितलें आहे.

कुराणात आणखी हि अेक वस्तु मला सापडली. जगात 'दीन' अेक आहे, 'मजहब' अलग अलग आहेत. सत्याच्या मार्गानें चालणे हा 'दीन' म्हणजे धर्म, आहे; व या सत्याला अनुसरून वागण्याचे पथ म्हणजे 'मजहब'. ते अनेक असतात. पुढें सागितलें आहे कीं तुम्ही सर्व अेक च 'अुम्मत', अेक च समाज, आहात. चालीरीतीमुळें च भेद पडले आहेत, त्याचे कांहीं महत्व नाहीं. मीं आता च तुमच्यासमोर कुराणाचा अेक लहानसा अध्याय म्हटला. त्यात अिस्लामचे सर्व सार येअून जातें.

त्यात पैंगबर म्हणतो की 'अस्ताला जाणाऱ्या सूर्याला साक्षी ठेवून मी प्रतिज्ञा-वाक्य अुच्चारतो की जसा सूर्य अस्तगत होत आहे तसें च मनुष्याचें जीवन हि क्षणिक आहे. जे आपलें जीवन शाश्वत समजून बसले आहेत, ते धोक्यात आहेत. फक्त ते च धोक्यात नाहात की जे अीश्वरावर भरवसा ठेवतात, सत्कार्य करतात, व अेकमेकांना सत्याच्या मार्गाने चालण्याचा व शांतीचा बोध देतात.'

जिथें जिथें कुराणात अीश्वरावर भरवसा ठेवण्याचा अुल्लेख आला आहे, तिथें तिथें सत्कर्म करणें त्याच्याशीं जोडलेलें च आहे दोन्ही मिळून अेक वस्तु आहे. अेक आंतरिक आहे, दुसरी बाह्य आहे. 'हक्' व 'सब्र', म्हणजे सत्य व शांति, हा च थोडक्यात अिस्लाम होय हा च हिंदु धर्म, हा च खिस्ती धर्म, हे च सर्व धर्म होत म्हणून "अीश्वर अल्ला तेरे नाम" हा छोटासा मंत्र सर्व धर्मांच्या शुद्धी चा व समन्वयाचा मंत्र आहे. त्याचा आश्रय करून आपण जर सत्य व अहिंसेची निष्ठा दृढ केली तर या बलि-दानानें अेक नवें युग सुरू होअू शकतें.

—हिंदी वरून

---

## (११)

## सामुदायिक अहिंसेची गरज

(शांति कुटिर, गोपुरी ता. १०-२-'४८)

बापूंच्याबद्दल जे शोकोद्गार प्रगट झाले आहेत ते पाहता अेक गोष्ट विशेष लक्षात येते. ती ही की हे विचार जगाच्या प्रत्येक कोपऱ्यातून

आणि वेगवेगळ्या विचारांच्या लोकांकडून प्रगट झाले आहेत. त्यात कांहीं लोक तर असे आहेत की जे संघटित सरकारें चालवीत आहेत व हिंसात्मक संघटन हि करीत आले आहेत. कांहीं चिंतनशील विचारक आहेत. सर्वांनीं बापूचा संदेश जगाला अत्यंत जरुरीचा आहे असे म्हटलें आहे. याचा अर्थ असा कीं आज जगाचे विचारक हिंसेला विटलेले आहेत. हिंसेतून कसें सुटावें याचे दर्शन अजून होत नाहीं. परंतु गांधीजींनीं सामुदायिक अहिंसेचा जो विचार जगापुढें ठेवला आहे, त्याचा कोणत्या-ना-कोणत्या प्रकारें व केव्हां तरी अंमल केल्यावाचून सुटका नाहीं; आणि तो अमलांत आणण्याची शक्यता जितकी लवकरात लवकर होईल तितकें चांगलें, असा त्या शोकोद्गारांत भाव आहे.

हिंदुस्थानच्या लोकांना त्याच्या मूल्याचें अजून भान नाहीं. कारण, दीडशें वर्षेंपर्यंत जनता जबरदस्तीनें निःशस्त्र करण्यांत आली होती. कदाचित् त्यामुळें च शस्त्रावरील विश्वास वाढला, त्याचें मानसिक महत्व वाटलें. जी वस्तु आपल्यापाशीं नसते तिचें मानसिक महत्व वाढत असते. सामुदायिक अहिंसेचा विचार पटण्यासाठीं जें मनो-बल लागतें, जी कल्पना-शक्ति लागते, जो पुरुषार्थ लागतो त्याची उणीव आपणांत असण्याचा संभव आहे. तथापि गांधीजींचा विश्वास होता— व हिंदुस्थानची सभ्यता आणि संस्कार पाहता अशी आशा करता येते —कीं आधीं हिंदुस्थान च हा विचार आत्मसात करील. पचवीस तीस वर्षांपासून याचा मोडका तोडका प्रयोग इथें केला गेल्यामुळें कांहीं लोकांच्या मनांत श्रद्धा उत्पन्न झाली, इतकें तर झालें च आहे.

जगाला कांहीं सुचेनासें झालें आहे. तें घोटाळ्यांत पडलें आहे. अशा स्थितींत हा मुख्य विचार आपण कुठपर्यंत जिरवू शकतों,

त्यासाठीं जें जें करायला हवें तें आपण किती करूं शकतों, याचा गंभीरपणें विचार केला पाहिजे. ज्या शंका असतील त्यांचें विश्लेषण व निवारण केलें पाहिजे. अशा रीतीनें थोडे लोक जरी आपली निष्ठा दृढ करूं शकले, तरी अेक विचार-बीज पक्कें होअील. त्यांतून मग वृक्ष निर्माण होअूं शकेल. आपल्याकडून ही अपेक्षा न करावी तर मग कोणाकडून करावी ? या बाबतींत आपण च जर शंका-शील राहिलों तर अितराकडून आशा करता येणार नाहीं. या बाबतींत विचार करतों तेव्हां बाकीच्या सार्‍या योजना, संघटना, कामें फिक्कीं वाटतात. अहिंसेचें संशोधन व आमच्या शक्तीचें निरीक्षण यांची अत्यंत जरूर वाटते.

—हिंदी वरून

---

## (१२)

## दोन स्मरणें

(शांति-कुटिर, गांपुरी ता. ११-२-'४८)

माझ्या भगिनींनो आणि बंधूंनो,

आज जमनालालजींचा सातवा पुण्य-दिवस आहे. आणि गांधीजींच्या मृत्यूचा तेरावा दिवस आहे. असा हा अेक योग श्रद्धालु माणसाच्या लक्षांत येतो. जानकीदेवींनीं आठवण दिली की आजच्या दिवशीं जमनालालजींच्या शेवटच्या भेटीसाठीं गांधीजी या च वेळीं अिकडे आले होते. तशी च गांधीजींच्या देहाची राख सेवाग्रामहून आज अिथें येअून पोंचली आहे. भावार्थ अितका च आहे की त्या दोन्ही

महापुरुषांचीं जीवनें अेकमेकांत समरस झालीं होतीं. आजच्या या योगावरून हे सिद्ध करण्याची गरज नाहीं. त्याचीं जीवनें च ते सांगतात.

गांधीजी येथें वर्ध्यास येअून पधरा वर्षें राहिले. त्याना आणण्याचे श्रेय जमनालालजींना च आहे. जमनालालजींनी जिथून जिथून जी जी पवित्रता वर्ध्याला आणता आली तितकी आणली. त्यांनी भगीरथाप्रमाणे अिथें गंगा आणली. आणि वर्धा अेक क्षेत्र बनविलें. येथें ज्या अनेक संस्था दिसतात त्या बहुतेक जमनालालजींच्या च कृति आहेत. गांधीजींनीं अेखादा विचार करावा आणि जमनालालजींनीं तो अमलात आणावा असें त्यांचें नातें होतें. आज जमनालालजींचीं काहीं पत्रें चाळीत होतों. अेका पत्रात त्यांनीं म्हटलें आहे : "गांधीजींचें मार्ग-दर्शन आपल्याला अुत्तम मिळालें आहे. त्यांनी दाखविलेल्या मार्गानें निष्काम जन-सेवा केली तर या च जन्मीं मोक्ष गाठता येअील. या च जन्मीं मोक्ष न लाभला तरी चिंता नाहीं. अनेक जन्म घेअून सेवा करीत राहण्यात हि गोडी आहे. बुद्धि शुद्ध राहिली म्हणजे झालें." रोजनिशींत त्यांनीं असें लिहिलें आहे. वर्ध्याची त्यांनीं किती प्रेमानें सेवा केली ! केवळ स्वदेशी धर्माअितर त्यांनीं वर्ध्यावर प्रेम केलें.

आज तुलसी-रामायणातून भरताचें जे चरित्र गाअिलें तें त्याना फार आवडे. गांधीजींना हि ते फार प्रिय होतें. भारत-वर्ष हे आपल्या देशाचें नाव हि भरताशीं निगडित आहे. भरत, रामाजवळ रहायला न मिळालें तरी, रामाचें नाव घेअून रामाचें काम करीत होता. हे रामाचें राज्य म्हणून चालवीत होता. कवीनें वर्णन केलें आहे रामचन्द्र वनात गेले. तपश्चर्या करून कृश झाले भरत अयोध्येंत राहून च तपश्चर्येनें कृश झाला. अेकाची तपश्चर्या वनात झाली. दुसऱ्याची नगरात झाली.

रामचंद्र वनवास संपवून अयोध्येला परत आले. भरताला भेटले. तेव्हां ओळखता येईना की वनातून आलेला कोण आणि नगरातला कोण? असे ते भरताचे चरित्र दोघांना आदर्श म्हणून आपल्यासमोर ठेविलें होतें.

आता जमनालालजी हि गेले, आणि गांधीजी हि गेले आहेत. तुम्ही आम्ही वर्धाचे नागरिक, ज्यांनी त्यांनी निरंतर सेवा केली ते, त्यांच्या मागें आज त्यांच्या पुण्यतिथीचा दिवस पाळीत आहोत. यात त्यांच्यासाठी काहीं च नाहीं ते तर आपल्या उत्तम कर्मानें च पुण्य गतीला गेले आहेत. आपण आपल्या चित्त-शुद्धीसाठीं हे सारे करीत असतो. जमनालालजी आणि गांधीजी दोघांनी जाति, धर्म आदि वगैरे हि भेद पाहिले नाहींत. मनुष्य मात्र अेक समजून सेवा केली. गरिबांशीं अेकरूप होण्याचा निरंतर यत्न केला. "परहित बस जिनके मनमाही, तिन कहु जग दुर्लभ कछु नाहीं," ह्या तुलसीदासांच्या वचनानुसार पर-हित आचरून जगातलें सर्व काहीं साधलें. असे हे दोन आदर्श पुरुष आपल्या समोर होऊन गेले

साधारण माणसाला वाटते, आपण आपला स्वार्थ साभाळावा. पण स्वार्थ तू कोणता साभाळणार? शरीर अेक दिवस सोडून जावें च लाग- णार आहे तर ते लोक-सेवेंत चंदना प्रमाणे झिजविलें पाहिजे. 'जरी चंदन झिजे ना, तरी सुगंध सुटे ना'. चंदन जर झिजलें च नाहीं तर सुगंध सुटला? मग अितर झाडें व चंदन यात फरक काय? आपण सेवा केली नाहीं तर मनुष्य-जन्माला येअून काय साधलें? खाण्या- पिण्यात आणि चैन करण्यात च सार्थक मानलें तर जनावरें आणि माणसें यात फरक काय राहिला? महापुरुषांची नावें आपण घेतों तीं

का? ते आपल्या देहाची चिंता सोडून साऱ्या जगाचे हित चिंतीत होते म्हणून.

रोज संध्याकाळी निजण्यापूर्वी विचार करावा की आज मी आपल्या देहासाठीं भाराभर कामें केलीं, पण जगासाठीं काय केलें? का कोणा आजाऱ्यांची सेवा केली? का कोठली घाण साफ केली? का कोणा दुःखी माणसाला सुखविलें? का कुणाला काहीं मदत केली? असा विचार लहान मुलानें करावा, म्हाताऱ्यानें करावा, तरुणानें करावा; स्त्रियांनी, पुरुषांनी सर्वांना करावा. दिवसभरात काहीं परोपकाराचें काम केलें नसेल तर तो दिवस वाया गेला म्हणून समजावें. आणि काहीं तरी सेवा करून च निजावें. माझी आपणा सर्वांना विनंति आहे की, मडळींनी परोपकारासाठी च आपलें जीवन खर्च करावें, आणि लोकाकडून म्हणवून घ्यावें की "हा मेला खरा, पण आमच्यासाठीं झिजून मेला."

---

(१३)

## परमात्म्यांत लय

(पवनार तीर्थ, परधाम, पवनार ता. १२-२-'४८, दुपारीं १२ वाजता)

माझ्या बंधूनो आणि भगिनींनो,

एक पवित्र आत्मा परमात्म्यात लीन झाला आहे, आणि त्याच्या देहाचा शेवटचा अवशेष हि आता सृष्टीमध्यें मिसळून गेला आहे.

देह मेल्यानें आत्मा मरत नाहीं, याची साक्ष आज तुमचीं आमचीं मनें देत आहेत. जे विचार गांधीजींच्या हृदयात राहत होते, त्याचा

प्रचार देहाच्या यत्नानें मर्यादित झाला होता, तो आता तुमच्या आमच्या हृदयात प्रवेश करीत आहेत. यापुढें आपण त्या प्रमाणें वागण्याचा सतत यत्न करूं.

हिंदु, मुसलमान, बौद्ध, पारशी, खिस्ती, यहुदी आदि निरनिराळ्या धर्मांचे लोक आपले बहीण-भाऊ आहेत. आपलें हें मोठें भाग्य आहे. तें ओळखून आपण सर्व प्रकारचा भेद-भाव विसरून जाऊं, आणि प्रेमानें अेकत्र राहूं. हरिजन आणि परिजन हा दुष्ट भेद काढून टाकूं, आणि सारेच हरिजन होऊन जाऊं. आपल्या हातच्या सुताच्या खादीनें आपलीं शरीरें झाकूं. गाईं आरशासारखीं निर्मळ राखूं व्यसनें सारा झाडून टाकूं. अीश्वराचें नित्य स्मरण करूं. सत्य आणि अहिंसा हें व्रत घेऊं. परमेश्वर ही प्रतिज्ञा पार पाडण्याचें बळ आम्हास देवो, अेवढी च प्रार्थना.

---

## (१४)
## संकल्प

(शांति-कुटिर, गोपुरी ता १२-२-'४८)

आज धाम नदीच्या तीरीं जें दृश्य पाहिलें तें तर अेखाद्या पुनर्जन्माचें च दृश्य होतें अीशावास्य म्हणत असताना जी अनुभूति मला आली तिचें शब्दानें वर्णन करता येणें शक्य नाहीं. आत्म्याच्या व्यापकतेविषयीं ज्ञानी पुरुषांनीं आम्हाला शिकवण दिली आहे. श्रद्धा हि त्यावर बसते परंतु आज सर्वांना त्याचा साक्षात्कार झाला. शेवटीं जीं

दोन-चार प्रतिज्ञा-वाक्यें मी अुच्चारलीं, तीं अुपदेश-स्वरूप नसून संकल्प-स्वरूप होतीं. काकासाहेबांनी रक्षेचा कलश त्या स्थानावर ठेवला व त्याला भक्ति-भावाने प्रणाम केला. माझी नजर त्यावेळी कलशावर नव्हती, तर त्या भक्ति भावाने तो प्रणाम होत होता त्याकडे होती. त्यांनी कित्येक वर्षेपर्यंत अेकत्र कार्य केलें असे आम्ही सर्व त्या ठिकाणीं अेकत्र होअून अेका स्थूल देहाच्या अवशेषाला अंतिम स्थान देत होतों. त्या सर्व क्रियेंत शोकाचा तर आभास हि नव्हता. गंभीरता होती व ओश्वराला प्रार्थना होती की आमचा संकल्प पुरा करण्याचे बळ तो आम्हास देवो.

कार्यक्रम आटोपल्यावर खेड्यातील काही मंडळींबरोबर त्याच्या गावातील कामाबद्दल विचार करण्यास बसलो होतो. त्या वेळीं कोटी बाबाजी म्हणाले की आज विजेसारखा संचार झाला आहे व आता अेका क्षणाचा हि विलंब होता कामा नये. त्यावेळा गाववाले त्याच्या म्हणण्याशीं अेकरूप होअून आपली संमति देत होते.

आता आम्ही जे सेवक या ठिकाणी हजर आहोत ते जर आपल्या जीवनाची अुत्तरोत्तर शुद्धि करू व त्या खेड्यातील मंडळींच्या सेवेंत तत्परतेनें लागून जाअू, तर त्याच्याकडून अुत्तम सहकार मिळेल, असा माझा विश्वास आहे. आज तर अेवढा च अेक विचार मांडून देतों. त्याची योजना मागाहून करता येअील.

—हिंदी वरून

---

## सर्वभूतीं भगवद्भाव

(आश्रम, सेवाग्राम ता. ८-२-'४८)

माझ्या प्रिय आत्मस्वरूप बंधूंनो आणि भगिनींनो !

मला आठवत नाहीं, पण या भूमीवर कदाचित् मी पहिल्यादा च बोलत आहे. अिथें मी फारसा आलों हि नाहीं. परंतु विचार सवयाच्या दृष्टिनें पाहिलं तर असे बोललें जाअील कीं मी अिथें च राहण्याचा निरंतर प्रयत्न केला आहे.

अीश्वरानें या जगात नेहमीं सत्पुरुषांची मालिका पाठविली ही त्याची अपार कृपा आहे. अेक गेला कीं त्याच्या पाठोपाठ दुसरा येतो. आणि जो येतो तो आधीं आलेल्याला मागें टाकून पुढें जातो. असा च अेक महापुरुष आला आणि गेला. आणि आम्हाला वारस बनवून गेला. पित्याच्या अिस्टेटीचे वारस तर त्याचीं मुलें काहीं न करता, केवळ जन्म घेण्याच्या हक्कानें च होअून जातात. परंतु आपल्याला मिळालेल्या अिस्टेटीचे आपण खरे वारस होण्यासाठीं आपल्याला महान् प्रयत्न करावा लागेल. सर्व संतांनीं आपल्याला तीन प्रकारच्या शिकवणी दिल्या. पहिली शिकवण ही कीं आपल्या शेजाऱ्यावर प्रेम करा. दुसरी ही कीं जे स्वतःला तुमचे शत्रु म्हणवीत असतील त्याच्यावर प्रेम करा. आणि तिसरी शिकवण ही कीं वैष्णवावर, सज्जनावर, भक्तावर प्रेम करा. आणि या तिन्ही शिकवणींसाठीं आपण आत्म्यावर प्रेम करण्यास शिकणें जरूर आहे. जो म्हणून भेटायला आला, दर्शन द्यायला आला, तो परमात्म-स्वरूप च आहे अशी भावना व्यवहारात सतत ठेवावी. या शेवटल्या वस्तुशिवाय संताच्या त्या तिन्ही शिकवणींचे पालन नीट होणार

नाहीं. दोष मनुष्यमात्रात असतात, गुण हि असतात. जर गुण-दोष पाहत राहिलों तर सर्वत्र परमात्म-दर्शन होणार नाहीं. या भूमीवर जे कोणी आम्ही शरीरानें राहण्याचे अधिकारी बनलों आहोंत त्या सर्वांनी हे लक्षात घ्यावें कीं आपल्या आसपास राहणारे, व आपण देखील परमात्म्याचे अंश आहोंत ही च भावना आपल्याला दृढ केली पाहिजे. या अेका मंत्राच्या आधारानें बाकीचे सर्व आदेश सहज च पाळले जातील. आपल्या अिथें अनेक संस्था आहेत त्यांच्यात अनेक प्रकारचे मतभेद हि होत. परंतु ते मिटविणारा व निश्चित निर्णय देणारा असा अेक होता तो तर गेला. आता कोण आहे ? गेला तो मर्यादित शक्तीचा होता व आता आहे तो अनंत शक्तीचा आहे अशी अनुभूति आपल्याला आली पाहिजे. त्याचा व आपला सरळ संबंध आहे जो भेटला तो भगवान् च आहे असे लक्षात आल्यावर मतभेदाचा व झगड्याचा प्रश्न च राहत नाहीं सर्व राग-द्वेष नाहींसे होतील.

ज्या क्षणीं चित्तात विकार आला तो क्षण व्यर्थ गेला आणि ज्या क्षणीं चित्तात विकार नसेल तो क्षण सार्थकी लागला बाहेरून तर आपल्याला अनेक कार्यें करावयाचीं आहेत. कारण शरीर त्यासाठीं च आहे. शरीराचें अस्तित्व ही च त्याची खूण आहे. म्हणून तें तर आपण करीत च राहू. परंतु आपला वेळ सार्थकी लागला की नाहीं याची कसोटी आपण बाह्य कर्मावर ठरविणार नाहीं, चित्त किती क्षण निर्विकार राहिलें त्यावर ठरवू सकाळ पासून संध्याकाळपर्यंत काय काय केलें त्याची रोजनिशी लिहावी असे बापूजी म्हणत असत. आपण जर अशी मानसिक डायरी ठेवली तर त्यात भगवद्-भावना किती वेळ राहिली या च गोष्टीची नोंद ठेवू असे स्मरण करीत भगवंताच्या कृपेनें ही दृष्टि

आपल्या टोळ्यात स्थिर झाली की आपण मिळविलें.

आश्रमची मंडळी म्हणतात की आतां माझ्याकडून त्यांना काम घ्यायचें आहे. तें तर होऊं च शकेल, त्यात कांही कठिण नाही. परतु मीं आतां सागितलें त्या विचारानें जसें काम होओील तसें अेकमेकाचा आधार घेऊन हि होणार नाहीं. शेवटीं मी ओश्वराजवळ प्रार्थना करतों की जो म्हणून स्त्री, पुरुष, मुल डोळ्याला दिसेल तो भगवान्-स्वरूप च पाहूं असा दृढ सकल्प या भूमीवर बसून आपण करूं या.

## आमचे चौकीदार

( आश्रम, सेवाग्राम ता. ९-२-'४८ )

गांधीजींच्या मागें आपला मार्ग-दर्शक चौकीदार आमचीं अेकादश व्रतें आहेत. गांधीजी असताना हि हे च आपले चौकीदार होते. काल जी वस्तु आपण पाहिली तिच्या योगानें हीं सगळीं व्रतें सहज पूर्ण होतात. सर्वत्र परमेश्वर पाहण्याचा जर प्रयत्न केला तर सत्य स्वयं-सिद्ध च होतें. मग लपविण्याजोगें कांहीं अुरत च नाही. तसें च हिंसा क्रोध वगैरे हि अशक्य होतील. सगळीकडे जर परमेश्वर च आहे तर आपण हिंसा कोणाची करणार ? कोणावर रागावणार ? आणि मग कसल्या हि विकाराला किंवा पाप-बुद्धीला अवकाश च राहत नाहीं. "जहं तहं देख धरें धनुबाना" असें तुलसीदासजींचे वचन आहे. म्हणजे सर्वत्र धनुर्धारी रामचद्र जागत आहे असें भक्त पाहतो. मग त्या धनुष्य-बाणापुढें चित्तात कांहा विकार च टिकू शकत नाहींत तेरी पण

या व्रतांच्या पालनासाठीं आपल्याला स्वतंत्र प्रयत्न केला पाहिजे. कारण आपण आपल्या विकाराना जर ओळखलें च नाहीं तर कसें होणार ? म्हणून बारकाईनें चित्त तपासलें पाहिजे. चित्तात विकार कितपत राहिले त्यावरून सर्वत्र प्रभु-भावना आपली झाली की नाहीं ते कळून येतें. या च साठीं आपण हे अकरा चौकीदार ठेवले आहेत. आणि व्रतांच्या नावानें ज्याअर्थी आश्रम चालतो त्याअर्थी जग हि ही च अपेक्षा राखील की आश्रमात अितर काहीं असो वा नसो पण या व्रताच्या पालनाचा पूर्ण प्रयत्न तर असला च पाहिजे. अिथें येणारे दर्शक पुष्कळसे श्रद्धेनें च येणार. ते बिचारे आमची काय परीक्षा करणार ? परंतु आमच्या व्रत-पालनाचा सूक्ष्म परिणाम येथील हवेंत पसरेल व दरेकाला त्याचा स्पर्श होओील असें असलें पाहिजे. म्हणून आपण जागृत राहिलें पाहिजे, व येथील, म्हणजे आपल्या चित्तातील, वातावरण परिपूर्ण शांत ठेवण्याचा प्रयत्न केला पाहिजे. येथें कोणत्या हि प्रकारें कठोर वचन बोललें जाअू नये. मिथ्या भाषण तर राहो च पण मिथ्या विचार हि असता कामा नये. दुसऱ्याची चूक दिसत च नाहीं अशी मनोवृत्ति असली पाहिजे. तो स्वतःची चूक आपल्याला सांगत असला तर ती आपल्याला नगण्य वाटली पाहिजे. आणि जगाच्या दृष्टीनें छोटीशी वाटणारी आपली चूक आपल्याला डोंगराअेवढी वाटली पाहिजे. आपल्या आसपास कुठें विवाद चालला असेल तर आपल्या अुपस्थितीनें स्नेहाचें काम व्हावें. यंत्रात घर्षण-स्थानें अनेक असतात, तिथें तेल दिल्यानें घर्षण कमी होतें. तसें आपल्या हातून व्हावें.

आपण ब्रह्मचर्य व्रत पाळूं. आपल्यात कोणी अविवाहित असतील, कोणी विवाहित असून वानप्रस्थ असतील. बाकीची दुनिया—आमच्या

आसपासची हि–गृहस्थाश्रमी असेल. अशा वेळी गृहस्थाश्रमी आमच्या दृष्टीने सीताराम आहेत व आम्ही हनुमान आहोत अशी आपली भावना असली पाहिजे. म्हणजे हनुमंताला सीतारामाविषयीं जसा आदर होता तसा जगातील स्त्री-पुरुषाविषयीं आपल्याला आदर असला पाहिजे आणि सीतारामासमोर हनुमान जसा नम्र-भावानें सेवेला हजर असलेला आपण देखाद्‌ू तसें आपण त्याच्या सेवेसाठीं नम्र-भावानें तयार असलें पाहिजे. ब्रह्म-चर्य-व्रत-धारी मनुष्य सर्वांच्या सेवेला नेहमी हजर असलेला सेवक होय. नेहमी नम्र व तत्पर. त्याच्याविषयीं जग भले आदर-भाव राखो, पण तो स्वतःला सीता-राम-चरणाची रज-रेणू च मानील: असें वातावरण राहिलें, काहीं ना काहीं शरीर-श्रम जन सेवा होत राहिली, तर मग दुसरे काहीं मोठें—जग त्याला मोठें म्हणते तें—काम होवो अगर न होवो, त्याची चिंता नाहीं. जाणते लोक आपल्याकडून ही च अपेक्षा राखतात. "हिंदुस्थानचा कारभार पाहू शकतील असे आश्रमात का नाहीत ?" असला प्रश्न विचारला जाणार नाहीं स्थित-प्रज्ञ-दर्शनात मीं लिहिलें आहे की प्रत्येकाला पुढारी बनणे शक्य नाहीं, परंतु प्रत्येक जण स्थितप्रज्ञ बनू शकतो कारण त्यासाठीं लागणारी वस्तु आत च पटलेली आहे. बाहेरच्या काहीं सामुग्रीची आवश्यकता नाहीं.

माझी श्रद्धा मीं प्रगट केली आहे त्यापासून आपण किती दूर आहोत हें तर पाहतों च आहोत परंतु रोज आपण स्थितप्रज्ञाचीं लक्षणे गातों तर त्या प्रमाणें वागण्याचा आपण प्रयत्न करायचा आहे, हे च थोडक्यात सार आहे.

---

# कर्म-योग-निष्ठा

## ( आश्रम, सेवाग्राम ता. १०-२-’४८ )

परवा व काल आपण ज्या विचाराची चर्चा केली त्याचा अमल करण्यासाठीं अेक आचार-दृष्टि हि आपण राखली पाहिजे. निरंतर काहीं ना काहीं कर्म करीत राहणे, अेक क्षण हि वाया न घालविणें ही ती दृष्टि होय. ही काही नवी वस्तु नाही. गीतेंत ही शिकवण आपल्याला आढळते. कर्मानें भगवानाची पूजा होते व ती केली पाहिजे असे गीता शिकविते. परंतु मधल्या काळात सन्यास, भक्ति, ध्यान अित्यादींच्या नावावर कर्म टाळण्याची वृत्ति हिंदुस्थानात शिरली. आपली वृत्ति त्याहून भिन्न आहे. आपण कर्मानें परमेश्वराची पूजा करू; वाणीनें व चिंतनानें हि करू. परतु दिवसाचा मुख्य भाग तर सेवा-कार्यात च घालवू. प्राचीन काळीं मठात किंवा विहारात लोक भिक्षा-वृत्तीनें राहत. भिक्षेसाठीं संचार हि करीत असतील. आपण हि भिक्षेवर राहतों. भिक्षेसाठीं संचार करीत नाहीं. समाज सहज जें काहीं देतो त्यावर संतुष्ट राहतों. कोणती हि वस्तु आपली असे मानीत नाही. परंतु भिक्षावृत्तीचा अर्थ आपण सेवा-कार्य सोडून देणे असा मात्र नव्हे; तर सेवा-कार्य करीत असता फळ सोडणे व वृत्ति अनासक्त राखण्याचा प्रयत्न करणे, हा त्याचा अर्थ आहे त्यानें शरीराला आरोग्य व चित्ताला प्रसन्नता लाभेल. सूर्यनारायण अेक क्षण हि विश्राति घेत नाहीं. जगाला सतत प्रकाश देत राहतो, परतु जगाच्या व्यापारापासून अलिप्त असतो हा आदर्श गीतेनें आपल्यासमोर ठेवला आहे तो च गाधीजींना जीवनात प्रत्यक्ष आचरून आपल्यासमोर ठेवला. थोर पुरुष गेल्यानतर त्याच्या शिष्याना हि

समाजात अेक प्रकारची प्रतिष्ठा मिळते असे बहुदा घडते. त्यात धोका आहे. त्यापासून सावध राहिलें पाहिजे. पळून जाणे हा सावध राहण्याचा मार्ग नाहीं. समाज आपला आदर करतो म्हणून आपण जागृत राहिले पाहिजे, आळस करता कामा नये. हिंदुस्थानात कर्म-रूप पूजा सिद्ध करायची अजून बाकी आहे. काहीं ना काहीं कारणामुळें लाखों लोक काम न करता खाताना आपण पाहतो. काम न करता खाण्याचा अधिकार च नाहीं अशी आपली निष्ठा आहे. समाजाकडून कमींत कमी घ्यायचे व समाजाला जास्तींत जास्त द्यायचें. कर्म हे पूजा-रूप आपण मानू तेव्हा च असे होओील. अुद्योगाचा शीण अुद्योगाने च दूर करायचा. म्हणजे अेक काम करून थकलों की दुसरे काम करावयाचे. अशा रीतीनें निरलस श्रम करीत असता रात्रीं निर्दोष नि स्वप्न निद्रा घ्यावी आपण जागृतींत अतंद्रित राहिलो तर आपली निद्रा हि नि स्वप्न होओील. हा आपला आदर्श आहे. अुद्योग ही च विश्रांति, अुद्योग हे च काम व अुद्योग ही च भक्ति, अशी कर्मनिष्ठा आपण राखू तर आपली चित्त-शुद्धि होओील; आणि आजपर्यंत न मिळालेली प्रेरणा पुढें आपल्याला मिळेल असे मी मानतों.

बापूचा मृत्यु ज्याप्रकारे झाला त्यात आपणावर भगवताची नि स्सीम दया आहे. सर्वप्रकारे आपली शुद्धि व्हावयाची आहे म्हणून अीश्वराने ही घटना घडवून आणली.

---

(१)

## प्रार्थना, कां कोणती आणि कशी

आशादेवींनीं सुचविलें आहे कीं मी आज प्रार्थनेसंबधीं कांहीं सांगितलें तर चांगलें होईल.

प्रार्थनेंत कोणती शक्ति आहे हे आपण समजून घेतलें पाहिजे. अिंग्रज येथें आल्यानंतर त्याच्याशीं आणि ख्रिस्ती धर्माशीं आपला संबंध आला आणि आपल्याला वाटू लागलें कीं आपण हि सामुदायिक प्रार्थना करावी. नमाजासारखी साप्ताहिक प्रार्थना आपणाला नवी नव्हती. आपल्या धर्मांत तर दैनिक वन्दन किंवा सध्या दिवसातून दोन वेळां होत असते. म्हणून आठवड्यातून अेक वेळच्या प्रार्थनेचें महत्त्व आमच्या ध्यानात आलें नाहीं परंतु खिस्ती धर्माचे अनुकरण होअू लागल्यावर 'ब्रह्म समाज' निघाला. ब्राह्मानीं साप्ताहिक प्रार्थना सुरू केली. परंतु आपण आठवड्यातून अेक च वेळ खात नसून रोज खातो त्या प्रमाणें जीवनात देखील दैनिक नियमितता असली पाहिजे. सूर्य रोज अुगवतो रोज मावळतो. म्हणून आपण हि रोज नवीन नवीन विचार-चिंतन केलें पाहिजे.

### प्रार्थनेची खुबी

मी नेहमीं प्रार्थनेला स्नान, जेवण आणि झोंप यांची अुपमा देतों. तिन्हींमध्ये जी खुबी आहे ती प्रार्थनेंत आहे. झोपेने माणसाला अुत्साह आणि विश्रांति मिळते. प्रार्थनेने मनाला आध्यात्मिक अुत्साह आणि विश्रांति मिळते भोजनाने शरीराचें पोषण होते, प्रार्थनेनें मनाचें पोषण होते. स्नानानें शरीराची शुद्धि होते प्रार्थनेने मनाची शुद्धि

होते. वरील तिन्हीमुळें शरीराचें जे काम होते ते च प्रार्थनेनें मनाचें होते. मानसिक पोषण, विश्रांति, शान्ति आणि निर्मलता आठवड्यातून केवळ अेक वेळ च नव्हे तर रोज झाली पाहिजे. शरीराची झीज होते त्याप्रमाणें मनाची हि झीज होते. साप्ताहिक प्रार्थनेपेक्षा रोजची प्रार्थना चांगली आहे रविवारचें महत्त्व मला मान्य आहे परंतु रोज प्रार्थना व्हावी असे माझें म्हणणे आहे. शांति, शुद्धि आणि पुष्टि आपल्याला मिळाली पाहिजे आणि प्रार्थनेनें या तिन्हीची अपेक्षा आहे.

**प्रार्थना कां ?**

प्रार्थनेचा अर्थ काय ? प्रार्थना सामुदायिक असते आणि व्यक्तिगत हि व्यक्तिगत प्रार्थनेमधें मनुष्य शुद्ध संकल्प करतो आत्म्यामधें संकल्प-शक्ति आहे च. संकल्पाचें अधिष्ठान अशी च आत्म्याची व्याख्या आहे. ज्यातून स्फूर्ति मिळते तो च आत्मा. आपण अनेक कामें करतों तत्परिणामीं संकल्पाअैवजीं विकल्प च निर्माण होतात शुभ-संकल्प निर्माण होत नाहीं, म्हणून आत्म्याची संकल्प-शक्ति प्रकट होत नाहीं. कित्येक वेळा संगतीमुळें, घरामुळें, शिक्षणामुळें, आत्म्याची शुद्ध शक्ति प्रकट होत नाहीं ती प्रकट व्हावी म्हणून आपण अेकत्र जमून सामुदायिक प्रार्थना करतो

**प्रार्थना आणि अीश्वर यांचा संबंध**

कोणी विचारील कीं अीश्वराचा याच्याशीं काय संबंध ? अुत्तर असे कीं आपण प्रार्थनेमधें अीश्वराच्या च आशीर्वादाची याचना करतों. आम्ही शरीरामधें आहोंत परंतु शरीराला ओळखणारे, शरीराकडून काम घेणारे 'आम्ही' शरीराहून भिन्न आहोत शरीर दुर्बल झालें तरी आम्ही दुर्बल होत नाहीं त्या च प्रमाणें बलवान हि होत नाहीं

अशा रीतीने शरीराहून आम्ही वेगळे आहोत हे स्पष्ट होते, कधीं कधीं आपण म्हणतों कीं अलीकडे स्मरण-शक्ति ठीक काम देत नाही. काय करावें ? असें विचारणारा आणि चिंतन करणारा शरीराहून अलग आहे. बुद्धीची गोष्ट हि अशी च आहे. बुद्धि कधीं कधीं क्षीण होते, काम करीत नाहीं. याचा हि अर्थ असा कीं आम्ही बुद्धीहून हि वेगळे आहोत. अशा रीतीनें विचार केल्यास अनुभवाला येईल की 'आम्ही' शरीर, मन आणि बुद्धि याहून वेगळें आहोंत पिंडाहून ब्रह्म वेगळें आहे. ब्रह्माला आणि पिंडाला स्वतंत्र रीतीनें सांभाळणारा कुणीतरी आहे. ती शक्ति म्हणजे च ईश्वर. शरीर प्रतिबिंब आहे, ब्रह्म बिंब आहे. येथे डोळा आहे तर तेथें सूर्य आहे. येथे रक्त आहे तर तेथे पाणी आहे. येथे हाडे आहेत तर तेथे लोखंड आहे. अशा रीतीनें सृष्टींत देखील कोणी आहे तो ईश्वर आहे. प्राण-शक्तीला बाहेरची स्वच्छ मोकळी हवा मिळाल्यानें ती मजबूत होते. डोळ्याची शक्ति क्षीण झाली तर सूर्यकिरणाच्या शक्तीने आपण ती मजबूत करतों. अशा रीतीनें ब्रह्मांडात भरलेल्या शक्तीने आपण पिंडाची पूर्ति करीत असतों. या भौतिक अनुभवाप्रमाणे नैतिक अनुभवाची गोष्ट आहे. बाहेरून परमात्म्याच्या शक्तीची मदत घेऊन आपण आत्मशक्ति बलवान करतो. आणि परमात्म्याची मदत घेण्यासाठीं च आपण प्रार्थना करतों. आपली सर्व दुर्बलता त्या ठिकाणीं प्रकट करतों आणि तेथून बळ मिळवितों. या साठीं च प्रार्थना असते

**संतांची वाणी**

या कामीं आपण संतांच्या वाणीचा का उपयोग करतों ? आपल्या मार्फत आपण आपली भावना प्रकट करू शकतो परंतु आपल्याजवळ

भाषा नाहीं म्हणून आपण संताची वाणी घेतों. आपली वाणी दुर्बळ असल्यामुळें संताच्या वाणींतील शब्द आपण निवडतों.

**व्यापक प्रार्थना**

हिंदुस्थान व्यापक देश आहे. व्यापक देशात काम हि व्यापक च करावे लागते. हिंदुस्थानचा प्रश्न जर आपण सोडविला तर जगाचा प्रश्न आपण सोडवू शकतो. हिंदुस्थानात जितकी विविधता आहे तितकी जगात हि आहे. प्रांतभेद, भाषाभेद, जातिभेद जगात हि आहेत. म्हणून हे प्रश्न हिंदुस्थानात सोडविले तर जगात हि आपण सोडवू शकू. म्हणून आपली प्रार्थना व्यापक असली पाहिजे. कोणाला ती कठोर वाटेल अशी ती असता कामा नये. सर्वांना जी अनुकूल असेल अशी प्रार्थना आपण निवडली पाहिजे. या च बरोबर आपण जी प्रार्थना करतों तशी च अितरांनी केली पाहिजे असा हि आग्रह राखता कामा नये आपल्याला जें प्रेरण आवडते ते दुसऱ्याला आवडेल च असें नाहीं. ही च स्थिति प्रार्थनेची आहे. म्हणून मी या बाबतीत आग्रह राखत नाहीं. परंतु जे लोक सर्वोदयात आहेत त्याना मी जरूर अशी सूचना करीन कीं आम्ही करीत असलेली प्रार्थना त्याना हि अनुकूल वाटण्यासारखी आहे. सध्याकाळच्या प्रार्थनेत स्थितप्रज्ञाचे लक्षण आणि सकाळच्या प्रार्थनेंत ओशावास्योपनिषद् या दोन्ही गोष्टी मुख्य आहेत.

**स्थितप्रज्ञाचीं लक्षणे**

स्थितप्रज्ञ लक्षणामध्यें ही खुबी आहे कीं तीं साधकासाठीं आहेत. स्थितप्रज्ञाचा आदर्श त्यात आहे आणि तो प्राप्त कसा करावा याचा मार्ग हि सांगितला आहे. आजचे जग विज्ञानाचें आहे. बुद्धीच्या कसोटीवर या युगात विचार फसला जातो. स्थितप्रज्ञ स्थिर बुद्धीवर

अुभा आहे. या लक्षणात तथा बुद्धीचे च मुख्यता वर्णन आहे. स्थिरबुद्धीची आवश्यकता आज फार आहे. ती बुद्धि स्थितप्रज्ञात असते. ज्ञानी माणसाचें हे सर्वश्रेष्ठ लक्षण त्यात आपल्यासमोर टेवलें आहे.

व्यवस्था चांगली राखण्यासाठी निर्णय शक्तीचा फार गरज असते. आपण लवकर निर्णय करू शकत नाहीं परंतु निर्णयाशिवाय आपली जीवन नौका धोक्यात राहते. जगासमोर जे सामाजिक प्रश्न अुभे आहेत त्या मानानें व्यक्तिगत प्रश्न गौण आहेत तथापि दो ही ठिकाणा निर्णय शक्तीची आवश्यकता आहे सामुदायिक कार्यात निर्णय चुकीचा होता कामा नये. स्थिरबुद्धि ज्याची आहे अशा च माणसाच्या हातात नेतृत्व दिलें पाहिजे. अमेरिकेचे अध्यक्ष अेक लष्करी गृहस्थ आहेत. त्याच्या निर्णयात चूक झाली तर साऱ्या देशाला भय निर्माण होअील. निर्णय सर्व समाजासाठी करावयाचा असतो. विज्ञानाच्या युगात सामुदायिक निर्णयाला प्राधान्य आहे. व्यक्तीच्या निर्णयाला गौणत्व आहे. निर्णय शक्ति वाढली पाहिजे तर च देश पुढें जाअील. स्थित-प्रज्ञ-दर्शन तसे पाहिल्यास सर्व च युगासाठीं अुपयोगाचें आहे पण आजच्या युगात च ते विशेष च अुपयोगाचे आहे

**निर्णय कोण करूं शकतो**

हल्लीं सर्व कारभार अस्थिर आहे. लोक नफा-नुकसान तोलतात. साडेनअू नुकसान आणि अर्धा नफा असें तराजूत टाकून मोजतात. काहीं लोकांच्या तराजूत अेक पारडें कधीं हलके तर कधीं दुसरे पारडें हलकें असें असतें. असे अनेक प्रसंग सामुदायिक निर्णयाचे वेळीं येतात. कधीं कधीं प्रश्न गुंतागुंतीचे असतात. अशावेळीं बुद्धि जर अनिश्चित राहिली तर निर्णयाच्या बाबतींत धोका अुत्पन्न होतो. 'मेजॉरिटी'

( बहुमत ) ने निर्णय करण्यात काय खरें काय खोटें याचा निर्णय होअू शकत नाहीं. तरी पण निर्णय करायचा च असेल तर चिठ्या टाकून निर्णय करा. या साठीं च आजच्या काळात निर्णय-शक्तीची अत्यंत आवश्यकता आहे. ज्याचे मन, अिन्द्रिय, बुद्धि कह्यात आहेत तो च निर्णय घेअू शकतो परंतु कधीं कधीं सकाळीं अेक स्थिति असते तर दुपारीं दुसरी च असते. पहाटे बुद्धि ताजी असते चित्त प्रसन्न राहते त्या वेळेस सत्वगुण असतो. त्यानंतर भूक लागली तर झाला रजोगुण आणि मग थोडे खाणे पिणे झालें झोप येअू लागली तर तमोगुण येतो. अशा रीतीने अेका च माणसात हे तिन्ही गुण अुत्पन्न होतात. जो मनुष्य अिन्द्रियांच्या ताब्यात आहे तो निर्णय घेअू शकत नाही. म्हणून स्थितप्रज्ञाच्या लक्षणात अिन्द्रियांवर ताबा कसा मिळवावा हे सांगितले आहे.

**मनाची भूमिका**

आजपर्यंत आपल्या समाजात मनाच्या भूमिकेवरून कामे झाली. परंतु सामाजिक प्रश्नांमध्ये मनोविज्ञानाच्या भूमिकेवरून निर्णय होअू शकत नाहीं. माझ्या मतें मन गौण आहे आजच्या विज्ञानाच्या युगात मनाला बाजूस सारून निर्णय दिला पाहिजे याला काय वाटेल त्याला काय वाटेल, याचा अपमान होअील त्याला वाअीट वाटेल हे सर्व मनाचे खेळ आहेत. राजनीतीमध्ये मानापमानाचा प्रकार फार असतो. कोणाला निवडणुकींत अुभें करावे ? अेकाला अुभे करावें तर दुसरा नाराज होतो, अशा सगळ्या गोष्टी मनामुळे निर्माण होतात. कारण मन केवळ मानापमान च जाणते. ही स्थिति मोठमोठ्या पुढाऱ्यांची हि आहे. म्हणून मनाच्या भूमिकेपेक्षा अुच जाअून निर्णय दिला पाहिजे.

अरविंदबाबूंनी म्हटले आहे की मनाच्या पलीकडील अवस्थेत जाऊन निर्णय दिला पाहिजे. याला ते "सुपरमेन्टल" स्थिति म्हणतात. परन्तु हे पूर्ण तत्त्वज्ञान झालें. सामान्य मनुष्याला ते जुळणारे नाहीं. आमच्या सर्व निर्णयात मन च प्रधान असते म्हणून मनाला बाजूला टेवून निर्णय देता आला पाहिजे मला याचा अनुभव आहे मला निर्णय करताना कधीं च अडचण पडत नाहीं. अेकदा निर्णय केल्यावर सारे जग माझ्या विरुद्ध गेलें तरी मला काहीं वाटत नाहीं याचे कारण अिंद्रिय निग्रह. मनावर अंकुश टेवून निर्णय देणें मला जमते. मनाच्या भूमिकेवर राहण्यामध्यें निर्णयाचा असा निश्चितपणा असू शकत नाहीं. मनाला फेकून देता आलें पाहिजे असा निर्णयानंतर तुम्ही त्यावर अितके पक्के राहल की पन्नास लोकांनी पन्नास गोष्टी सांगितल्या तरी तुम्ही निर्णय बदलणार नाहीं. म्हणून स्थितप्रज्ञाच्या लक्षणाचे श्लोक प्रार्थनेत टेवावे असी माझी सूचना आहे, पण माझा आग्रह नाहीं.

### जीवन-निष्ठा

सकाळच्या प्रार्थनेमध्यें जीवन-निष्ठा सांगितली आहे निर्णयाचा शक्ति कशी हातात येते याचे चित्र तीत आहे. ज्ञानाचा महिमा अुपनिषद् गाते परंतु त्या प्रार्थनेत अज्ञानाचा हि महिमा गाअिलेला आहे अेक अद्‌भुत दर्शन आहे हे ! चोवीस तास ज्ञानचर्चा चालली तर धक्का येअील म्हणून आठ तास अज्ञानाची म्हणजे निद्रेची आवश्यकता आहे म्हणून जगामध्यें ज्ञानाबरोबर अज्ञान हि असलें पाहिजे. कॉलेजात जें शिक्षण दिलें जातें ते श्रीमंताच्या जेवणासारखें असतें. त्याच्या जेवणात चटण्या-कोशिंबिरींचे च पाच पन्नास प्रकार

असतात आणि भरीव जेवण नाममात्र असतें. त्या प्रमाणें कॉलेजांतून किरकोळ किरकोळ अनेक विषयांचा मारा बिचाऱ्या विद्यार्थ्यांवर होतो. गरिबाच्या जेवणाप्रमाणे डाळ, भात, रोटी सारखें भरीव जेवण तेथें नसते. संपादकाची अशी च स्थिति असते. जगांत घडणाऱ्या सर्व घटनांवर संपादकीय लिहिण्याची त्याच्यावर जबाबदारी असते म्हणून तऱ्हतऱ्हेचे ज्ञान मनुष्य मिळवीत बसतो आणि अगदीं निर्वीर्य होऊन जातो. असल्या भारभूत ज्ञानाची कांहीं जरूर नसते. त्यानें विकास हि होत नाहीं.

आत्म-ज्ञानाअितकी दुसऱ्या कोणत्या च ज्ञानाची आवश्यकता नसते. *विकास आणि निरोध दोहोंची गरज आहे पण त्या दोन्ही गोष्टींपेक्षा आत्म-ज्ञानाची गरज अधिक आहे.* आवश्यक तेवढें च ज्ञान प्राप्त केलें पाहिजे; निष्कारण ओझें बाळगूं नये. मोजक्या शब्दांत अेक परिपूर्ण वस्तु याहून दुसऱ्या ठिकाणीं मला सापडली नाहीं. म्हणून अीशावास्योपनिषद् म्हणावें अशी मीं सूचना केली आहे. या शिवाय कांहीं जोडायचें असल्यास जोडा. चांगलीं भजनें वेगवेगळ्या धर्मग्रंथांतून निवडूं शकता परंतु अीशावास्योपनिद् प्रार्थनेंत ठेवलें तर आपण सर्व अेकरस होअूं.

**प्रार्थना कशी करावी ?**

गांधीजींनीं प्रार्थना चालू केली. तिनें त्यांना स्फूर्ति मिळत होती. आम्ही मात्र प्रार्थनेचा अेक ठरीव क्रम ( रूटीन ) करून टाकला आहे. वास्तविक प्रार्थनेच्या आधीं आपण तयारी केली पाहिजे. मौन ठेवून शांत बसलें पाहिजे. जे श्लोक म्हटले जातील त्यांचें च चिंतन केलें पाहिजे.

परंतु होतें अुलट. रोज रोज ते च श्लोक म्हटल्याने आमच्या वाणींतून फक्त शब्द बाहेर पडतात परंतु त्याकडे आमचे लक्ष नसतें, असें होता कामा नये. श्लोकांबरोबर काहीं भजने हि म्हणावीं. नवी नवी भजनें म्हणावीं.

भक्तिमार्गांत काय झाले ? मनुष्य दुर्बल आणि पापी आहे असें मानून त्याने निदान भक्ति तरी केली पाहिजे अशी कल्पना रूढ झाली. आमचे पुण्य, ज्ञान अित्यादि सर्व गेलें तरी चालेल परंतु आम्ही भक्त बनून राहिलों तर च आमचा बचाव आहे. लढाअींत छदक करतात; सैन्य पुढें जावो किंवा न जावो निदान मागें तरी न हटो या साठीं ते असतात. भक्तीचे स्थान त्या छंदकासारखें आहे. यापेक्षा तरी आपण मागें जाता कामा नये. परंतु भक्तीबरोबर अितर ज्या गोष्टी व्हायला पाहिजे होत्या त्या न झाल्यामुळे तिच्यात निष्क्रियता आली. भक्तीचे रूपांतर जनसेवेत व्हायला हवें होते ते झालें नाहीं म्हणून जडता आली.

कधीं कधीं तर भजनाचा हि कैफ चढल्यासारखा होतो. रात्रभर लोक भजन करीत राहतात हे अेक प्रकारचें व्यसन च आहे. मग हे लोक दिवसा झोंपतात. दिवसा काम न करता झोंपू शकणारे हे जणूं "श्रीमंत भक्त" आहेत. हे बरोबर नाहीं.

प्रार्थनेचे मनन करून ती पचविली पाहिजे. आपण दिवसभर भात बसत नाहीं. पंधरातीस मिनिटें जेवतों आणि पांच सहा तास ते पचवितों. तसें प्रार्थनेचें झाले पाहिजे. समत्वयुक्त कर्मयोगाच्या रूपानें प्रार्थनेचा प्रकाश पसरला पाहिजे.

---

## (२)

# प्रार्थना : तीन प्रश्न

### तीन प्रश्न

(१) काल तुम्ही म्हणालात कीं आपले जे निर्णय होतील ते मनोभूमिके पलीकडचे असावेत हे अधिक स्पष्ट करून सांगा.

(२) आपल्या सकाळच्या व सन्ध्याकाळच्या प्रार्थनेत अीशावास्य व स्थितप्रज्ञाची लक्षणें म्हटली जातात, त्या बाबत अधिक खुलासा करा

(३) "क्वेकर्स" पंथात सामुदायिक मौन प्रार्थना प्रचलित आहे त्या विषयी तुमचे काय विचार आहेत ?

### १ मनाची भूमिका

*मनाची घटण सृष्टीनें बनते हा मार्क्सचा विचार तुम्ही* मडळींनीं अैकलाच असेल मन सृष्टीचें प्रतिबिंब आहे–*छाया आहे.* पण सृष्टि मात्र मनाची *छाया नाहीं. अखिल सृष्टि* मनापासून बनली आहे असें मानणारा युरोपीय-तत्त्वज्ञानात अेक पंथ होता त्याच्या विरोधात मार्क्सनें म्हटलें कीं सृष्टि किती विशाल आहे आणि आपलें मन किती लहान आहे म्हणून मनामधून सृष्टि बनली आहे हे म्हणणें चूक आहे. सृष्टीपासून च मन बनलें आहे. याला वैज्ञानिक भौतिक वाद म्हणतात. यात सृष्टि प्रधान मानलेली आहे, मन गौण मानलें आहे.

**आत्मा प्रधान**

आम्ही, मनापलीकडे जो आत्मा आहे तो प्रधान मानला आहे आणि मन गौण मानलें आहे. मनाची दशा नेहमीं अेकसारखी राहत

नाहीं. कधी सुख वाटते कधीं दुःख वाटते. सकाळीं अेक स्थिति असते दुपारी दुसरी असते तर रात्री तिसरी असते. अशा रीतीनें त्याचा स्वभाव अेका च दिवसात अनेक वेळा बदलतो त्याच्या आधारें कांहीं निर्णय करणे चूक आहे म्हणून निर्णय आत्मशक्तीनें च केला पाहिजे, याला आत्मवाद म्हणतात

**दोन भिन्न मतें**

वैज्ञानिक म्हणतात कीं मनातीत जें (ऑब्जेक्टिव दृश्य) आहे ते पहा. समजा कीं तुमची बहिण मेली त्याने तुम्हाला दुःख झालें. परतु अेकूण सृष्टींत तुमच्या बहिणीच्या मृत्यूनें काय नुकसान झालें? ती जे काम करीत होती ते कदाचित सृष्टीला मिळणार नाहीं परतु तुम्हाला वाटते तेवढें नुकसान काहीं झालें नाहीं. अशा प्रकारें हे लोक सृष्टि प्रधान मानून मन गौण मानतात. आम्ही देखील मन गौण मानतो परतु सृष्टि अैवजी आत्म्याला प्रधान मानतो. भौतिक तत्त्ववेत्ते आणि अध्यात्मनिष्ठ तत्ववेत्ते दोघे हि मनाला गौण मानतात. अध्यात्मनिष्ठ म्हणतात कीं अन्तःस्थिति पाहून शुद्ध काय आहे हें ओळखून निर्णय करावा. भौतिक तत्त्ववेत्ते म्हणतात सृष्टीशीं सबध राखून निर्णय करावा.

परतु मनाच्या भूमिकेवर राहून वागलें तर आत्म्याचें हि ठीक दर्शन होणार नाहीं आणि सृष्टीचे हि होणार नाहीं. म्हणून सृष्टि तरी आधारभूत माना किंवा आत्मा तरी आधारभूत माना तर च योग्य दर्शन होईल. म्हणून ज्याना आत्मा किंवा सृष्टि याचे दर्शन आहे आणि ज्यानी मनावर ताबा मिळविला आहे त्याची च निर्णय यक्ति प्रमाण मानली पाहिजे. काय खावें हे जीभ सागेल पण किती खावें

याचा निर्णय आम्ही देऊ जीभ हे केवळ निर्णय करण्याच्या कामी अेक साधन आहे. त्याप्रमाणे मन हें अेक साधन समजून आम्ही मनाचा अुपयोग करू परंतु निर्णय मात्र आत्मनिष्ठ किंवा सृष्टिनिष्ठ होअून करू

**मनाची आवश्यकता नाही**

प्राचीन काळीं मोठमोठ्या राजांपुढे जेव्हा गुंतागुंतीचे प्रश्न निर्माण होत तेव्हा त्याचा अुकल केवळ मंत्रिमंडळाच्या सल्ल्यानें ते करीत नसत कारण मंत्र्यांची स्थिति राजासारखी च असे म्हणून राजे लोक ऋषींजवळ जात कारण ऋषि तटस्थ असत आणि अंतरात्म्याचें त्यांना दर्शन असे. अशा रीतीनें आध्यात्मिक आणि व्यावहारिक बाबतींत निर्णय करताना आत्मनिष्ठ पुरुषाला विचारलें जाअील. थर्मामिटरला स्वत ला ताप नसतो म्हणून लोकांचा ताप ते ठीक-ठीक दाखवितें त्या प्रमाणे ज्याला मनापासून अलग होता येते तो च मनाची परीक्षा करू शकतो भगवान व्यासांनी जगात व्यवहार केला नाहीं परंतु महाभारतात व्यवहाराबाबत अितक्या बारीक सूचना आहेत कीं प्रत्यक्ष व्यवहार करणारा हि त्या लिहू शकला नसता याचें कारण हे कीं जें व्यवहारात नसतात त्यांना त्यांत दुरून चांगले दर्शन होअू शकते म्हणून निर्णयासाठीं मनाची आवश्यकता असते असे नाहीं

**बहुमतानें निर्णय**

संयुक्त-राष्ट्र सभामध्यें जे निर्णय होतात ते सेथील नसलेल्या लोकांच्या मनानें आणि ज्या राष्ट्राचे ते प्रतिनिधि अहेत त्यांच्या मनानें होतात म्हणजे अेकूण सर्व मनाचा च झगडा चालतो मग यातीनें प्रश्न कसे सुटणार? त्यातून या लोकांनीं हे काढलें कीं बहुमतानें निर्णय

करावा. पण बहुमतानें निर्णय हा काय निर्णय झाला ? पुष्कळसे आंधळे अेकत्र झाले आणि त्यात अेक च डोळस असला तर बहुमताच्या न्यायाने त्या आंधळ्यांचा निर्णय मान्य समजणे बरोबर होअील काय ?

**आंधळ्यांची गोष्ट**

मला अेक गोष्ट आठवते. अेका आअीला चार आंधळीं मुलें होतीं. तिला अेक पाचवा मुलगा झाला तो डोळस होता. तो म्हणू लागला मला हे दिसते ते दिसते. आअीला वाटलें कीं याच्यात निश्चित काहीं तरी दोष आहे म्हणून ती त्याला डॉक्टरकडे घेअून गेली आणि म्हणाली कीं या मुलाचे काहीं तरी बिघडलें आहे कारण तो म्हणतो मला काहीं तरी दिसते याला बरा करून द्या. डॉक्टरनें ऑपरेशन करून त्याला आंधळे केलें तेव्हा आअीला आणि त्याच्या भावाना वाटलें कीं आता हा बरा झाला. असें कशामुळे झालें ? बहुमत आंधळ्याचे होतें म्हणून. आंधळ्याना वाटलें आम्हाला दिसत नाहीं ते याला दिसते त्या अर्थी याचे च काहीं तरी बिघडलें आहे. म्हणून ही बहुमताची बाब नुसती यांत्रिक आहे. त्यात बुद्धि नाहीं

**मनाला वेगळें कसें करणार**

आता प्रश्न असा कीं आत्म्याहून मनाला वेगळें कसें करावे ? मनाचा निर्णय सृष्टीच्या आणि आत्म्याच्या हि विरुद्ध जातो. आपल्याहून मनाला अलग करण्याची साधना कठिण आहे खरी परंतु ती कशी साधना येते याचा विचार केला पाहिजे. मी अेक अुदाहरण देतों :— समजा माझें घड्याळ रोज पाच मिनिटे मागें जातें असें मला कळलें. मी झोपताना तें पाच मिनिटें मागें करून झोपेन. अशा रीतीनें मनाची सवय ओळखून त्यापासून दुर्भावना प्रकट होण्याची मर्यादा आपण येअू

दिली नाहीं तर आपण दुर्बल होणार नाहीं. माझा अेक हात कमजोर आहे हे मीं ओळखलें तर त्या हाताला मी अधिक ताण पडू देणार नाहीं, दुसऱ्या हातानें काम करून घेअीन. तसे मनातील दुर्बलता ओळखून ती टाळून मनाकडून काम घेता आलें पाहिजे.

जर माझ्या मनात आसक्ति विशेष आहे असे मला आढळून आलें तर त्या आसक्तीला मी संधि च मिळू देणार नाहीं. असें जर मी करणार नाहीं तर मी संकटात सापडेन म्हणून ज्यानें आपल्या मनाची दुर्बलता ओळखली तो स्वतः दुर्बल होणार नाहीं माझी स्वतःची बुद्धि कमी चालते असें मीं ओळखलें तर दुसऱ्याच्या तीक्ष्ण बुद्धीचा मी अुपयोग करून घेअीन अशा रीतीनें आपलें मन, बुद्धि आणि अिन्द्रिये यांची दुर्बलता ज्यानीं ओळखली तो स्वतः दुर्बल राहणार नाहीं माझा डोळा चिपटला याचा अर्थ मी बिघडलो असा नव्हे चिपटलेल्या डोळ्या-कडून काम कसे घ्यावे हें मी जाणतो. अशा रीतीनें आपल्या दुर्बलते संकट मनुष्य स्वतः बलवान बनू शकतो. शरीराहून स्वतःला वेगळे ओळखण्याची कला न साधल्या मुळें मान-अपमान वगैरे खेळ चालतो अेकीकडे आत्मज्ञान आहे दुसरीकडे विज्ञान आहे दोहोंच्यामधे मन अुगीच लुडबुड करते त्याला ताब्यात ठेवावें.

### ४ सकाळ सध्याकाळची प्रार्थना

आता मी तुमचा दुसरा प्रश्न घेतों स्थितप्रज्ञ आणि अीशा-वास्योपनिषद् हे शब्द देखील अुच्चारण्यास कठिण अहेत मग सामान्य मनुष्याला त्याचा काय अुपयोग असे म्हटलें जाअील, परंतु ते चूक आहे शब्द कठिण असला तरी विचार कठिण नाहीं, शब्द देखील सोपा बनविता येअील त्यात जी वस्तु सांगितली आहे ती लहान मुलाला

देखील समजेल. रागद्वेषरहित मनुष्य निर्णय बरोबर देऊं शकतो ही ती वस्तु. यासाठीं अेखादें यंत्र जर आपल्याला सांपडलें, निर्णय देणारें यंत्र, तर आपण तें सर्वश्रेष्ठ समजूं.

### निर्णयाचें महत्त्व

स्थितप्रज्ञाच्या लक्षणात निर्णयाला महत्त्व आहे. भक्तांच्या लक्षणात प्रेमाचें महत्त्व आहे. त्यांत मैत्री करुणा आदि भक्त-लक्षणें सांगितलीं आहेत. सतत काम करणें हें कर्मयोग्याचें लक्षण. त्याला आळस माहीत च नाहीं, या गुणाचें महत्त्व जरूर आहे. प्रेम आणि कर्म यांचें महत्त्व मी ओळखतों तरी पण मुख्य गोष्ट निर्णयाची आहे प्रेम सरळ रस्त्यावर आहे कीं आडमार्गावर आहे, ह्याचा निर्णय कोण करील ? स्वत: प्रेम तर याचा निर्णय देऊं शकत नाहीं. ते तर आंधळें असतें. ते चुकीचें मत हि देऊं शकतें. प्रेमानें द्वेष हि निर्माण होअूं शकतो. अेखाद्यानें मुलाचा अपमान केला तर आई रागावते. तिच्या मनात त्या माणसाबद्दल द्वेष निर्माण होतो; आणि ती तो अपमान कधीं विसरूं शकत नाहीं. म्हणून जर प्रेम योग्य मार्गावर नसेल तर त्यानें द्वेष पण निर्माण होअूं शकतो. प्रेमाचा महिमा अपार आहे. परंतु योग्य मार्गावर त्याला कोण आणील ? त्या च प्रमाणें कर्माचा महिमा अपार आहे परंतु त्याला सुद्धा योग्य मार्गावर कोण आणील ? म्हणून च ज्याच्यामुळें व्यक्ति आणि समाज योग्य मार्गावर चालू शकतील असा शेवटचा गुण प्रज्ञा, निर्णयशक्ति हा आहे ही गोष्ट अेखादा लहान मुलगा हि समजूं शकतो. हिन्दुस्थानचे लोक व्यक्तीला लगे च ओळखतात. आम्ही भूदानच्या कामासाठीं कुठें गेलो आणि आम्ही रागावलों तर लोक लगे च समजतात कीं अरे, हा तर

आमच्या सारखा च सामान्य माणूस आहे. हिन्दुस्थानचा शेतकरी देखील सत्पुरुषाची बरोबर पारख करू शकतो.

**अीशावास्यामधील सोपी वस्तु**

अीशावास्यामधें जें सांगितलें आहे तें हि समजायला सोपें आहे. —— सतत काम केलें पाहिजे, नाहीं तर आपण दुसऱ्यावर भाररूप होतों. दुसऱ्याच्या धनाची वासना ठेवनी न पाहिजे, कधीं कधीं आपल्या अिन्द्रियाना विकासासाठीं मोकळे सोडलें पाहिजे, कधीं कधीं निरोधासाठीं बंद ठेवलें पाहिजे. काही गोष्टी जाणल्या पाहिजेत, काहींच्या बाबतीत अज्ञान राहिले पाहिजे ——या ज्या गोष्टी अीशावास्यात सांगितल्या आहेत त्या जाणणें सामान्य माणसाला हि कठिण नाहीं.

**३ मौनाचें महात्म्य**

आता मी तिसरा प्रश्न घेतो.—मौनाचें महात्म्य अपार आहे; अितकें कीं त्याच्या साठीं संस्कृतात जो शब्द आहे त्यात हि अेक विशेषता आहे. अनेक भाषातून त्या त्या भाषाचे काहीं खासखास शब्द असतात, त्याचा अनुवाद दुसऱ्या भाषातून करणे कठिण होते. कारण त्या शब्दाच्या पाठीमागें अेक साधना असते. त्या च कोटींतला संस्कृतातील 'मौन' शब्द आहे मौन म्हणजे 'मुनी' ची वृत्ति. जिभेने न बोलणें म्हणजे च केवळ मौन नव्हे. जिभेने न बोललें तरी मनात विचार येत च राहतात. त्याच्या साठीं अिंग्रजींत सायलेन्स शब्द आहे. त्याचा भावार्थ वाणीने न बोलणें येवढा च निघतो. परंतु मौनात आणखी अेक गोष्ट येते. ती म्हणजे मनात शांति असली पाहिजे. म्हणून तो फार च मोठा शक्तिशाली शब्द आहे.

'क्वेकर्स' लोक प्रार्थनेंत मौनाचा अुपयोग करतात ही फार चांगली गोष्ट आहे. श्री अरविंद बाबूंच्या आश्रमात हि साधक पाच-दहा मिनिटें मौनपूर्वक ध्यान करतात असें मी अैकलें आहे. सर्व लोक ज्याप्रमाणें जेवणासाठीं अेकत्र बसनें म्हणजे खाण्यातील रुची, स्वाद वाढतो त्या च प्रमाणें प्रार्थनेत आपण अेकत्र बसलो तर भक्तीची गोडी वाढते आणि मौनपूर्वक अेकत्र बसलों तर त्याचा चित्तावर व्याख्याना-पेक्षां हि अधिक परिणाम होतो. संगीताचा मनावर फार चांगला परिणाम होतो हे मी जाणतो; तरी पण मौनाचा जर अभ्यास झाला तर संगीतापेक्षां हि त्याचा परिणाम अधिक होतो.

काहीं बाबतींत मौन त्रासदायक व संगीत आह्लाददायक असू शकते, जसे आजारपणात होते. परंतु किती हि अुत्तम संगीत असलें तरी तें तास-न्-तास चाललें तर कंटाळवाणें होअून काहीं वेळ शांत वातावरण असावे असें वाटते. सांगण्याचें तात्पर्य हे च की मौनात निदान संगीताअितकें तरी सामर्थ्य आहे च

मनुष्याला वाटते की मौन ठेवल्याने मन अितस्ततः भटकते. म्हणून गांधीजींनी दोन मिनिटें मौन राखण्याची प्रथा सुरू केली. व्यक्तिगतरीत्या मौन तर चांगलें आहे च परंतु सामुदायिकरीत्या पण मौन फार अुत्तम वस्तु आहे. निर्णयासाठीं सुद्धां मौन अुपयोगाचें आहे. कधी कधीं असें होते की चर्चा होत च राहतात आणि ते च ते तर्क पुनः-पुन्हा मांडण्यात येतात, परंतु त्याने निर्णय होत नाहीं. अशा वेळीं सर्व लोक काहीं वेळ शांत होअून घरीं निघून जातील आणि दोन चार दिवसानंतर पुन्हा अेकत्र येतील तर निर्णय लवकर होअू शकतो.

म्हणून मौनाला प्रार्थनेचा च अेक भाग समजला जाअील तर ते मोठें लाभदायी हाअील असे मला वाटते.

गोदापियासाळ, मेदिनीपूर (बगाल)
१५-१-'५५

---

(३)

## अपरिग्रहाची साधना

आज तुम्ही मडळींनीं अपरिग्रहाबाबत विचारलें आहे.

"अपरिग्रह" काहीं नवीन शब्द नाहीं. पुरातन काळापासून आपल्या देशात तो चालत आला आहे. परतु त्याच्या बाबतींत अशी अेक कल्पना होअून गेली आहे कीं अपरिग्रह हा सन्याशाचा गुण आहे. गृहस्थासाठीं परिग्रह असायला च पाहिजे.

### चुकीची वाटणी

सोन्याचा सग्रह गृहस्थाला अत्यत आवश्यक आहे असे मानलें गेलें आहे. अेखाद्याने कोणाच्या घरात चोरी केली तर ते लहान पाप समजलें जातें, परतु सोने चोरले तर मोठें पाप समजलें जातें. सोनें म्हणजे जणू अनेक वर्षांची कमाअी. तें हिराअून नेणें महापातक मानलें गेलें, अितका सोन्याचा महिमा मानला आहे. गृहस्थासाठीं परिग्रह आणि सन्याशासाठीं अपरिग्रह अशी वाटणी झाली. सद्गुण वास्तविक सर्वांना लागू असायला पाहिजे. परतु झालें अुलटें च.

गृहस्थासाठीं मर्यादित परिग्रह मानला असला तरी अेक वेळ बचाव होता. परंतु तें हि झालें नाहीं.

### साधी राहणी

आपण कार्यकर्ते आहोंत. जनसमाजाचे आपण सेवक आहोंत. याचे भान राहिलें पाहिजे. जनसमाज आपला स्वामी आहे. जनसमाजाची स्थिति संपन्न असली तर आमचें जीवन हि संपन्न असेल. त्याचें जीवन विपन्न असलें तर आपण हि कष्ट सोसण्यास तयार असलें पाहिजे. या दृष्टीनें कार्यकर्ते आपली राहणी साधी ठेवतील अशी मी आशा करतों. भोजनाव्यतिरिक्त अितर बाबतींत त्यांनी कमी खर्च करावा. मध्यम वर्गातील लोक जेवणात कमी खर्च करतात पुस्तकें, प्रवास, शिक्षण, औषधपाणी अित्यादि अवांतर बाबींवर फार च जास्त खर्च करतात. कार्यकर्त्यांनें जास्त खावें असा याचा अर्थ नाहीं. परंतु आरोग्यासाठीं आवश्यक असेल तो आहार घेतला पाहिजे.

### योगमय जीवन

औषधपाणी आणि मुलांचें शिक्षण या बाबतींत विशेष दक्षता राखणें जरूर आहे रोग आला तर हा डॉक्टर तो डॉक्टर आपण पाहत बसतों आणि पैसा नसला तर लाचार बनतों. परंतु निसर्गोपचार आणि घरगुती औषधें यांचा अुपयोग केला पाहिजे. मीं असें पाहिलें आहे कीं कार्यकर्ते साधेपणानें राहतात परंतु आजारी पडले कीं दूरदूर अुपचारासाठीं जातात. कार्यकर्त्याला शरीर-यंत्राचें ज्ञान असलें पाहिजे असा आपण आग्रह ठेवला पाहिजे. त्यानें योगपूर्वक रहायला शिकलें पाहिजे. स्वास्थ्य बिघडलें तर वागण्यात दोष झाला असें समजलें पाहिजे.

औषधासाठी कार्यकर्त्याच्या जीवनात अेका कौडीचा हि खर्च मान्य करायला मी तयार नाही. आम्ही अेकदां असें ठरविलें होतें की वर्षभरात जो आजारी पडणार नाही त्याला बक्षिस द्यायचे. आजारी पडल्यास त्याचे कारण शोधले पाहिजे आणि ते दूर केलें पाहिजे.

### मुलांचें शिक्षण

मुलाच्या शिक्षणाची व्यवस्था अुत्तम असावी हे मी मानतो. परंतु अुत्तम व्यवस्थेचा अर्थ काय ? विहारमध्ये मी पाहिलें की कार्यकर्ता तीस रुपयावर संतुष्ट असतो, परंतु मुलाच्या शिक्षणासाठीं त्याला पैसा हवा असतो. हे चूक आहे कार्यकर्त्याने आपल्या मुलाला येकारीने शिक्षण देअू नये मुलगा अेखाद्या कामात प्रवीण असावा, मातृभाषेचे ज्ञान त्याला असावे, नैतिक व्यवहाराचें ज्ञान त्याला असावें आणि त्याला आत्म-विद्या लाभावी याला च मी नअी-तालीम म्हणतो. अेखाद्या विशिष्ट पद्धतीबद्दल माझा आग्रह नाहीं. शिक्षणावर फार खर्च होअू नये आणि मुलें कुणावर भारभूत होणार नाहींत असें त्याना शिक्षण मिळावें.

### शेतकऱ्याचें जीवनमान

या झाल्या दोन गोष्टी या शिवाय साऱ्या राहणीमधे कार्यकर्त्याला जो काहीं खर्च लागत असेल तो मला मंजूर आहे. आपले स्वामी शेतकरी आहेत. त्याच्या जीवनाशी जितके आपण समरस होअू शकू तितके चांगलें. मला दूध दही घ्यावे लागते याचे दुःख आहे. अन्न मला चालत नाहीं. दूध घ्यावे लागते या बद्दल मनाला वेदना होतात. लोक म्हणतात हा योगी आहे. परंतु बाबा धान्य खात नाहीं यात त्याच्या साधुत्वामध्ये अुणीव आहे असें बाबाला वाटते. अेखाद्या

शेतकऱ्याप्रमाणें आपलें शरीर आपल्याला ठेवतां आलें पाहिजे मी अन्न घ्यावा असें सुचविण्यात आलें मी नकार दिला कारण तो बाहेरून आणावा लागतो दूध महाग असलें तरी गावोगाव मिळतें

शेतकऱ्याच्या जीवनाशीं समरस होणें शरीरश्रमाशिवाय शक्य नाहीं कार्यकर्ते शरीरश्रम करणार नाहींत तर शेतकऱ्याप्रमाणें गहू शकणार नाहींत आमच्या यात्रेतील लोकांना चालावें लागतें हा जणू एक आजाराविरुद्ध विमा च आहे परंतु याशिवाय तास दोन तास त्यांनीं शरीरश्रम करावा असें माझें म्हणणें आहे

### आयशास्त्राचें ज्ञान

कार्यकर्त्याला रसायनाचें उत्तम ज्ञान असायला पाहिजे त्यानें थोड्या च खर्चात अधिक पौष्टिक आहार मिळू शकतो अन्न कसें शिजवावें किंवा भिजवावें याचें ज्ञान राहील तर मजेत अधिक पोषण हि मिळेल व अपरिग्रह हि साधेल

रसायन प्रमाणें अन्नशास्त्राचें हि ज्ञान असायला पाहिजे जसें आवळ्यांत व पेरूंत विटमीन ‘सी’ मिळतें दोन तोळे पेरू, अर्धा तोळा आवळा, पांच सहा तोळे पपई घेतली कीं ‘सी’ विटॅमिनची पूर्ति झाली अशाप्रकारें ज्ञान असायला पाहिजे

### आसक्ति सोडा

याशिवाय अपरिग्रहांत मुख्य वस्तु ही कीं जो काहीं परिग्रह करावा लागतो त्याची कसली च आसक्ति असू नये म्हणून मी म्हणत असतो कीं जे लोक सरकारी कामांत गेले त्यांनीं राजा जनकाचें अनुकरण करावें आणि आम्ही लोक जे बाहेर आहोंत त्यांनीं शुकदेवाचें

करावें किंवा त्यांनी विष्णूचें अनुकरण करावें, आम्ही शंकराचें करावें. विष्णूजवळ छायेप्रमाणें लक्ष्मी बसली आहे परंतु त्यांना तिचें भान नाहीं आणि अिकडे शंकराजवळ मुळीं काहीं च नाहीं दोन्हीकडे अेक च गोष्ट — आसक्ति नसणें. मनुष्य नियमितपणानें वागेल तर आसक्ति येत नाहीं

स्त्रियांनीं आपले जुने अलंकार सोडून घड्याळ, पेन आदि नवीन अलंकार घेतले. पुरुषांनीं हि ते अलंकार धारण केले. आमच्या अेका मित्राचें लग्न होतें लग्नानंतर परत करण्याच्या बोलीनें ता आमचें घड्याळ घेअून गेला. विनाकारण असा वस्तु वापरण्याची काय गरज आहे. गा राजा या जवळ अेक घड्याळ होतें अेक अेक मिनिटाचा ते अुपयाग करीत तसें च आम्ही हि केलें तर घड्याळ वापरणें ठीक आहे. तात्पर्य असें की अपरिग्रह केवळ स्थूलपणात नव्हे तर सूक्ष्मपणानें हि साधला पाहिजे

---

(४)

## ब्रह्मचर्य

ब्रह्मचर्य हा भारतीय संस्कृतीचा अेक खास विषय मानला जातो जगातील सर्व समाजात या विषयीं विचार झाला आहे आणि प्रयोग हि झाले आहेत, नाहीं असें नाहीं. तरी देखील हिंदुस्थानच्या साहित्यात आणि संस्कृत भाषेंत ब्रह्मचर्याविषयीं जितका आदर वसत

आहे आणि त्या विषयीं जितकें खोल चिंतन आढळते तितकें ते अन्यत्र सापडत नाहीं

**ब्रह्मचर्याचा अर्थ**

ब्रह्मचर्य शब्दाचा भावार्थ हा की मनुष्याने ब्रह्माच्या शोधात आपल सारे जीवन लावावें ब्रह्मचर्य म्हणून आपल्या समोर अेखादी नेगटिव्ह म्हणजे अभावरूप गोष्ट ठेवण्यात येत नाहीं तर पॉझेटिव्ह म्हणजे भावरूप गोष्ट ठेवण्यात येते ब्रह्मचर्यात अेखादी विशिष्ट गोष्ट टाळायची असते असे च नव्हे, तर प्रयत्न करायची हि गोष्ट असते त्याला च ब्रह्मचर्य म्हणायचे ब्रह्मचर्य म्हणजे बृहत्तम ध्येयाचा, परमेश्वराचा, साक्षात्कार करून घेणें त्याहून खालची गोष्ट सांगितलेली नाहीं अितकें विशाल आणि व्यापक ध्येय आहे ते !

कार्य करणें कठिण आहे. सेवेबरोबर च कुटुंब हि वाढत गेलें, मुलें बाळें होत गेलीं, तर ते चालणार नाहीं. म्हणून त्यानीं निर्णय घेतला कीं समाजाच्या सेवेसाठीं ब्रह्मचर्याचें पालन आवश्यक होय. परंतु नंतर त्याचा विचार त्या गोष्टीच्या खोलींत जाऊन पोंचला अशा प्रकारें गांधीजींनीं देखील सुरुवात केला ती अंतिम अुद्देशासाठीं, ब्रह्माच्या प्राप्तीसाठीं नव्हे, तर समाज-सेवेसाठीं केली. ते देखील अेक विशाल ध्येय आहे. त्यानंतर त्याचा विचार विकास पावत गेला. अशा प्रकारें अेखाद्या व्यापक आणि विशाल ध्येयासाठीं आरंभ करून मागाहून अधिक पुढें जायचें असते.

अशा च प्रकारें ब्रह्मचर्य अितर गोष्टींसाठीं देखील असू शकते. काहीं लोक असे असतात कीं ते सायन्समाठीं—विज्ञानासाठीं—ब्रह्मचर्याचें पालन करतात सायन्सवर त्याची अितकी अव्यभिचारी निष्ठा असते कीं त्या च स्थितींत गृहस्थाश्रमात पडणे त्याना योग्य वाटत नाहीं. आणि ते ब्रह्मचर्याचें पालन देखील अुत्तम प्रकारें करतात. ते विज्ञानात तन्मय होअून जातात आणि म्हणून त्याना ब्रह्मचर्य साधते. तन्मयतेत अेक मोठी शक्ति आहे कोणत्या हि अेखाद्या ध्येयात तन्मय होअून जा, रात्रंदिवस तिचें च ध्यान लागू द्या, कीं ब्रह्मचर्य साधते. हे पूर्ण ब्रह्मचर्य नव्हे, कबूल. कारण जोंपर्यंत ब्रह्मनिष्ठा अुत्पन्न होत नाहीं तोंपर्यंत तें पूर्ण ब्रह्मचर्य म्हटलें जाणार नाहीं.

**सर्व अिंद्रियांचा निग्रह**

ब्रह्मचर्यासाठीं फार मोठ्या साधनेची गरज आहे फक्त अेका च अिंद्रियाचा निग्रह अेवढा च त्याचा अर्थ मानून बसलों तर अनर्थ व्हायचा. ब्रह्मचर्य म्हणजे सर्व अिंद्रियांचा संयम म्हणून ब्रह्मचर्यांत

दोन गोष्टी येतात (१) ध्येय उत्तम असलं पाहिजे आणि ते विकसित होत होत ब्रह्माच्या उपासनेपर्यंत पोचलें पाहिजे (२) सर्व इंद्रियावर आणि मनावर ताबा असला पाहिजे याचा अर्थ असा नव्हे की इंद्रियाचा आणि मनाचा कोडमारा करायचा, त्याना दडपून टाकायचे ब्रह्मचर्यात त्याना योग्य मार्गानं घेऊन जायचे असते दडपून टाकण्याच्या विचारानें वागल्यास मनुष्याचा विकास व्हायचा नाहीं ती निषेधक, नेगटिव्ह गोष्ट होय

### प्रत्येक आश्रमात ब्रह्मचर्य

या दृष्टीनं हिंदुस्थानच्या धर्म विचारात सुव्यवस्थित आयोजन करण्यात आलें आहे माणसापाशीं सर्वात आधी गुरु निष्ठा असली पाहिजे त्याबरोबर ब्रह्मचर्य जोडून दिलें हा झाला पहिला आश्रम—ब्रह्मचर्याश्रम मग दुसरा आश्रम येतो गृहस्थाश्रम त्यात पति आणि पत्नी याची परस्परविषयाची निष्ठा येते त्याला हि ब्रह्मचर्य जोडून दिलें त्यानंतर वानप्रस्थ आश्रम येतो त्यात समाज निष्ठेबरोबर ब्रह्मचर्य जोडून दिलें आहे, आणि मग अंतिम आश्रम सन्यासाश्रम त्यात ब्रह्मनिष्ठा असते तिच्याबरोबर देखील ब्रह्मचर्य जोडून दिलें अशा प्रकारें आदि पासून अंतापर्यंत ब्रह्मचर्याचा विचार ठेवून दिला आहे विचारापासून च पोषण मिळतें विचाराशिवाय काम होत नाहीं आम्ही पायी फिरतों तर श्रम तर होतात च, परंतु आम्ही एका उद्देशाने फिरतों आहों, म्हणून ते श्रम आम्हाला वाटत नाहींत ते श्रम नाहीं झाले, ते तप झालें नाहींतर तो ताप झाला असता विचाराशिवाय कष्ट केले तर ताप होतो परंतु विचारपूर्वक कष्ट केले तर ते आनंदमय च होतात त्याना तप म्हणतात

**जीवनाची मूळ निष्ठा**

ब्रह्मचर्याश्रमात गुरुनिष्ठा असते. त्यात अध्ययन करायचे असते, त्याबरोबर ब्रह्मचर्य येते. अशा प्रकारे मनुष्याच्या जीवनाचा मूळ पाया तयार होतो. ब्रह्मचर्य मूलभूत निष्ठा आहे. अलीकडे बुनियादी तालीमची म्हणजे मूळ शिक्षणाची गोष्ट केली जाते. त्याचा अर्थ असा की ज्या गोष्टी सबंध जीवनात अुपयोगी पडतात— अुदाहरणार्थ अुद्योग वगैरे—त्याची बुनियाद म्हणजे पाया पक्का व्हावा. परंतु ब्रह्मचर्य या सगळ्याहून मोठा गुण आहे. तो असा गुण आहे की ज्याच्यापासून मनुष्याला नित्य मदत मिळते आणि जीवनातील सर्व संकटात बळ मिळते. म्हणून बुनियादी तालीममध्ये मुलांच्या ठिकाणी ब्रह्मचर्याची निष्ठा अुत्पन्न होअील अशी च व्यवस्था असली पाहिजे.

अध्ययन-काल संपल्यानंतर गृहस्थाश्रम येतो. त्यात पति आणि पत्नी यांची परस्पर-निष्ठा आणि केवळ संतानोत्पत्तीसाठी च शरीर-संबंध या गोष्टी येतात. आजकाल जगात ही गोष्ट चालत नाही परंतु लोकांना हा विचार पटल्यास चालू शकते. अशा प्रकारें गृहस्थाश्रमाचा हि आधार ब्रह्मचर्य असतें. संतान-वासनेबरोबर संतान-सेवेची गोष्ट येते आणि त्याबरोबर संतानपूजा सर्वांचा धर्म बनतो. मग अतिथि-सेवा हि येते. ही सर्व साधने ब्रह्मचर्याला आवश्यक आहेत. गृहस्थाश्रम देखील थोड्या च वर्षांसाठीं असतो. अशा प्रकारे आधी ब्रह्मचर्याश्रम, नंतर थोड्या काळासाठीं गृहस्थाश्रम आणि त्यात हि ब्रह्मचर्यासाठीं अवकाश आणि त्यानंतर वानप्रस्थाश्रम अशी योजना बनविली होती. परंतु दुःखाची गोष्ट आहे, की आज ती योजना अस्तित्वात नाही.

हिन्दुस्थानच्या धर्मातील ही जी खास गोष्ट होती ती आतां अुरलेली नाहीं. आता तर फक्त थोटासा भक्तिमार्ग राहिला आहे. आणि तो सर्व च धर्मात चालला आहे. चागला च आहे तो. त्याच्या च आधारावर आपण पुढे प्रगति करणार आहोत. परतु भक्तिमार्ग तर अेक कमीन-कमी कार्यक्रम आहे. आध्यात्मिक जीवनाची ती बुनियाद आहे. त्या बुनियादीवर, त्या पायावर, अुरलेली सगळी अिमारत अुभी करायची आहे. आज तर हिंदु-धर्माची अिमारत टासळून पटली आहे. हिंदु-धर्माची नव्याने स्थापना करायची आहे. त्यात ब्रह्मचर्य हा अेक फार मोठा विचार आहे.

**अिस्लामचा आदर्श**

अिस्लामने विचार माडला आहे की गृहस्थ धर्म हा च पूर्ण आदर्श होय. बाकीचे आदर्श, ब्रह्मचारी वगैरेसारखे, गौण आदर्श होत. अेशूख़िस्त तसे आदरणीय होते. ते ब्रह्मचारी होते. परंतु त्याचे जीवन पूर्ण जीवन म्हटले जाणार नाही. पैगबर महंमदाचा आदर्श पूर्ण आहे. ते गृहस्थ हाते. तशा ब्रह्मचाऱ्याला तज्ञ म्हणता येअील. तज्ञ अेकागी असतात. परतु समाजाला त्याची हि गरज असते. अशा च प्रकारे ज्यानी सुरवातीपासून अखेरपर्यंत ब्रह्मचारी जीवन च व्यतीत केले, त्याचा आदर्श पूर्ण नव्हे. पुरुषोत्तम, पूर्ण आदर्श, तर गृहस्थ च. स्त्रिया पुरुष दोहोंच्या वावर्तात गृहस्थाश्रम च आदर्श होय. या दृष्टीने मुसलमानाचे चिंतन चालते.

**वैदिक आदर्श**

वैदिक धर्मात वेगळी च गोष्ट आहे. अिथें ब्रह्मचारी च आदर्श मानला आहे. मध्यंतरी जो गृहस्थाश्रम येतो तो वासनेच्या नियंत्रणासाठीं

आहे. अशा प्रकारे जिच्या साहाय्याने मनुष्य वरच्या पायऱ्या लवकरात लवकर चढू शकेल अशी ही नियंत्रणाची अेक सामाजिक योजन बनविण्यात आली होती. परंतु सर्वोत्तम आदर्श होता ब्रह्मचारी च.

## स्त्री-पुरुषांत भेद

मध्यंतरींच्या काळात स्त्री-पुरुषामध्ये भेद मानला गेला. त्यामुळे हिंदुधर्माची दुर्दशा झाली. पुरुषाना ब्रह्मचर्याचा अधिकार मिळाला, परंतु स्त्रियाना त्याचा अधिकार नव्हता. म्हणून स्त्रीला गृहस्थाश्रमी बनलें च पाहिजे असें मानलें गेलें. ती गृहस्थाश्रमी झाली नाहीं तर तो अधर्म होतो. अधर्माचा हा आरोप सहन करून हि अशा काहीं स्त्रिया निघाल्या कीं ज्या समाजाच्या विरुद्ध अुभ्या राहून ब्रह्मचारिणी राहिल्या. अुदाहरणार्थ राजस्थानची मीराबाअी आणि महाराष्ट्राची मुक्ताबाअी. परतु समाजानें तर त्याच्या वर अधर्माचा आरोप केला च. त्यांनी आपल्या बाबतींत ब्रह्मचर्याचा आग्रह राखला; परतु समाजानें त्याचा ब्रह्मचर्याचा अधिकार मानला नाहीं.

## दोषांचें संशोधन आवश्यक

अशा प्रकारें मधल्या काळात फार मोठा दोष अुत्पन्न झाला. म्हणून आतां या काळीं संशोधन करणें आवश्यक आहे. हक्क दिला तरी त्याचें पालन करणारे थोडे च राहतील. परतु कमी असोत अगर जास्त, स्त्रीला ब्रह्मचर्याचा अधिकार नाहीं ही गोष्ट च चूक आहे. त्यामुळें आध्यात्मिक अपात्रता अुत्पन्न होते. अेखादी व्यावहारिक अपात्रता असेल तर तिच्यात सुधारणा करणें शक्य आहे. परतु आध्यात्मिक च अपात्रता असेल तर ती फार दुःखाची गोष्ट म्हणावी लागेल. हिंदुस्थानात मधल्या काळात जी तेजोहानि झाली

त्यानें अेक कारण स्त्रियांना ब्रह्मचर्याचा अधिकार राहिला नाहीं हें आहे.

## ब्रह्मचर्याचो दीक्षा देण्यांत धोका

भगवान् बुद्ध प्रथम आपल्या अुपदेशकांमध्यें स्त्रियांना दीक्षा देत नव्हते. अेके दिवशीं त्यांचा प्रसिद्ध शिष्य आनंद अेका स्त्रीला घेअून आला आणि तो भगवताला म्हणाला कीं ही स्त्री अुपदेश देण्यास योग्य आहे, हिला दीक्षा द्यावी. तेव्हा त्या वेळीं भगवान् बुद्धानीं जे अुद्गार काटले त्यात त्यानीं म्हटलें आहे—"आनंदाच्या सागण्यावरून मी स्त्रीला दीक्षा देत आहे, परंतु मी आज अेक धोका पत्करीत आहे." नंतर बुद्धधर्माच्या अवनतीच्या काळात हिंदुस्थानांत कांहीं चुकीच्या गोष्टी झाल्यात. जगात देखील अशा गोष्टी झाल्या आहेत. परंतु त्याची प्रतिक्रिया ही झाली कीं हिंदुधर्मानें स्त्रियाचा ब्रह्मचर्याचा

*आनंदा, जर तथागतानें अुपदेशिलेल्या धर्मविनयामध्ये स्त्रियांना प्रव्रज्या प्राप्त न होती तर हे ब्रह्मचर्य चिरस्थायी झालें असतें हा सद्धर्म सहस्र वर्षपर्यंत टिकता. परंतु आता स्त्रिया प्रव्रजित झाल्या आहेत आता ब्रह्मचर्य चिरस्थायी होणार नाहीं. सद्धर्म पाचशे च वर्षे टिकेल ज्याप्रमाणे पुष्कळ स्त्रिया असलेलें आणि थोडे पुरुष असलेलें कुल चोरांकडून सहज ध्वंस पावतें, त्याप्रमाणे आनंदा, ज्या धर्मविनयामध्यें स्त्रियाना प्रव्रज्या मिळते तें ब्रह्मचर्य चिरस्थायी होत नाहीं. ज्याप्रमाणे संपन्न अशा डोलणाऱ्या साळीच्या शेतात सेतटिका (सफेदा) नामक कीड वाटत जाते आणि त्यामुळें तें साळीचें शेत चिरस्थायी होत नाहीं त्या च प्रमाणे हे आनंदा, ज्या धर्म विनयात स्त्रियाना प्रव्रज्या मिळते तें ब्रह्मचर्य चिरस्थायी होत नाही. ज्याप्रमाणें आनंदा, संपन्न अशा अुसाच्या शेतात माजेष्ठिका नामक लाल कीड वाटत जाते आणि तिच्यामुळें तें अुसाचें शेत चिरस्थायी होत नाहीं, त्या च प्रमाणें हे आनंदा, ज्या धर्मविनयात स्त्रियाना प्रव्रज्या मिळते तें ब्रह्मचर्य चिरस्थायी होत नाहीं.

—विनय पिटक चुल्लवग्ग, भिक्खुणी-क्खंधक १

हक्क च काढून घेतला परंतु अपनिषदात अुलटी गोष्ट आहे तिथें तर स्त्री पुरुषात काही भेद च करण्यात आलेला नाही

**स्त्रियात काम-वासना अधिक, हे चूक**

प्राय मानलें जात की स्त्रियात काम वासना अधिक असते परंतु ही समजूत चुकीची आहे स्त्रीला प्रसूतीचे परिणाम भोगावे लागतात आणि मुलासाठी पुष्कळ कष्ट अुपसावे लागतात तेव्हा ज्यात अितके कष्ट सहन करावे लागतात, त्याविषयी त्यांच्या मनात अधिक आसक्ति असेल हे समजनीय दिसत नाही अेक दिवस मी देवळात गेलों होतो तेथ एका मातेचें चित्र होतें त्यात तिला प्रसूतीच्या वेदना होत आहेत असें दाखविलें होते मी जेव्हा तिचे कष्ट पाहिले तेव्हा मला वाटलें की त्या अर्थी अितके कष्ट होत आहेत त्या अर्थी भगवान् जन्म च देत नाहीं पुष्कळदा मला विचार येतो कीं माझें शरीर दुबळें आहे जर मी स्त्री असतों आणि अशा स्थितींत मला मुल झालीं असतीं तर मी कमी टिकलो असतों परंतु स्त्रीला संतानाची अिच्छा असते असे मानलें जाते स्त्री सृष्टींत मातृ प्रेरणा आहे म्हणून स्त्रीला प्रथम संतानाची अिच्छा होणे समजनीय आहे अगदी संतान रहित राहण्याचा आग्रह कदाचित पुरुषापेक्षा स्त्रीला अधिक कठिण वाटत असावा परंतु अेक मूल झाल्यानतर स्त्रीला वासना राहत नसावी कारण तिला मूल होताना जे कष्ट सोसावे लागतात हे मी आपलें विश्लेषण मांडलें आहे हे कितपत बरोबर आहे मला ठाअूक नाही

सांगायचे तात्पर्य हे की स्त्रीला काम वासना अधिक असते अशी तिच्या विषयी गैर समजूत पसरवून देण्यात आली आहे या गैर समजुतीचा परिणाम हा की स्त्रीवर अंकुश राखला जातो त्याचा

परिणाम हिंदुस्थानात हा झाला कीं कोठें अत्याचार झाल्यास स्त्रिया देखील पुरुषाचा बचाव करतात. जरा या गोष्टीचा खोल विचार करा म्हणजे दिसून येअील की याचा अर्थ हा होतो की स्त्रीच्या मनात पुरुषाविषयीं अनादर आहे. पुरुषाकडून अेखादी चुकीची गोष्ट झाली तर काहीं मोठेसे झालें असे तिला वाटत नाहीं. अेखादी स्त्री बिडी पिअूं लागली तर ते तिला चूक वाटते. परंतु पुरुष प्याल्यास तिला चूक वाटत नाहीं. मला देखील स्त्रियाना बिडी सिगारेट पिताना पाहून फार भयानक वाटते. परंतु असें का वाटावें ? स्त्री पुरुष दोघे हि तर समान च आहेत.

## स्त्रीची अपात्रता दूर झाली पाहिजे

तथापि हिंदुस्थानात स्त्रीच्याविषयी आध्यात्मिक अुच्चतेची भावना आहे आणि स्त्रीच्या मनात देखील ती च भावना आहे. म्हणून कोणी व्यभिचारी पुरुष निघाल्यास स्त्रिया च त्याला क्षमा करतात. त्या म्हणतात, अरे, पुरुष च ता. याला स्त्रीचा 'सुपीरिऑरिटी कॉम्प्लेक्स' म्हटलें जाअील. परंतु स्त्रियाविषयी जी गैर समजूत झाली आहे ती दूर केल्या-खेरीज समाजाचा अुद्धार होणार नाहीं. मीं पुष्कळ वेळा म्हटलें आहे कीं शंकराचार्यांसारखी अेखादी स्त्री जोंपर्यंत निघत नाहीं आणि ती जुन्या शास्त्राच्या चुका दाखवून तीं शास्त्रें फाडून टाकत नाहीं तो-पर्यंत स्त्रियांचा अुद्धार होणार नाहीं. परंतु शास्त्राच्या चुका दाखविण्याचें काम ती च करूं शकेल की जी अत्यंत तेजस्वी, वैराग्यशील आणि ज्ञाननिष्ठ असेल. तेव्हा अयोग्यता नाहींशी होअील. आणि तेव्हा च स्त्रीला ब्रह्मचर्य पालनाचा जो वास्तविक हक्क आहे तो प्राप्त होअील. परंतु आज तर ब्रह्मचारिणी स्त्रीची समाजात निंदा च केली जाते.

**अमृताच्या नावानें विष**

विषयवासनेला उत्तेजना देणारें जें शृंगारिक साहित्य आहे, त्याच्या योगें मनुष्य जितका अधोगतीस जाऊं शकतो, त्यापेक्षा देखील अधिक अधोगतीस वासनेपासून बचावण्यासाठीं लिहिल्या गेलेल्या साहित्याच्या वाचनानें मनुष्य जाऊं शकतो असें मीं पाहिलें आहे इतकें गचाळ साहित्य असतें ते !

**आई समोर चूक कशी ?**

व्हायला तर असें पाहिजे कीं ब्रह्मचाऱ्याच्या समोर एखादी स्त्री आल्यास तिला पाहून त्याला अधिक पवित्र आणि सुरक्षित वाटलें पाहिजे माझा असा अनुभव आहे कीं समोर कोणी स्त्री आल्यास मला माझी आई च आली असें वाटते म्हणून मला अधिक सुरक्षित वाटते कारण आई जवळ उभी असताना आपण अनुचित काम करीत नाहीं, त्या प्रमाणें ब्रह्मचाऱ्याला स्त्रीच्या सान्निध्यात अधिक सुरक्षित वाटलें पाहिजे म्हणून ब्रह्मचाऱ्यानें स्त्रीच्या संपर्कापासून दूर रहावें असा जो विचार आहे तो चूक आहे त्यामुळे उगा च कृत्रिम मर्यादा घातल्या जातात

मुसलमानाचा पडदा घ्या, तिथें हि ही च गोष्ट आहे हिंदू स्त्रीला असमर्थ मानलें आहे, हे सारें चूक आहे परंतु जैनामध्ये स्त्री आणि पुरुष दोघाना समान मानलें आहे खिस्त्यामध्ये जे कॅथॉलिक आहेत ते स्त्री पुरुषाना समान मानतात परंतु जे प्रोटेस्टंट असतात त्याचा विचार जवळ जवळ मुसलमानाच्या सारखा च आहे ते मानतात कीं ब्रह्मचर्य अशक्य वस्तु आहे आणि गृहस्थाश्रम च आदर्श वस्तु आहे परंतु कॅथॉलिकामध्ये स्त्री पुरुष दोन्ही ब्रह्मचारी असतात म्हणून

स्त्रीकडे कोणत्या दृष्टीने पहावें हा अेक सामाजिक विषय साधनेत येतो.

### ब्रह्मचाऱ्याची दृष्टि

स्त्रीकडे पाहता च कामा नाहीं अशी दृष्टि ब्रह्मचाऱ्याची असता कामा नये. मला रामायणातली अेक गोष्ट आठवते. प्रभु रामचंद्रानें लक्ष्मणाला सीतेचे दागिने दाखविले आणि विचारलें, हे दागिने ओळखतोस का? जेव्हा रावण सीतेला अुचलून घेअून गेला तेव्हा लंकेला जाताना सीतेनें रस्त्यात अेक-अेक काढून फेकून दिलेत. आपणाला कोणत्या रस्त्यानीं नेण्यात आलें हे रामचंद्राला कळावें असा हेतु. लक्ष्मणानें अुत्तर दिले—

> नाहं जानामि केयूरे, नाहं जानामि कुण्डले ।
> नूपुरे त्वभिजानामि, नित्यं पादाभिवन्दनात् ॥

केयूर आणि कुंडलें जे वरच्या भागाचे दागिने होत ते तर मी ओळखत नाहीं परंतु नूपुरे मात्र मी ओळखतो कारण रोज सीतेच्या चरणाना वंदन करताना मी ता पाहिलीं आहेत

### लक्ष्मण चरणाकृतीचा पुजारी

अेकदा साबरमती-आश्रमात या वाक्याची चर्चा निघाली बापू तर क्रांतिकारक च होते ते म्हणाले "लक्ष्मणाचें हे वाक्य नीट लागत नाहीं" मग मला विचारतात, "यावर तुझें काय मत आहे? तुला शास्त्र चागलें कळतें." तेव्हा मी म्हणालों, "लक्ष्मण ब्रह्मचारी होता आणि म्हणून त्याने सीतेचें मुख हि पाहिलें नव्हतें ही दृष्टि तुम्हाला नापसंत आहे आणि म्हणून तुम्हीं तें वाक्य नापसंत केलें आणि त्या दृष्टीने नापसंत करण्यालायक च आहे स्त्रीचें मुख पहायचे नाहीं

असा नियम ब्रह्मचाऱ्याने घेणे चूक आहे. परंतु मी या वाक्याचा दुसरा अर्थ पाहतो. यात लक्ष्मणाने सीतेच्या मुखाकडे पाहिलं नाहीं अितके च नाहीं, यात तर राम त्याला विचारीत आहेत याचा अर्थ असा कीं राम देखील ते दागिने ओळखीत नव्हते. तात्पर्य पति च पत्नीचे दागिने ओळखत नाहीं. याचा अर्थ असा की सीता काय किंवा राम काय दोघे हि अनासक्त होते दोघे अेकमेकाची आकृति पाहत नव्हते तर अेकमेकाला ब्रह्मरूपानें पाहत होते. परतु लक्ष्मण सीतेच्या चरणाची पूजा करीत होता. पादाभिवंदन करीत होता. अर्थात् तो अुपासना म्हणून चरणाकृति पाहत होता सहज च त्यात पायाचे दागिने हि येत होते. तो दागिन्यासकट चरणाकृतीला मूर्ति समजून अुपासना करीत होता." मी हा अर्थ सागितला, तेव्हा बापू म्हणाले, "तू तर शास्त्र-वचनाचा फार चागला वचाव करू जाणतोस." ते म्हणाले "हे योग्य आहे आणि शक्य तो शास्त्र-वचनाचा चागला अर्थ करावा आणि व्हायला हि असे च पाहिजे की शास्त्र-वचनाचा चागला च अर्थ करावा." म्हणून ब्रह्मचाऱ्याच्या मनात अशी भावना आली की समोर जी स्त्री आली आहे तिच्याकडे मीं पाहता कामा नये तर ती त्याची अुणीव मानली जाअील.

**सह-शिक्षणाचा प्रश्न**

लोक मला विचारतात मुलें आणि मुली याचे शिक्षण अेकत्र व्हावें कीं होअू नये ? तेव्हा मी अुत्तर देतो की हा प्रश्न तर परमेश्वरानें च सोडविला आहे प्रत्येक घरी मुलगे आणि मुली दोन्ही असतात परमेश्वरानें दोघाना वेगळें ठेवायचे मनात आणलें असते तर त्याने काहीं घरात मुलगे च मुलगे अुत्पन्न केले असते आणि काहीं घरी फक्त

मुली च अुत्पन्न केल्या असत्या म्हणून शिक्षण अेकत्र च व्हायला पाहिजे परतु आजचा समाज बिघडला आहे मनते साहित्य, सिनेमा अित्यादि सारे चालते म्हणून असे प्रश्न अुपस्थित होतात परतु वस्तुत ज्या ठिकाणीं स्त्री आणि पुरुष अेकत्र असतात तिथें च अधिकाधिक पवित्रता असते असा अनुभव आहे स्त्रीपासून आपला बचाव करायला पाहिजे असें मला कधीं वाटलें नाहीं मी ज्या प्रकारें पुरुषाशी व्यवहार केला तशा च प्रकारें स्त्रियांशीं व्यवहार केला

**अति परिचय नसावा**

माझ्या मते पुरुषा पुरुषामधें देखील अधिक शारीरिक परिचय असणे योग्य नव्हे परिचय मानसिक असावा शारीरिक परिचय देखील सेवेसाठीं आवश्यक असेल तेव्हा च असावा आपण पाहतों कीं पुरुष विनाकारण दुसऱ्या पुरुष मित्राच्या गळ्यात हात टाकतात अशा प्रकारें जें चालते ते आपल्याला पसत पडत नाहीं

**वात्सल्य नव्हे हा भोग आहे**

अेकदा कुणी तरी मला माझ्या अेका मित्राची गोष्ट सागितली. माझ्या मित्रानें अेकदा सुदर वासरू पाहिलें त्याला राहवलें नाहीं त्यान प्रेमाने त्या वासराला अुचलून घेतलें त्यान मला ही गोष्ट सागितली त्यानें माझ्या त्या मित्राच्या वात्सल्याचे वर्णन करण्यासाठीं सागितली परतु मी म्हणालों यात वात्सल्य काय आहे ? सुदर वासरू पाहिलें आणि अुचलून घेतलें ते घाणेरडें असतें तर वात्सल्याची गरज पडती कारण प्रेमानें त्याला साफ करण्यासाठीं वात्सल्य आवश्यक होतें त्यानें जर अेखाद्या घाण वासराला पाहता च अुचलून घेतलें आणि प्रेमानें साफ केलें तर मग आम्ही त्याचे प्रेम समजू परतु जर तुम्ही अेखादी सुदर

वस्तु पाहता च तिला पटकन् अुचलन घेतलें तर तमें करण्यात तुम्ही त्याचा अुपभोग घेत आहात त्यात सेवा नाही. अेखादें मूल भिअून गेलें असेल तर त्याला अुचलन घ्यायला पाहिजे हें मला मान्य आहे. त्याला धीर द्यायला पाहिजे. परतु त्या गायीच्या सुंदर वासराला विनाकारण अुचलून घेतलें त्यांत कोणता भाव होता? अेवढें आम्ही कबूल करतों कीं आमच्या त्या मित्राच्या मनात देखील वात्सल्य होतें, प्रेम होतें. परतु त्या प्रेमाचा दर्जा खालचा होता. म्हणून सेवेसाठीं च शरिरायी सबंध यायला पाहिजे. शरीर-परिचयाची जी अेक सामान्य मर्यादा आहे, ती फक्त स्त्री आणि पुरुष यांच्यात च नको तर पुरुषा-पुरुषामध्यें आणि स्त्री-स्त्रीमध्यें देखील ती च मर्यादा असायला पाहिजे. स्त्रिया आणि पुरुष यात भेद केला पाहिजे हे दर्शन, हा शास्त्रार्थ च चूक आहे.

### लिंगभेद अनावश्यक

ज्या लोकात स्त्री-पुरुषामध्यें अधिक मोकळेपणा असतो तिथें च अधिक पवित्रता असते असें आम्ही पाहिलें आहे. तिकडे मलबारमध्यें तर भाषेंत हि लिंगभेद नाही. हिंदीत मैं जाता हूँ, मै जाती हूँ अशा तऱ्हेचा भेद वाक्यागणिक येतो. बगालीत देखील लिंगभेद नाही ही चागली गोष्ट आहे लिंगभेद नसल्यामुळे बगाली पुस्तकाचा हिंदीत अनुवाद करणे देखील कठिण होअून बसतें. कारण अिथे स्त्री-पुरुषाच्या प्रेमाचे जें पावित्र्य असते ते अनुवादात येअू शकत नाहीं. हिंदीत लिंग-भेद आहे. वस्तुत त्याचा अनुवाद च होअू शकत नाहीं. कारण अिथें जे अिंपरसनल अ-शरीरी प्रेम आहे ते अनुवादात आणता येत नाहीं. परतु बगाली भाषेंत सस्कृतच्या अनुकरणाने विशेषणामध्यें लिंग भेद आणण्यात आला आहे ही चुकीची गोष्ट केली आहे क्रियापदात लिंगभेद

नाहीं ही चांगली गोष्ट आहे. वस्तुतः या भेदाची कांहीं गरज नाहीं. संस्कृतच्या क्रियापदांत देखील हा भेद नाहीं आणि अिंग्लिशमध्यें 'हिज' (तो-पुरुष) आणि 'हर' (ती-स्त्री) हे जे चालतें ते देखील बंगालींत नाहीं, ही चांगली गोष्ट आहे. यानें वातावरण पवित्र होतें.

**शौचाचा अर्थ**

स्त्री पुरुषांमधील भेद आपण आकृतीवरून च ओळखतों. आंतील आत्मा तर अेक च आहे. समाजानें मानून घेतलें आहे की दोघांमध्यें कांहीं मर्यादा असल्या पाहिजेत. परंतु ही कांहीं सर्वोत्तम वस्तु नव्हे. वस्तुतः दोघे हि खुल्या दिलानें अेकमेकांसमोर येत आहेत असें व्हायला पाहिजे. तरी शरीर-संपर्काची अेक सर्वसामान्य मर्यादा असावी. पुरुषां-पुरुषांमध्यें हि अधिक संपर्क नसावा. योग-शास्त्रांत याला शौच म्हटलें आहे. योग-शास्त्रांत दोन गोष्टी सांगितल्या आहेत. (१) यम म्हणजे अहिंसा, सत्य अित्यादि. (२) शौच म्हणजे स्वच्छतेची भावना. शौचाचा भावार्थ असा की आपल्या शरीराविषयीं आपल्याला घृणा अुत्पन्न व्हावी. 'स्वांग जुगुप्सा' असें घाणेरडें शरीर घेअून आपण दुसऱ्याजवळ कसें जायचें, असा विचार येतो. अशा अमंगळ शरीरानें आपण अितराच्या संपर्कांत अधिक येअू नये अशा प्रकारें आपल्या शरीराविषयीं हा जो अमंगळ भाव तो अेक रक्षण बनतो आणि त्यामुळें विनाकारण होणारा संपर्क टळतो. म्हणून माझें तर असें मत आहे की अशा च स्त्री-पुरुषांमध्यें मर्यादा पाळण्याची फारशी गरज नाहीं. जी मर्यादा पाळायची आहे ती सर्वांना समान आहे.

**स्त्रीला देवी मानणें चूक**

आतां मी अेक तिसरी गोष्ट सांगतों. जिचा समाज-शास्त्राशी

सबंध आहे. अलिकडे समाजात सुधारलेल्या लोकांत अधिकाधिक कृत्रिमता आली आहे त्यासाठी स्त्रीविषयी अधिक आदर दाखविणे - (याला दाक्षीण्य-भाव म्हणतात) चालले आहे. ज्याला 'दर्दी' म्हटलें जातें अशा प्रकारे, अेकीकडे स्त्रीविषयी घृणा आणि तिरस्कार असतो, अयोग्यता असते आणि दुसरीकडे अधिक भावना असते पुरुष आपल्याला स्त्रीचा सेवक मानतो मध्ययुगी यारपच्या सरदारामधे शिव्हलरी (वीरता) चीं गोष्ट चालली, ती यातून च निघाली आहे. ह्याचा च परिणाम म्हणून आजच्या समाजातील शिष्टाचाराचे नियम तयार झाले आहेत परतु माझ्यामते विषय वासना वाढत च जाते. ज्याप्रमाणें स्त्रीमधें अेखाद्या अयोग्यतेचा, अपात्रतेची कल्पना करणे चूक आहे, त्या च प्रमाणे स्त्रीमधें अधिकतेची व शुच्यतेची भावना राखणे चूक आहे. वस्तुत आत्म्याच्या बाबतीत स्त्री आणि पुरुष भेद नाहीं, हा भेद तर शरिराचा आह, याचे भान व्हायला पाहिजे. हे भान झालें म्हणजे वासनेपासून निवृत्त होणें सोपें होईल

**सेवकांचे कर्तव्य**

सेवकाना पाच यम सागितले आहेत—अहिसा, अपरिग्रह अित्यादि त्या व्रताच्या पालनासाठीं समाजात कशाप्रकारें जगाव याचा विचार करावा लागेल मला वाटतें, ज्याना या व्रताच्या शक्तीचे भान आह ते ब्रह्मचर्याबाबत असा च विचार करताल कीं मनुष्याच्याठायी जी वीर्य शक्ति असते ती अुत्पादनासाठीं होय म्हणून मनुष्याची वासना जितकी जितकी वाढेल तितका तो खाली पडेल प्राय म्हटलें जातें कीं जे प्रतिभेचे निर्मितीचे, काम करतात, त्याच्या ठिकाणीं स्थूल निर्मितीची, सतानोत्पत्तीची अिच्छा कमी असते म्हणून निर्मितीचे

या अुत्पादनाचे कार्य पवित्र होय. अुत्पादन अुच्च वस्तूचे केलें पाहिजे. जो तमें करील तो तुच्छ वस्तु सोडून देअील. बुद्धीची प्रतिभा ज्योति-सारखी असते. परंतु आत जें तेल आहे, त्याच्या आधारावर ज्योत तेवत असते, तें तेल म्हणजे ब्रह्मचर्य. ब्रह्मचर्याच्या योगें बुद्धीची प्रतिभा अधिक तेजस्वी होअील. म्हणून ज्यांना बौद्धिक काम करायचें आहे, अुच्च चिंतन करायचें आहे, त्यांच्या वीर्यशक्तीचा अुपयोग सामान्य अशा सन्तानोत्पादनाकडे करणें योग्य नव्हे.

## अुत्तम निर्मितीचें कार्य करावें

बुद्ध, शंकराचार्य, येशु हे सगळे ब्रह्मचारी च होते. त्यांच्या बुद्धीला जें काम मिळालें होतें, तें फार अुच्च होतें. त्यांना अुच्च दर्जाच्या निर्मितींत समाधान होत होतें. म्हणून निर्मितीची जी सर्व-साधारण प्रक्रिया मानली जाते, तिच्यापासून ते सहज च बचावले. म्हणून सेवकांच्यासमोर असलें अुत्तम निर्मितीचें कार्य असायला पाहिजे. ज्यांना समाज-रचना बदलायची आहे, क्रांतीचें काम करायचें आहे, त्यांना तर ब्रह्मचर्य अनायास साधायला पाहिजे. आपल्या समोर अेक असें च क्रांतीचें काम आहे. आपल्याला नव मानव निर्माण करायचा आहे. सर्व समाज बदलायचा आहे. अुत्तम साहित्य निर्माण करायचें आहे. व्यक्तींत आणि समाजांत वेगवेगळे गुण प्रकट करायचे आहेत. अितके महान् कार्य ज्यांच्या समोर पडलें आहे, त्यांना स्थूल निर्मितींत रस वाटणार नाही.

आज मी तुमच्या समोर सुव्यवस्थित रूपांत विचार मांडले नाहीं. जरा जंगलांत संचार करावा तसें च मी केलें आहे.

(५)

## प्रार्थनेचें रहस्य : सर्वत्र हरिदर्शन

गांधीजींच्यामुळे हल्लींच्या काळात हिंदुस्थानात प्रत्येक आश्रम व संस्थामधून सकाळ-संध्याकाळची प्रार्थना करण्याची अेक प्रथा पडून गेली आहे. परंतु हा केवळ अेक सदाचार आहे. आपण प्रार्थना तर करतों परंतु तीवर आपली जेवढी श्रद्धा असायला पाहिजे तितकी नसल्यानें त्यापासून जीवनावर जो परिणाम व्हायला पाहिजे तो होत नाही. प्रार्थनेचे, भक्तीचे रहस्य जेव्हा मनुष्य अहंकार सोडून केवळ हरिमय होण्याचा प्रयत्न करील तेव्हा च लक्षात येअील.

### भक्ति आणि भूदान

भजन, पूजन, प्रसाद-सेवन हीं भक्तीचीं साधनें मानलीं गेलीं आहेत. या सर्वांचा भक्तीशीं जेवढा संबंध मानला जाअील त्यापेक्षा भूदान-यज्ञाचा भक्तीशी अधिक संबंध मानला जाअील. कारण भूदान-यज्ञानें आम्हा काल्पनिक सेवा अथवा मूर्तीची पूजा करीत नसून साक्षात् नारायणाची सेवा करीत आहोत, जनतेमधें नारायण पाहत आहोत. भूदान यज्ञाचे कार्यकर्ते, आपण भक्तीचा मार्ग स्वीकारला आहे असा दावा करूं शकतात. वैष्णव सुद्धां असा दावा करू शकतात. आज मात्र आम्ही तसा दावा करू शकत नाही. कारण भूदान यज्ञातील खोल दर्शन आम्हाला अजून झालेलें नाहीं.

अितर चळवळींप्रमाणे ही अेक चळवळ नाही. आमचे जे मुख्य कार्यकर्ते असतील त्यांची मनोवृत्ति चळवळीची असता कामा नये. भूदान यज्ञात हजारों लाखो कार्यकर्ते येतील त्यांच्याबद्दल मी हें

सांगत नसून जे कार्यकर्ते पूर्ण वेळ देणारे आहेत त्यांच्या बाबतींत मी हें म्हणतों. गंगेची मूळ धारा शुद्ध व निर्मळ असली पाहिजे. मागाहून नाले येऊन मिळाले तरी कांहीं हरकत नाहीं. पूर्ण वेळ देणारे कार्यकर्ते हे भूदान-गंगेच्या मूळ धारेप्रमाणें आहेत. म्हणून आपण प्रत्यक्ष नारायणाची सेवा करीत आहोंत याचें जर त्यांना दर्शन झालें तर त्यांचें जीवन भक्तीमय होईल.

### भक्तीनें दृष्टि-परिवर्तन

आमच्या यात्रेंत कोणी दान देतात कोणी देत नाहींत त्या सर्वांकडे पाहण्याची आमची दृष्टि भक्तीमुळे बदलून जाईल. तसें झाल्यावर या चळवळीची शक्ति प्रकट होईल. अितर चळवळी वरखाली होत राहतात कारण आंदोलन म्हणजे डोलायमान. म्हणून भूदान यज्ञाला मी आंदोलन न म्हणता आरोहण म्हणतों यात सतत वर च जायचें आहे. काम करताना कधीं जमीन मिळेल कधीं मिळणार नाहीं. कधीं लोक शंका अुत्पन्न करतील, कधीं रागवतील, कधीं अहंकाराचें दर्शन होईल. परंतु हे सर्व वरवरचें दर्शन आहे अशी आम्हाला आंतून अनुभूति आली पाहिजे. सोन्याचे अलंकार बनविले म्हणजे आकार वेगवेगळा होतो परंतु सोनें हे सोनें च राहते. हे आपण ओळखतों त्या प्रमाणें आपल्यासमोर कुणी सज्जन येवो दुर्जन येवो ते सर्व वरवरचें दर्शन आहे; आंतरिक वस्तु सुवर्ण च आहे; असें वाटलें पाहिजे. या-साठीं ओश्वराच्या प्रार्थनेची गरज आहे. प्रार्थनेंत ओश्वरासमोर अुभे राहून त्यानें आत यावें म्हणून आपण अंतःकरणाचा दरवाजा अुघडा करीत असतों. यानें आमची संकुचित मनोवृत्ति जाअून हृदय व्यापक बनतें शरीरासाठीं स्नान आणि स्वच्छ हवा यांची जी आवश्यकता

आहे ती च आपल्या चित्तासाठी आध्यात्मिक हवेची आहे. म्हणून प्रार्थनेचें महत्त्व.

**प्राचीन संतांचा दावा**

या दृष्टीनें आपल्या प्रार्थनेकडे व भजनाकडे पहा. पूर्वीच्या वैष्णवांत जी प्रेरणा होती तींत काहीं उणीवा होत्या तरी पण ती अेक उत्तम वस्तु आहे. चाळिसला मीं म्हटलें होतें कीं आम्ही जगाचें परिवर्तन करणार आहोत, असा दावा पूर्वीच्या संतांचा नव्हता. आम्ही अीश्वराकडे जात आहोंत, त्याची कृपा अिच्छित आहोंत येवढा च त्यांचा दावा होता. आम्ही म्हणतों का हा अीश्वरी प्रकाश केवळ आम्हाला च नव्हे तर सार्‍या जगाला मिळावा. त्या योगानें मानवांत परिवर्तन होअील, समाज-व्यवस्थेंत परिवर्तन होअील आणि अेक क्रांति होअील. हिंसक क्रांति करणें सोपें आहे. तींत केवळ बाह्य रूप बदलावें लागतें. परंतु अहिंसक क्रांतींत आंतर परिवर्तन करावें लागतें. मानवाच्या हृदयांत प्रवेश करून परिवर्तन घडवून आणावें लागतें. त्या लोकांनीं येवढी मोठी अुमेद बाळगली. त्यांना भक्ति मार्ग आवश्यक आहे.

**आम्ही अेक पाअूल पुढें आहोंत**

प्राचीन संत व्यक्तीची शुद्धि व्हावी असें समजत आणि त्यासाठीं ते सेवा हि करीत. परंतु जगाला रूप द्यायचें आहे असा अहंकार म्हणा, आदर्श म्हणा किंवा मिशन म्हणा त्यांच्यांत नव्हते. आमचा दावा फार मोठ्या साहसाचा आहे. भगवान् बुद्ध आणि संत यांच्याहून अेक पाअूल आम्हाला पुढें जायचें आहे.

अरविंद बाबूंना असें च काहींसें म्हणायचें होतें आणि त्यासाठीं त्यांना साधना हि केली. परंतु त्यांची सर्व प्रक्रिया अितकी लांब

(अन् अेंटिग ) आहे की मनुष्य भ्रांत होतो आणि आपलें जीवन कुठें चाललें आहे याचा त्याला पत्ता च लागत नाही. अरविंद म्हणत की आमच्या साधनेनें वर ओश्वरापर्यंत आम्ही पोहोचू आणि तेथून जगासाठीं पुन्हा खालीं परत येअू प्राचीन मत म्हणत ओश्वराची प्राप्ति झाली कीं बेडा पार झाला परंतु अरविंदाच्या मतें ओश्वर-प्राप्ति होणें म्हणजे शक्ति मिळणें. त्यानंतर खालीं अुतरून वर मिळालेलें अमृत जगाला द्यायचें आहे. वेदामध्यें सेन पक्षी वर जाअून अमृत घेअून येतो अशी अेक गोष्ट आहे. अरविंदानीं वेदांतून च हे प्रतीक घेतलें आहे. वरून शक्ति प्राप्त करून समाजात काम करावें ही वस्तु योग्य आहे; परंतु त्याला त्यांनी जें रूप दिलें तें अितकें गूढ आहे की स्पष्ट दर्शन होत नाहीं. त्यासाठीं त्यानीं अेक प्रयोग शाळा हि अुभी केली. अरविंदबाबू कोठपर्यंत पोहोंचले होते हे मला माहीत नाहीं पूर्वीचे लोक मानीत कीं ओश्वर अवतार घेतो परंतु अरविंद म्हणत कीं आम्ही साधना करून वर जाअू आणि नवीन जीवन घेअून खालीं येअू

**मानवांत नारायण पहा**

अरविंदानीं जो विचार मांडला तो पूर्वीपेक्षा अेक पाअूल पुढचा आहे त्या च प्रमाणे मी जी गोष्ट सांगून राहिलो आहे, ती सुद्धा अेक पाअूल पुढची आहे मूर्तीला परमेश्वर समजून त्याची अुपासना करणें ही कठिण गोष्ट नाहीं मूर्तीला परमेश्वर मानणे सोपें आहे, कारण मूर्तीला राग-द्वेष नसतो, क्रोध नसतो म्हणून च मूर्ति परमेश्वराचें प्रतीक होण्याला सर्वथा अुपयुक्त आहे परंतु आपण जेव्हा मानवाला नारायण-स्वरूप मानतो तेव्हा मात्र प्रश्न कठिण होतो कारण हा नारायण कधीं रागावतो, कधीं जमीन कमी देतो, कधी जास्त देतो आमच्या

कल्पनेप्रमाणें तो वागत नाहीं. अशा स्थितींत त्याला नारायण मानणें कठिण होतें.

मूर्तीला आपण हवें तें रूप देअूं शकतों; परंतु या नारायणाचें रूप काय असावें हें आपल्या हातांत नाहीं, त्याच्या च हातांत आहे. तरी आपण करायचें तें करीत जावें. तो रागावेल तर समजावें कीं नारायणानें क्रोधमय रूप प्रकट झालें आहे; तो मत्सर करील तर समजावें कीं तो मत्सर रूपांत दिसत आहे. तो कंजूष बनला तर समजावें नारायणानें कंजूषरूप प्रकट झालें आहे. अशा प्रकारें त्या त्या रूपांत नारायण च दिसत आहे अशी जेव्हां आपली वृत्ति बनेल तेव्हां च आपण विश्वाचें परिवर्तन करूं शकूं. नाहीं तर जर क्रोधी माणसाच्या दर्शनानें, त्याच्या क्रोधानें आमच्या हृदयांत प्रवेश केला तर आम्ही दुनियेचें परिवर्तन करण्या अैवजीं दुनिया च आमचें परिवर्तन करील. म्हणून ज्यांना दुनियेचें परिवर्तन करायचें आहे त्यांनीं अितकें भक्कम असायला पाहिजे कीं त्याचा प्रभाव दुनियेवर पडावा, दुनियेचा त्यांच्यावर पडूं नये. या साठीं च आपल्याला अधिक खोल निष्ठा पाहिजे.

### हृदय परिवर्तनाचें आंदोलन

आपल्या मंडळींत अेक अुणीव आहे. आम्ही अेखादें काम सुरू करतों तर बाह्य कामांत आमच्यांत मतभेद व्हायला लागतात. प्रथम स्थान कुणाला मिळावें, दुय्यम कुणाला मिळावें, यावर मतभेद होतात याचा अर्थ असा कीं सामान्य पातळीवर च भांडणें होतात. भूदान-यज्ञ जर अेखादा फंड गोळा करण्याचें काम असतें तर त्याच्यांत हें सर्व चाललें असतें मीं कुठें कुठें पाहिलें आहे कीं कांहीं लोक धमकी देअून किंवा

दाव आणून भूदान मिळवितात, म्हणजे मते मिळविण्यासाठीं जे आडाखे अुपयोगात आणले जातात तसले आडाखे जर आपण भूदान मिळविण्यासाठीं अुपयोगात आणू लागलों तर आपण हृदय-परिवर्तन, मग जीवन-परिवर्तन आणि नंतर समाज-परिवर्तन जे करू अिच्छितों तें अुडून जाअील. आमचें हे जमीन मिळविण्याचे आंदोलन नाहीं. समाज-परिवर्तन करण्याचे आंदोलन आहे. म्हणून आमच्या कामात श्रद्धा असली पाहिजे, भक्तीची अुत्कटता पाहिजे.

## सर्वत्र हरिदर्शन

वस्तुत सकाळपासून सन्ध्याकाळपर्यंत आपला व्यवहार च असा असावा, प्रयत्न च असा असावा, कीं ज्या कोणाचे आपल्याला दर्शन घडलें ते हरिदर्शन च झालें, असे आपण मानू अशा प्रकारें सर्वत्र हरिदर्शनाचा जो आतून प्रयत्न होअील तो ठीक चालला आहे किंवा नाहीं हे पाहण्यासाठीं आपल्याला सतत जागृत असायला पाहिजे. त्यासाठीं प्रार्थनेची गरज आहे. प्रार्थनेंत सर्व भक्तजन अन्तर्मुख होअून बसतात आणि आपण अीश्वरासमोर बसलों आहोत अशी भावना करतात. आपलें सबंध दिवसभर जें काम चालतें त्यात आपली परीक्षा होत असते असा विचार आपण आपल्या मनात राखू तर या आंदोलनाचे तेज वाढेल. आपण कुठला हि संकोच अगर आडपडदा राखू नये. दुसऱ्या माणसाबरोबर व्यवहार करताना आपण आपल्याशीं च व्यवहार करीत आहोत असे वाटायला पाहिजे. आमची वागण्याची तऱ्हा जर अशी राहिली तर बघता बघता हे काम पुढे जाअील.

**जीवन-शक्ति आवश्यक**

हे काम आता पुढें जायचें च आहे. कॉंग्रेस व इतर संस्था हि हे काम आता अुचलीत आहेत. आता त्याचा विस्तार वाढेल. ५७ साल हि जवळ येत आहे. तेव्हा काम वाटणार च. परंतु नुसत्या विस्तार वृद्धीनें भागणार नाहीं. वाढ होतो पण आतील जीवन-शक्तीची गरज आहे. त्यासाठीं च कांही चांगले कार्यकर्ते माझ्या बरोबर फिरत आहेत. हा वर्ग च चालतो. त्याचा त्यांना लाभ होतो. हे सारें ठीक. परंतु आम्ही आतून ग्रहण करूं तेव्हा च शक्ति निर्माण होअील अन्यथा नाहीं. मग दुनिया काय म्हणते, वर्तमानपत्रें काय म्हणतात, कोणी स्तुति करतो की निंदा यांची पर्वा करता कामा नये. आमचें काम स्वच्छ, निर्मळ, अहंकार-रहित झालें तर आम्ही सर्व कांहीं पावतों.

**नम्रता आणि सहिष्णुता**

'तृणादपि सुनीचेन तरोरिव सहिष्णुना'—असें आपल्याला व्हावयास पाहिजे. भक्तानें स्वतःला तृणाहून हि नम्र समजावें. आणि वृक्ष जसा सहिष्णु असतो त्याप्रमाणें सर्व-सहिष्णु व्हावें.

हा संदेश जर आपल्या जीवनात आपण अुतरवला तर अिथे जे थोडे लोक बसले आहेत ते च सार्‍या बंगालमध्यें चैतन्य निर्माण करतील.

आजरा, मेदिनीपूर (बंगाल)
२१-१-'५५

---

(६)

# शेती-द्वारां जीवन-विकास

आजच्या व्याख्यानात जो विषय मांडला त्या विषयीं थोडा अधिक खुलासा करूं.

प्रत्येक व्यक्तीचा शेतीशीं संबंध राहील असा समाज बनविणे हा आमचा आदर्श आहे. पण ह्या आदर्शाला पोंचूं शकलो नाहीं तर त्याचा शेतीशीं मुळीं च संबंध राहणार नाहीं असे काहीं लोक समाजात राहतील म्हणून आपला आदर्श हा च कीं प्रत्येकाने शेती करावी आणि तिच्याबरोबर अितर अुद्योग सुतारी, मास्तरकी वगैरे करावेत. या गोष्टीचा नीट विचार करू तर आपल्या कार्यकर्त्यांना आपल्या जीवनात ही गोष्ट आणावी लागेल. आज आपण जमीन मागण्यासाठीं फिरत आहोंत त्यामुळें दररोज शेतीसाठीं चार तास देखूं शकत नाहीं तरी शेतकामाची आपल्याला संवय असायला पाहिजे; आणि जमीन वाटपानतर पुनर्निर्माणाचें जें काम आपल्याला करावयाचें आहे, त्यात ही गोष्ट फार अगत्याची आहे.

### शेतीचा आग्रह कां?

मी शेतीचा अेवढा आग्रह का धरतों याचा आपण विचार केला पाहिजे. माझ्या मतें शेतीशीं मनुष्याच्या विकासाचा सरळ संबंध आहे. जीवन विकासासाठीं शेती आवश्यक आहे. शेतीवाचून कोणी असू शकत नाहीं, असें म्हणायचें नाहीं. आत्म्यामधें अनेकविध शक्ति आहेत. त्यामुळें अेखाद्याचा जर शेतीशीं संबंध नसला तरी त्याचा पूर्ण विकास होणे अशक्य नाहीं. परंतु सामान्यपणे असें म्हणता येअील कीं, शेतीशीं

जर संबंध नसेल तर पूर्ण विकास होणार नाहीं. अेखाद्याला लिहिणें वाचणें येत नसेल तर त्याचा पूर्ण विकास होअू शक्त नाहीं असें आज मानलें गेलें आहे पण हा विचार संदेहास्पद आहे परंतु असें म्हणता येअील की माणसाचा जर शेतीशीं संबंध राहिला नाहीं तर त्याचा विकास होणार नाहीं. आम्ही साक्षर लोकांची मोजदाद करतों आणि म्हणतों कीं देशांत शंभर टक्के साक्षर होतील तर चांगलें होअील मी म्हणतों कीं ती च वृत्ति शेतीबाबत असावी माझ्या मतें देशांत जितके टक्के अधिक लोक शेती जाणतील तेवढी च देशाची अुन्नति लवकर होअील हा जो माझा विचार आहे तो अनुभवावर आधारलेला आहे मी मानतों कीं दुसऱ्या अुद्योगाच्याद्वारा हि विकास होतो, नाहीं असे नाहीं परंतु शेती करून जेवढा विकास होतो तेवढा होत नाहीं दुसऱ्या अुद्योगाच्याद्वारा जो विकास होतो तो शेतीचा पूरक असतो म्हणून प्रत्येकानें शेतीबरोबर अितर हि अुद्योग करावेत अशी आमची अिच्छा आहे

**सर्वांचा निसर्गाशीं संबंध असावा**

हें अेक स्वतंत्र दर्शन आहे, तत्त्वज्ञान आहे आमचे असें मत आहे कीं प्रत्येक व्यक्तीचा निसर्गाशीं संबंध असला पाहिजे प्रत्येक मनुष्याचा जर शेतीशीं संबंध राहिला तर डॉक्टरचा धंदा बंद होअील. ज्या समाजात डॉक्टरची गरज नाहीं तो अुत्तम समाज होय, आदर्श समाज होय परंतु हें तेव्हा च साध्य होअील, जेव्हा प्रत्येकजण शेती करील. शरीर-संवर्धनासाठीं म्हणून जो व्यायाम घेतला जातो त्यापेक्षा शेतीचें काम फार च अुत्तम आहे कारण कुस्तीचा आखाडा चार भिंतींच्या आत असतो, तेथें मोकळी हवा मिळत नाहीं, आणि म्हणून कुस्ती

खेळणारे दीर्घायु होतील अशी अुमेद आपण बाळगू शकत नाहीं. परंतु शेतींत काम करणारे दीर्घायु होतील अशी अुमेद मात्र आपण बाळगू शकतों. माझें असे मत आहे कीं ब्रह्मचर्याच्या साधनेला शेतीचा अुपयोग होतो. जर सर्व लोकाचा शेतीशीं सबध येअील तर देशात सयम वाढेल. म्हणून आम्हा लोकाच्या जीवनात तिचा समावेश व्हायला पाहिजे. आम्हाला दररोज शेतात काम करण्याचा कार्यक्रम ठेवला पाहिजे. त्यामुळें परिश्रम-निष्ठा वाढेल आणि भूदान-यज्ञाचा विचार विद्युत् संचाराप्रमाणे शीघ्र पसरेल.

कोकअी, मेदिनीपुर बगाल
२२-१-'५५

---

(७)

## भक्तिमार्गाची साधना

आज भक्ति-मार्गाच्या साधनेबाबत सागावें असें सुचविलें आहे.

पुष्कळाची अशी समजूत आहे कीं पूर्वीं माणूस आजच्या जगली जनावराप्रमाणे च होता. कमी अधिक का असेना पण तो होता जनावर च. तेव्हा त्याला सृष्टि-रहस्याचें कसलें च ज्ञान नव्हतें; आणि ज्ञानाच्या अभावामुळें त्याला भय वाटत होतें. पाअूस आला, वीज चमकली, भूकप झाला म्हणजे तो भिअून जाअी. तसा तो आज हि भिताना दिसतो. परतु त्याकाळीं भय अधिक वाटायचें. अशा प्रकारें सृष्टीचें रूप त्याला अधिक भयानक वाटायचे आणि त्याचा परिणाम

हा की भयभीत होऊन तो मनातून निसर्गाला शरण जाअी आणि अशाप्रकारें यांतून च हळूहळू भक्ति-मार्गाचा आरंभ झाला असे काहीं लोकांचे मत आहे. परंतु मी असें मानत नाहीं.

**भक्तीचा जन्म प्रीतींतून**

भक्तीचा अुगम भीतींतन नसून प्रीतींतून झाला आहे, असें माझें मत आहे. मनुष्याला भीति जितकी नैसर्गिक आहे, त्यापेक्षा प्रीति अधिक नैसर्गिक आहे. भय मनुष्याला असतें तसें जनावराला हि असते, परंतु मानवाला भीतीचा अनुभव येण्यापूर्वी प्रीतीचा अनुभव असतो आज हि आपण पाहतों कीं प्रत्येक जीव मातेच्या अुदरातून जन्म घेतो आणि त्या बरोबर च मातेचे प्रेम त्याला मिळते. अशाप्रकारें त्याला पहिला अनुभव प्रेमाचा असतो. त्यानंतर त्याला भीतीचा अनुभव येतो. माझ्या वाचनात भक्तिविषयक अतिप्राचीन जीं स्तोत्रें आलीं आहेत त्यात अीश्वराला माता, पिता म्हणून संबोधिलें आहे. भक्ति-मार्गात अीश्वराच्या प्रेममय रूपाचे च दर्शन अधिक होते. त्या मानानें त्याच्या भयानक रूपाचें दर्शन होत नाहीं. अीश्वराचे गुण अनंत आहेत तेव्हा त्यात असे हि काहीं गुण असणार कीं जे आम्ही पचवू शकत नाहीं आणि त्यामुळे आम्हाला ते भयावह वाटतात. यातून च भीति निर्माण होते. परंतु प्राचीन भक्तीचा जो आरंभ झाला तो भयातून नाहीं प्रीतींतून झाला आहे.

**भीति आणि प्रीति**

पूर्वीच्या काळीं झालें ते च आज होत आहे. आज हि भीति आणि प्रीति दोहोंचा अनुभव आपल्याला येत आहे. आज दुनिया ॲटम बॉंबच्या भयाने पछाडलेली आहे. पूर्वी हे भय नव्हते. पूर्वीचे

लोक सृष्टीचे भयानक रूप पाहून भीत असत. आज दुसरें भयानक रूप समोर उभें आहे. भीति कमी झालेली नाहीं; स्वरूप वदललें आहे. आज हि किती तरी लोक भीतीमुळें ओश्वराकडे वळतात आणि प्रार्थना करतात. ओश्वर याना भयातून सोडविणारा होतो जसा तो प्राचीन काळीं होत होता परतु प्रेमानें हि लोक ओश्वराजवळ जातात. तेव्हा भक्तीचा आरभ झाला भीतींतून आणि नतर प्रेमाचा विकास झाला, हा जो विचार आहे तो चूक आहे. भक्तीचे दोन्ही प्रकार, ज्यात भय हि आहे आणि प्रेम हि आहे, पूर्वीपासून चालत आले आहेत, आणि आज हि विद्यमान आहेत

**कर्म आणि भक्ति यांत फरक**

कर्म-मार्ग आणि भक्ति-मार्ग या दोहोंत फरक आहे. भक्ति-मार्गात मनुष्याला परमेश्वरापासून क्षमेची आशा असते परंतु कर्म-मार्गात कर्मांचे प्रति-फळ असते, करावें तसे भरावें. वाओीट काम केलें तर वाओीट फळ मिळेल, चागलें काम केलें तर चागलें फळ मिळेल. पेरावें तसे अुगवते हा कर्माचा नियम आहे तो कल्याणकारी च आहे त्यानें आपल्या हातात किल्ली येते. आपण चागलें काम केलें तर आपल्याला चागलें फळ मिळते अर्थात कर्माचा नियम कठोर नाही. तो म्हणतो पेरा तसे मिळवा ही अगदीं सरळ गोष्ट असून यानें प्रत्येक जण स्वतत्र राहून ज्याला जें पाहिजे ते तो प्राप्त करू शकतो

वास्तविक कर्माच्या नियमानें मनुष्याला भय वाटता कामा नये. परतु माणूस अितका दुवळा आहे कीं पुष्कळदा आपल्या कर्मांचे फळ स्वीकारायला तो तयार होत नाहीं. तो गैर काम करतो पण त्या गैर

कामाचें फळ भोगायला त्याच्यात हिंमत नसते. वाओीट काम करायला लागते काय ? वाओीट काम करायला लागणारी मूर्खता, बेवकूफी मनुष्याजवळ असते. परतु त्याचे फळ सहन करायला पाहिजे बळ, हिंमत, ताकद मीं जें केले त्यानें फळ मी भोगेन अशी वृत्ति असेल तर त्यानें मनुष्याची शुद्धि होओील. कर्म-फळ टळले तर वाओीट होओील म्हणून कर्म-फळ टळू नये हे च मला योग्य आहे—असें मानण्याची हिंमत मनुष्यात असायला पाहिजे. पण मनुष्य दुर्बळ आहे. वाओीट कर्म तो करून टाकतो पण फळ सहन करण्याला लागणारी हिंमत त्याच्यात नसते. म्हणून क्षमेची अपेक्षा राहते. जसा मुलगा आओी-पासून क्षमेची अपेक्षा करतो तसा च भक्त ओीश्वरापासून. कर्म मार्गा-पेक्षा भक्ति मार्गाची विशेषता ही च कीं त्यात क्षमेची आशा असते.

**फळ भोगण्याची हिंमत**

क्षमा केव्हा मागावी आणि केव्हा कर्म-फळ भोगण्याची तयारी करावी ? याची काय मर्यादा आहे ? हे सारे प्रश्न निर्माण होतात. चागले काम केलें तर त्याचें फळ मिळालें च पाहिजे असें मनुष्याला वाटतें. परतु वाओीट काम करून त्याचे फळ भोगण्याची तयारी असत नाहीं तेव्हा क्षमेची आवश्यकता कोठें उत्पन्न होते आणि त्या स्थितीत परमेश्वराजवळ क्षमायाचना करणे आपल्या विकासाच्या दृष्टीने कितपत योग्य आहे हा प्रश्न उत्पन्न होतो यावरून असें भासते की कर्माचा नियम आणि भक्तीमधील क्षमा तत्व या दोहोंत जणू सामना होऊन राहिला आहे. यातून सुटका कशी व्हायची ? भक्ति-मार्ग म्हणतो कर्माचा नियम टळायचा नाहीं. ओीश्वर ज्याला वाचवील त्याला हि कर्माचें फळ हे मिळणार च परतु ओीश्वर त्याला वाचवील याचा अर्थ येवढा च कीं

तो त्याला फळ भोगण्याची हिंमत हि देईल आपण वाईट काम केलें तर त्याचे फळ टळणार नाहीं. पण त्याचा परिणाम चित्तावर होणार नाहीं अितकी हिंमत आपल्यात आली तर बचावलों. ती हिंमत प्रार्थनेनें येते. पाप-फळ भोगावे लागो किंवा दुःख सहन करावे लागो तो सगळा हरिप्रसाद आहे असे मानून ग्रहण केला पाहिजे अशी भक्ताची भावना असते. क्षमा म्हणजे कर्म-फळातून मुक्ति; असा अर्थ नव्हे. परमेश्वर आपल्याला कर्म-फळातून वाचवीत नाहीं; कर्म-फळाच्या भयातून वाचवितो. आपण त्या फळाचा सुखाने स्वीकार करतों. आपल्यात हिंमत येते. अशाप्रकारे भक्ति मार्ग व कर्म-मार्ग याचा मिलाफ होतो.

### श्रध्देचें नांव भक्ति

आपण अेक अुदाहरण घेअू. मनुष्य आजारी पडतो. आजारी पडतो तो आपल्या वेड्यावाकड्या आचरणामुळे च. परंतु आजार आल्याबरोबर तो अगदीं हातपाय गाळतो. अशा वेळीं अिश्वर-भक्तीचा आश्रय केला तर त्याची क्षमा-शक्ति आपला बचाव करते. याचा अर्थ हा नाहीं कीं त्याचा रोग टळतो. पण होते हें कीं त्याच्या चित्ताला प्रसन्नता व शक्ति मिळते. तो असा विचार करतो कीं या आजाराच्या द्वारें माझी शुद्धि होअून राहिली आहे. त्याला त्रास होतो पण तो भासत नाहीं. अुलट त्याला असा अनुभव येतो कीं परमेश्वरापासून आपल्याला काहीं मिळून राहिलें आहे. ही जी मनुष्याची भगवत् प्रेरणेन्वर श्रध्दा तिला "भक्ति" म्हणतात.

आपल्याला काहीं वरदान मिळावें अशी अपेक्षा म्हणजे भक्ति नव्हे. तर तिचा आशय असा कीं अीश्वराच्या योजनेत आपल्या वाट्याला

सुखाचे वा दु:खाचे जे कडू गोड अनुभव येतील त्या दोन्ही हि वेळीं त्याची दया च आहे, तिनें आपलें भलें च होणार आहे, हा जो दृढ विश्वास त्याचें नाव "भक्ति"

**सर्वत्र प्रभूची कृपा**

सुदामाची गोष्ट आहे, त्याच्या पत्नीनें त्याला ' भगवान् कृष्ण तुमचा जुना मित्र आहे, त्याच्याकडे जा, तो तुमचे दारिद्र्य दूर करील ' असें म्हणून भगवंताकडे रवाना केलें. सुदामा पोह्याची पुरचुंडी बांधून भगवंताकडे गेला. भगवंतानीं ते पोहे प्रेमानें खाल्ले; त्याला आपल्या आसनावर बसविलें आणि निरोप द्यायच्या वेळीं त्याला खूप दूर पर्यंत पोचवायला गेले. सुदामा मनात म्हणतो—'प्रभूची माझ्यावर किती कृपा कीं त्यानें मला भौतिक दान दिलें नाहीं. तें तो देता तर मी मोहात पडलों असतों. पत्नीनें मला त्या च साठीं पाठविलें होतें. परंतु परमेश्वराची अपार कृपा कीं त्यानें तसें काहीं दिलें नाहीं. कुठली स्थूल वस्तु दिली नाहीं.' अशा प्रकारे विचार करीत करीत सुदामा घरीं पोचला तों त्याला सुवर्ण-नगरी दिसली. त्यात प्रत्येक वस्तु सोन्याची होती. तें पाहून सुदाम्याला आश्चर्य वाटलें. तो पत्नीला म्हणतो—'हें माझें घर दिसत नाहीं. माझें घर दुसरें च आहे. हे सारें प्रभूचें आहे. तें त्याचें त्याला च परत करूं या.' अशा प्रकारें अनासक्तीची गोष्ट तो करतो.

सुदाम्याला अिकडे काहीं मिळालें नाहीं तरी त्याच्या मनात भावना ही च कीं ही प्रभूची किती कृपा ! तिकडे त्यानें पाहिलें कीं काहीं मिळालें आहे तर तो म्हणतो कीं ही हि प्रभूची कृपा आहे. परंतु जें मिळालें तें भोगासाठीं नाहीं मिळालें; असा विचार करून तो

अनासक्त राहत. अशा प्रकारें प्रत्येक गोष्टींत भगवताची कृपा पाहिली जाते. दोन्ही बाजूंनीं परमेश्वराच्या कृपेचा च अनुभव येतो.

**नरसी आणि तुकाराम**

गुजराथचा सत नरसी मेहता असा च होता. त्याचा मुलगा मेला. मुलगा मेल्यानें बापाला आनद होत नाहीं. दुःख न झालें हें च पुष्कळ. अेखादा आत्मज्ञानी असेल तर त्याला दु ख होत नाहीं पण त्याच्याकडून हि आनदाची अपेक्षा कुणी करीत नाहीं. परतु नरसी मेहता म्हणतो मुलगा गेला बरें झालें. आसक्ति गेली. आता निर्धास्त अीश्वराची भक्ति करीन. अशा प्रकारें देव मुलाला घेअून गेला यात हि तो परमेश्वराची कृपा च पाहतो. याचें नाव "भक्ति".

महाराष्ट्राचा भक्त तुकाराम हि हे च म्हणतो.

"बाअील मेली मुक्त झाली
देवें माया सोडविली
- विठो, तुझें माझें राज्य ।

देवा, माझी पत्नी मेली हे चागलें च झालें. तूं मला आसक्तींतून सोडविलेस. आतां तुझें माझें राज्य झालें. मध्यें तिसरी ती पत्नी होती तिला तूं दूर केलेंस. आता तुझ्या माझ्यात काहीं पडदा अुरला नाहीं.

**मनाची समता**

भक्ताची वृत्ति ही अशी असते. मुलगा झाला तर म्हणतो कीं अीश्वर-प्रसादानें झाला. मुलगा मेला तर म्हणतो कीं अीश्वर-कृपेनें मेला. भक्ताची भूमिका अशी असते कीं तो सुख-दुःखात किंवा बऱ्या-वाअीट कर्मफलात अीश्वराची कृपा च पाहतो आणि म्हणतो कीं हें सारें

अीश्वरी योजनेन च होत आहे त्यामुळे भक्ताच्या मनाची समता टिकून राहते जी समता योग्याला कठिण वाटते ती भक्ताला या वृत्तीमुळे अगदीं सुलभ होअून जाते

**भक्तिमार्ग सोपा**

कोणत्या हि स्थितींत मनाची समता कायम राखणें ही साधना मोठी कठिण आहे कर्म योगात ती विशेष कठिण असते शीत अुष्ण, सुख दु ख, मान अपमान समान मानून वागणें कठिण आहे गीता म्हणत कीं कर्मे करीत असता याची चिंता करू नये सुख दु खें आदि शरीराच्या अंगानें असतात, आपण त्याहून भिन्न आहोंत परतु शरीराहून अशा रीतीनें स्वत ला अलग करणें सोपी गोष्ट नाहीं

शरीराचा अुपयोग करीत असता आपण त्याहून वेगळे आहोंत अशी मनात कल्पना करणें फार कठिण आहे मन देखील शरीराचा च अेक भाग आहे म्हणून ज्ञानमार्गाचा ही गोष्ट माणसाला कठिण जाते कर्ममार्गांत सुख दु ख आणि पाप पुण्य दोन्ही असतात त्यात कर्माचा नैसर्गिक परिणाम भोगायचा असतो फळाचा अुपभोग घेतला तर कर्माचा क्षय होतो म्हणून तटस्थ राहून भोगलें पाहिजे असें कर्म मार्ग सागतो ही गोष्ट कठिण असते परतु भक्तिमार्गात जें काय सुख दु ख लाभलें तो हरि प्रसाद समजला जातो भक्तिमार्गांत तटस्थता साधण्याची अशी युक्ति असल्यामुळे भक्तिमार्ग सोपा म्हटला गेला आहे प्रेममार्ग हि काहीं लोकाना कठिण वाटण्याचा सभव आहे परतु साधारणपणें भक्तिमार्ग सर्वांना सोपा वाटण्यासारखा आहे

**काहींना ज्ञानमार्ग सोपा वाटतो**

काहीं लोकाना ज्ञानमार्ग च सोपा वाटतो हें हि खरें आहे

ज्यांनी लहानपणीं प्रेम अनुभवलें नाहीं, ज्याचे माता पिता लहानपणीं च वारल्यामुळे दुसऱ्याकडून त्याचें पालन पोषण झालें आणि थोडी फार अुपेक्षा हि झाली, अशा लोकाना प्रेमापेक्षा चिंतन आणि ध्यान अधिक सुलभ वाटतें. परंतु ही गोष्ट काहीं खास व्यक्तींपुरती च आहे.

सर्व साधारण लोकाना भक्तिमार्ग च सोपा आहे. भक्तिमार्गाची खुबी ही आहे कीं त्यात माणूस अेक-दुसऱ्याला स्थूल दृष्टीने पाहत नाहीं. कर्ममार्गात पापपुण्याचे फळ टळत नाहीं काहीं माणसाची योग्यता जास्त तर काहीं माणसाची कमी हा विवेक कर्म मार्गात राहतो च. वेगवेगळ्या व्यक्तींमध्ये काम करीत असता चित्तावर परिणाम होअू न देणें आणि विवेकपूर्वक तटस्थ राहणें कठिण आहे.

**ज्ञानाची साधना**

ज्ञानमार्ग म्हणतो कीं जें होअून राहिलेलें दिसते ते मिथ्या च आहे. जें होत आहे ते होत नाहीं असे मानणें मनुष्याला अर्थात च कठिण आहे कोणाची हि निंदा किंवा स्तुति करायची नाहीं, कारण तो जें काम करतो ते मिथ्या आहे, अेक स्वप्न आहे असें ज्ञानमार्ग म्हणतो. स्वप्नात कोणी राजा किंवा भिकारी झाला तर त्याबद्दलचें सुख दुःख मिथ्या असतें. त्याप्रमाणे या जगात जें काहीं चाललें आहे ते सर्व मिथ्या आहे अशी कल्पना केल्यानें मनुष्याचा बचाव होतो. माझ्या बाबतींत बोलायचें झालें तर ही कल्पना मला फार च पटली आहे. जें काय होत आहे तो सर्व भ्रम आहे, भास आहे असें चिंतना-मुळे मला वाटते. परतु ही गोष्ट प्रत्येकाला साधत नाहीं. समोर अेवढें संसार-जाल पसरलें असून ते काहीं च नाहीं असें मानणे कठिण आहे. ज्ञानयोगातील युक्ति मात्र नामी आहे. समोर असलेलें सर्व मिथ्या

म्हटलें कीं चित्तावर कांहीं परिणाम होण्याचे कारण च नाहीं. परंतु असे म्हणणे मनुष्याला फार च जड आहे.

**कर्मयोगांतील अडचणी**

कर्म-मार्गात मिथ्यात्वाला स्थान नाहीं जें काय चाललें आहे ते मनुष्याच्या अनेक कर्मांचें फळ आहे, म्हणून तटस्थ रहावें असे कर्म-मार्ग सागतो. केवळ अेकाच्या प्रयत्नानें काहीं कार्य होत नाहीं. साऱ्या समाजाच्या प्रयत्नाने ते होते. जमिनीची मालकी मानणे चूक आहे असे म्हटलें जाते कारण जमीन सामाजिक वस्तु आहे. माणसाला जमीन किंवा संपत्ति जी काय मिळते ती अेकट्याच्या प्रयत्नानें मिळत नसून साऱ्या समाजाच्या मदतीनें मिळते, असे म्हटलें जातें. मनुष्य जें काहीं करतो ते त्याच्या शिक्षणाचे, सगतीचे, आणि परिस्थितीचे फळ आहे, तो अेकटा त्या कर्माबाबत जबाबदार नाहीं, असे कर्ममार्गात मानलें जाते. अशा रीतीने मनुष्याचें कर्म परीस्थितिजन्य मानल्यामुळे ते अपरिहार्य आहे असे मानावे लागते. कर्ममार्गाची ही युक्ति जर साधली तर वेगवेगळ्या व्यक्तींमध्ये काम करीत असता हि समत्व साधणें शक्य आहे. परतु तसे तें साधत नाहीं. कारण आपण स्वत ला त्या कर्मांशी जोडून घेतों.

समुद्राच्या काठावर अुभ्या राहणाऱ्या माणसाला समुद्रावर पर्वता-सारख्या अुसळणाऱ्या प्रचंड लाटा पाहून मौज वाटते. कारण तो किनाऱ्यावर अुभा आहे. परतु जो समुद्रात पडला आहे आणि त्या लाटामध्यें गटगळ्या खात आहे त्याला लाटाची आणि समुद्राची मौज कशी वाटणार ? त्या प्रमाणे जीवनात चाललेल्या खेळात जो स्वत सामील आहे त्याला आपण त्या खेळाहून अलग आहोंत अशी कल्पना

करून घेणे कठिण आहे. परतु तशी कल्पना जर करता आली तर जरूर समत्व साध्य होईल. परतु सामान्य माणसाला तें कठिण असल्यामुळे कर्म-योग कठिण म्हटला आहे.

**सर्व हरीची लीला**

भक्तिमार्गाची गोष्ट वेगळी आहे. समोर जें काय चाललें आहे ती प्रभूची लीला आहे असे मानण्याची सवय भक्तिमार्गात होते. ज्ञान-मार्गी म्हणतात कीं हें सारें स्वप्न आहे. कर्म मार्गी म्हणतात कीं हा परिस्थितीचा परिणाम आहे. परतु भक्तिमार्गी म्हणतात कीं हा प्रभूचा खेळ आहे, नाटक आहे. नाटकात खेळाचाला विश्वामित्राची भूमिका मिळाली तर त्याच्या सारखा त्रास सोसावा लागेल आणि हरिश्चन्द्राची भूमिका मिळाली तर त्याच्या सारखें सत्यवादी बनावें लागेल. तुलसी-दासजींनीं म्हटलें आहे कीं बुद्धिबळात हत्ती घोडे ऊंट असतात परतु ते लाकडाचे असतात प्रत्येकाची चाल त्या खेळात वेगवेगळी असली तरी शेवटीं अेकूण तो सर्व खेळ च. त्या प्रमाणे भक्तिमार्गात परमेश्वराचा हा सर्व खेळ आहे अशी भावना केली जाते ओश्वर च अनेक रूपें घेअून खेळ करीत आहे.

पण तसे पाहिलें तर हा सारा खेळ मानणे हि अेक प्रकारे कठिण आहे. गीतेच्या बाराव्या अध्यायात म्हटलें आहे कीं निर्गुणात क्लेश अधिक आणि सगुणात क्लेश कमी. त्यामुळें निर्गुण-मार्गापेक्षा सगुण-मार्ग अधिक सोपा. परतु आपल्या भाष्यात शकराचार्यांनीं लिहिलें आहे कीं निर्गुणात "क्लेश अधिकतर" म्हणजे सगुणात हि क्लेश आहेत परतु निर्गुणात ते त्याहून अधिक आहेत असा भावार्थ. म्हणून भक्तिमार्ग सोपा म्हटला तरी त्यात काहीं करावें च लागत नाहीं, जीवन

जसें चाललें आहे तसें चालू द्यायचें असा समज करून घेणें चूक आहे. भक्तिमार्गात अत्यधिक त्याग करावा लागतो. परंतु त्या त्यागाची जाणीव मनुष्याला होत नाहीं ही भक्तिमार्गाची खुबी आहे.

**क्लेशांत हि आनंद**

आअी आपल्या मुलासाठीं किती तरी कष्ट करते. अेखाद्या संस्थेचा सेक्रेटरी आपल्या कार्याचा अहवाल लिहायला बसला तर भला मोठा रिपोर्ट लिहून काढील. परंतु आअीला वर्षभरांत मुलासाठीं केलेल्या कामाचा रिपोर्ट लिहायला सांगा बरं ! ती म्हणेल मी काय काम करतें ? रोज सकाळपासून रात्रींपर्यंत संगोपनाचें काम चालतें त्याचा रिपोर्ट तो काय द्यायचा ? मुलाची सेवा करण्यांत आअीला कांहीं त्रास होत नाहीं असा याचा अर्थ नाहीं. परंतु त्या क्लेशांमुळें तिला त्रास न वाटतां प्रेमाच्या आनंदाची अनुभूति येते. मुलें खेळतात तर अगदीं घामाघूम होतात. परंतु त्या खेळाचा त्याना श्रम वाटत नाहीं. अितर काम करवून घेतांना घाम आला तर त्यांना श्रम वाटतील. हा च भक्तिमार्गातील फरक. भक्तिमार्गात क्लेश नाहींत असें नाहीं परंतु ते क्लेश च आनंद रूप बनतात. कडू मेथ्याचा लाडू खाण्याची ज्याला संवय झाली-त्याला त्या लाडूंत हि गोडी वाटूं लागते. आमच्या आश्रमांत अेक मुलगा होता त्याला कडूलिंब गोड लागत असे. तो हि अेक स्वाद आहे. यांत संवयीचा मुद्दा आहे. कष्ट हि आनंदरूप वाटणे ही भक्तिमार्गाची खुबी.

**भक्तीचें सारसर्वस्व**

हिंदुस्थानांतील भक्तिमार्ग प्राथमिक स्वरूपाचा आहे. लोक सकाळ-संध्याकाळ नामस्मरण करतात. जेवण्याच्या वेळीं हि देवाचे

नाव घेऊन धावतात. यानें सर्वसाधारण श्रद्धा स्थिर झाली. याच्या आधारावर आता पुढें गेलें पाहिजे. भक्तिमार्गाचे खरें मर्म यात आहे कीं दिवसभरात जो कोणीं भेटला तो हरिरूप च वाटला पाहिजे. माणूस भेटला तर मनुष्य-रूपातील हरि, कुत्रा भेटला तर कुत्र्याच्या रूपातील हरि, आणि गाढव भेटलें तर गाढवाच्या रूपातील हरि.

या ठिकाणीं मीं गाढवाचा अुल्लेख केला हे पाहून तुम्हाला आश्चर्य वाटेल. परंतु या गोष्टीचा मीं अभ्यास केला आहे. त्यावेळीं मीं गणिताचा अभ्यास करीत असे. अभ्यासाच्या वेळीं गाढवाचें ओरडणें कानावर आलें कीं मला त्रास होअी. अेक दिवस माझ्या मनात आलें कीं या आवाजाचा त्रास का वाटावा ? अेका गाढवाच्या ओरडण्यानें दुसऱ्या गाढवाला आनंद होत असेल आणि तो प्रेमानें याच्या जवळ जात असेल. मग आपल्याला च त्याचा आवाज वाअीट का वाटावा ! तो आवाज गोड मानण्याचा मी अभ्यास करू लागलों. यावेळीं अेक घटना घडली आणि माझ्या त्या अभ्यासात मला विशेष बळ लाभलें. त्या वेळीं आम्हीं बडोद्याला होतों. तिथें अेक संगीत संमेलन चालू होतें. आम्ही त्या संमेलनाला गेलों. लोक अनेक प्रकारचे आवाज काढीत ताना घेत होते. मला तें सर्व गायन रद्दी वाटलें. गायक मात्र आपल्या कलेची पराकाष्ठा दाखवीत होते. परंतु मला आनंद वाटेना. मीं मनात म्हटलें कीं याला "संगीत" म्हणायचे तर गाढवाच्या आवाजाला हि "संगीत" च म्हटलें पाहिजे. त्यानंतर जेव्हां जेव्हा मी गाढवाचें ओरडणें अैकों तेव्हा तेव्हा गणित सोडून तो आवाज गोड मानण्याचा अभ्यास करू लागलों.

**गाढवाविषयींचा आदर**

अनेक दिवसांच्या अभ्यासानंतर गाढवाच्या ओरडण्याची मला अितकी संवय होअून गेली कीं त्या ओरडण्यांत मला करुणा भासू लागली. मीं मनांत म्हटलें कीं बिचाऱ्याच्या पाठीवर किती ओझें लादलें जातें आणि त्या मानानें किती कमी त्याला खायला दिलें जातें !! बाअिबलमधें मीं वाचलें होतें कीं येशू खिस्ताची स्वारी खेचरावर निघे. खेचर म्हणजे गाढवाचा च भाअू. आपल्या अिथें गाढव अशुभ मानतात. परंतु बाअिबलमधें त्याला येशूचें वाहन केलें आहे. नंतर माझ्या वाचण्यांत आलें कीं पॅलेस्टाअीनमधें केवळ खेचराना च नव्हे पण गाढवांना हि चांगल्या स्थितींत ठेवतात. त्यांच्यांत हि घोड्याचे गुण असतात. अशा रीतीनें गाढवाबद्दलचा माझा आदर वाढला.

अेकदां बापू म्हणाले कीं आपण मोठे विद्वान बनून आश्रमात येतो. परंतु आपण गद्धा-मजुरी केली पाहिजे. त्यांच्या म्हणण्याचा अर्थ होता कीं आपण श्रम केले पाहिजेत, विद्वत्तेचा गर्व असता कामा नये. गद्धा-मजुरी हा त्यांचा शब्द मला फार आवडला. आतां स्थिति अशी झाली आहे कीं गाढव ओरडलें कीं मला बरें वाटतें. मी त्याला अितर अनेक रागांप्रमाणें "गद्धा-राग" समजून प्रेमानें तो अैकतों.

**सर्वत्र हरि-दर्शन**

आपल्या समोर येणाऱ्या सर्वांना हरिरूप पहायचें हा अभ्यासाचा विषय आहे. भक्तिमार्गाचा हा च विषय आहे. भजन-पूजन अित्यादि केवळ आरंभमात्र आहे. ती प्राथमिक शाळा झाली. भक्तिमार्गाचा खरा अभ्यासक्रम सर्वत्र हरिरूप पाहणें हा आहे. भागवतांत म्हटलें आहे कीं भक्ताला नदी, पर्वत, पाणी सर्व भगवंताचे देह वाटतात. म्हणून प्राणि-

मात्र पाहून आपल्याला आनद झाला पाहिजे आणि आपण त्याला प्रणाम केला पाहिजे ही च भागवतधर्माची मुख्य प्रक्रिया

सोन्याचे वेगवेगळे आकार असतात परतु असते तें सोने च वाकडे तिकडे सोनें पाहून मुलगा ते फेकून देतो परतु ज्याला सोन्याची परीक्षा आहे, तो म्हणतो कीं वाकडे असलें तरी हें सोनें आहे अशा रीतीनें ओश्वरतत्त्वाचे ग्रहण करण्याचा अभ्यास झाला तर ओश्वराचीं वेगवेगळीं रूपें दिसू लागती

ज्ञानमार्गांत जग मिथ्या आहे असें मानण्याचा अभ्यास केला जातो भक्तिमार्गांत जग हें ओश्वराचे च रूप आहे असें पाहण्याचा अभ्यास केला जातो. म्हणजे ज्ञानमार्ग अभावात्मक आहे आणि भक्तिमार्ग भावात्मक आहे. अभावावर किंवा शून्यावर आरूढ होणे कठिण आहे परतु भावावर किंवा पूर्णावर आरूढ होणे त्या मानानें सोपें आहे हें पूर्ण आणि तें पूर्ण—अेकूण सर्व च पूर्ण हें मानणे सोपें परतु हें शून्य आणि ते शून्य—अेकूण सर्व शून्य हें मानणे कठिण आहे

परतु यात हि अेक गोष्ट सोपी आहे पूर्णाचे चिन्ह म्हणून आपण शून्याचा अुपयोग करतों म्हणजे पूर्ण आणि शून्य याचें समान प्रतीक झालें. दोन्ही मार्ग अेका च मुक्कामावर पोचविणारे झाले असा याचा अर्थ होतो अेक मार्ग पॉझिटिव्ह आहे तर दुसरा नेगेटिव्ह. अेकाला अेक साधेल तर दुसऱ्याला दुसरा साधेल. परतु सर्वसाधारणपणें ज्ञानमार्गापेक्षा भक्तिमार्ग सोपा आहे असें म्हणता येअील.

**कर्म ज्ञान भक्ति**

कर्ममार्ग म्हणतो कीं जगात चाललेलें सर्व परिस्थितिजन्य आहे

म्हणजे कर्ममार्गी प्रकृतिपरायण बनतो. ज्ञानमार्गी म्हणतो कीं शरीर मिथ्या आहे. मरणारें आहे आणि आत्मा त्याहून भिन्न आहे, अशा रीतीनें तो आत्मपरायण बनतो. भक्तिमार्गी प्रभुपरायण असतात सर्व काहीं ते अीश्वरावर सोडून देतात. काहीं लोक म्हणतात कीं आम्ही अीश्वर मानीत नाहीं. ठीक आहे. तुम्ही त्याला मानू नका पण अीश्वर तुम्हाला मानतो मुलगा आअीची परवा करीत नसला तरी आअी मुलाची परवा करीत आहे तोपर्यंत भिण्याचें कारण नाहीं. म्हणून कर्म-मार्गात किंवा ज्ञानमार्गात बचाव असला तरी अीश्वराला सोडून मात्र बचाव होणें कठिण आहे असें मला वाटते

रसूलपूर, मेदेनीपूर (बंगाल)
२३-१-५५

---

## (८)
## अनिंदा आणि अनाग्रह

**कर्म आणि गुण**

मनुष्याची ओळख नाम-रूपावरून होत नाहीं ती त्याच्या कर्मावरून आणि गुणावरून होते. आतापर्यंत तुम्ही अितर हि कामें केलीं आहेत तीं कोणतीं तें मला माहीत नाहीं, परंतु आता तुम्ही भूदानचें काम कराल म्हणून मी तुम्हाला भूदानचे कार्यकर्ते मानतों आता राहिला गुण पण गुण बदलत राहतात कठोर मनुष्य हि दयाळू झालेला आपण पाहतो कुणी अेखादा पूर्वी भित्रा असेल तर तो

पुढें निर्भय होतो असे हे गुण परिवर्तनशील आहेत तेव्हा मी आशा करतों कीं रोज जीं स्थितप्रज्ञाचीं लक्षणें म्हणतों त्या गुणाचें तुम्ही अनुकरण कराल हळू हळू ते गुण हि आपल्यात येतील आणि स्थितप्रज्ञाची जी ओळख आहे ती च आपल्या गुणाची ओळख होईल तसें झालें तर आपलें काम च झालें परतु तितके सगळे गुण आपल्यात अुतरलें नाहींत आणि केवळ नुसते बुनियादी गुण च अुतरले तरी आपली सामुहिक शक्ति वाढेल त्या शक्तींत मोठा गुण आहे

**पाठीमागें निंदा नको**

दुसऱ्याच्या दोषांची चर्चा त्याच्या पाठीमागें दुसऱ्यासमोर करू नये ही अेक सामाजिक बात्र आहे, त्यामुळे निनाकारण होणारे गैर-समज टळतात मनुष्याच्या पश्चात् त्याच्या गुणाचे च अुच्चारण व्हावें आणि दोषाचे अुच्चारण करायचे च झाल्यास ते अेकातात जाअून करावें अथवा ज्यांच्या समोर तसें केलेलें चालेल अशा त्या व्यक्तीच्या दोन चार मित्रासमोर त्याच्या दोषाचा चर्चा होअू शकते हा गुण सार्वजनिक कार्यकर्त्यासाठीं आवश्यक आहे, ही गोष्ट ध्यानात ठेवावी

मनुष्य दुसऱ्याच्या दोषाकडे पाहतो तेव्हा त्याला आपल्यापेक्षा कितीतरी पटीनें अधिक दोष दुसऱ्यात दिसतात, व आपले दोष त्याला कितीतरी कमी दिसतात आणि दुसऱ्याचे गुण पाहतो तेव्हा त्याला आपल्यापेक्षा कितीतरी पटीनें कमी गुण त्याच्यात दिसतात, व आपल्या स्वत ला तो कितीतरी पट अधिक समजतो हें स्वाभाविक आहे त्यात खास मनुष्याचा दोष नाहीं परतु असें असलें तरी समोरच्या माणसावर विश्वास ठेवला पाहिजे परस्पर विश्वासाच्या अभावीं जीवन निरर्थक होतें

मनुष्य दुसऱ्याचे दोष धरून घेतो. आणि स्वत च्या गुणांना अधिक लेखतो. कारण स्वत मधील गुणाकरता फार मोठी तपस्या आपण केली याचें त्याला भान असते पण दुसऱ्यामधील गुणाच्या-बाबतींत त्याला तसा परिचय नसल्याने त्याला स्वाभाविकपणें त्याच्यात दोष जास्त दिसतात आणि गुण कमी दिसतात म्हणून दुसऱ्याच्या थोड्या गुणाला हि जास्त समजलें पाहिजे. नकाशात स्केल म्हणजे प्रमाण असतें ना, अिंचास चार मैल, तसें प्रत्यक्ष नकाशात अिंच भर च अंतर असतें पण आपण तें चार मैल समजतों, तसें दुसऱ्याचे गुण जेवढे दिसतात त्याच्या ते दसपट आहेत असें समजावें आणि आपले दोष दिसतात त्याच्या दसपट करून घ्यावे. अशा प्रकारें आपण पाहू तर योग्य प्रमाण (स्केल) होअून यथार्थ दर्शन होईल

**अनिंदा व्रत**

अहिंसेमध्यें या अनिंदा व्रताचा आपल्याला साभाळ करायचा आहे कार्यकर्त्यांना अनिंदा अेक व्रत वाटलें पाहिजे अहिंसा असून शिवाय या व्रताची गरज आहे दोहींत गुण आहेत अेखाद्याविषयीं काहीं चागलें अैकलें तर ताबडतोब ते मान्य करायला तयार झालें पाहिजे मनाला तसें वळण च पाहिजे गुणाच्या बाबतींत अेखादी गैर गोष्ट अैकली तर ती मानायला मन तयार नाहीं असें व्हायला पाहिजे कोणाच्या बाबतींत अेखादी गैर गोष्ट अैकली तर प्रथम ती चूक आहे असा च भाव मनात यायला पाहिजे आणि जर ती अनुभवानें खरी निघाली तर लाचार होअून ती मानली पाहिजे थोडक्यात दुसऱ्याचे दोष मनावर घ्यायला तयार नाहीं आणि त्याच्या गुणाचें चीज करायला सदैव तयार आहोंत असें व्हायला पाहिजे

**निंदेवर विश्वास नसावा**

मला आठवतें शाळेंत अिंग्रजीच्या वर्गांत 'व्हेरी मच' आणि 'टू' या शब्दांचा अुपयोग शिकवीत होते. "धी न्यूज अीज टू गुड टु बी टू" 'अितकी चांगली गोष्ट आहे कीं ती खरी असूं शकत नाहीं.' आम्हांला तर मोठें विचित्र च वाटलें हें. आम्ही गुरुजींना विचारलें याचा काय अर्थ तो आम्हांला समजाअून सांगा. गुरुजी म्हणाले याचा असा च अर्थ आहे. मग परीक्षेंत तो च प्रश्न आला "टू" चा अुपयोग करा. "धी न्यूज अीज टू गुड टु बी फॉल्स" 'अितकी चांगली बातमी आहे कीं ती चूक असूं शकत नाहीं.' असें मीं लिहिलें. अेखादी गोष्ट जर चांगली अैकली तर तीवर आपण विश्वास ठेवीत नाहीं. जगांत असें च आहे. अेखाद्याची चांगली गोष्ट अैकली तर लगे च त्यावर विश्वास बसत नाहीं. परंतु निंदेवर मात्र विश्वास बसतो. त्यासाठीं कधीं च पुराव्याची गरज भासत नाहीं. व्हायला याच्या अुलट पाहिजे. निंदा अैकली तर तिच्यावर विश्वास च बसतां कामा नाहीं.

**तर्कशास्त्रीय विचार**

भक्ति-मार्गांत आणि सेवा-मार्गांत कुणाला हि अविश्वासाच्या नजरेनें पाहणें मोठी बाधक वस्तु आहे. स्वाभाविकपणें चांगली गोष्ट खरी च असली पाहिजे. या विषयीं तर्कशास्त्रीय विचार आहे तो तुमच्यासमोर ठेवतो. "स्वतःप्रमाणम् परतः प्रमाणम्" हे शास्त्रीय शब्द आहेत. हा विचार यासाठीं तुमच्यासमोर ठेवतों कीं कोणत्या हि बाबतींत मुळांत जाअून विचार करण्याची संवय आपल्याला पडावी.

बौद्ध, न्यायसूत्र आणि वेदांत या तिघांचे विचार सांगतों. बुद्धानें मिथ्यात्वाला स्वतः प्रमाण मानलें आणि सत्याला परतःप्रमाण मानलें

आहे म्हणजे अेखादी गोष्ट खोटी आहे म्हटलें तर ते सिद्ध करण्या-साठीं पुराव्याची गरज नाहीं. आणि खरी आहे म्हटलें तर त्याला पुरावा पाहिजे सृष्टि मिथ्या आहे, यासाठीं पुराव्याची गरज नाहीं परंतु ती सत्य आहे म्हटलें तर ते सिद्ध केलें पाहिजे त्यासाठीं पुरावा दिला पाहिजे.

कायद्यात कसें असते ? तिथें आरोपीवर पुरावा दाखल करण्याची जबाबदारी असते ज्याच्यावर आरोप असेल त्याच्यावर ही जबाबदारी असते हें रास्त च आहे. वेदान्त सुद्धा हें च सांगतो तो म्हणतो सत्या-साठीं पुरावा नको, पण खोट्यासाठीं पुरावा पाहिजे. बौद्ध विचार अुलटें सांगतो तो म्हणतो मिथ्यात्व सिद्ध करायला पुरावा नको, सत्य सिद्ध करायला पुरावा पाहिजे.

न्यायशास्त्र म्हणते, सत्य व मिथ्या या दोन्हीसाठीं पुरावा पाहिजे सत्य असलें तरी पुरावा द्या, मिथ्या असलें तरी पुरावा द्या वेद म्हणतो, वेद प्रमाण आहे कारण तो सत्य आहे, आणि हल्लींचा कायदा सुद्धा वेदान्तावर अुभा आहे म्हणजे मनुष्या-मनुष्यात संशय असणे चूक आहे. संशय असेल तर समाज चालणें कठिण होअील, म्हणून सहज विश्वास असला पाहिजे, ही साधी मानवता आहे. जर अेवढें हि झालें नाहीं तर मानवता टिकणार नाहीं

म्हणून तुम्हाला अेक गोष्ट ही सांगीतली कीं तुम्ही अनिंदा व्रत घ्या आणि दुसरी ही सांगीतली कीं अेखाद्याच्या बाबतींत चांगली गोष्ट कानावर आली तर लगे च ती खुशीनें स्वीकारा तिच्यावर विश्वास ठेवा पुराव्यानें च सिद्ध झालें कीं वाअीट गोष्ट झाली तर लाचारीनें

ती माना. पुरावा नसला तरी कानावर आलेली चागली गोष्ट चागली च आहे असे समजा. हे कार्यकर्त्यांसाठी पथ्य आहे यानें पुष्कळ लाभ होईल.

### वाओट गोष्टी अैकूं नका

अनेक वर्षांपासून जे लोक माझ्याबरोबर काम करीत आहेत त्याच्या पैकीं हि अेखादा येअून दुसऱ्याबद्दल वाओट गोष्टी सागतो, तेव्हा त्याच्या त्या गोष्टींना मी 'डेड लेटर बॉक्स' दाखवितो. त्याचें अैकत च नाहीं 'डेड लेटर बॉक्स' मध्यें गेलेलें पत्र तिथें च पडलें राहतें. परतु जिथें स्पष्ट पुरावा असेल तिथें मी ती गोष्ट अैकतो. तीस-तीस वर्षांपासून जे लोक माझ्याबरोबर राहत आहेत तेथें हि असा अनुभव येतो कीं त्याचे आपापसात पटत नाहीं त्याचा अेकमेकावर विश्वास नसतो. आपण जर अेकमेकावर अविश्वास राखू तर कसलें च काम होणार नाहीं म्हणून कुणाच्या बाबतींत जर मनात शका असेल तर त्याला अेकातात ती शका विचारली पाहिजे. ही गोष्ट सस्था-समाजाच्या कामात विशेष ध्यानात ठेवण्यासारखी आहे

### भूदानांत अनेक हेतु

भूदान-यज्ञात सर्व प्रकारचे लोक काम करतील कुणी भूदान प्राप्त करणें म्हणजे वोट प्राप्त करणें आहे असे मानील. कुणी म्हणेल हें काम मीं केलें तर माझ्या पार्टीला मदत होओल. कुणी असा विचार करील, मी या कामात पडलों तर सामाजिक क्राति होओल तर कुणाला असे वाटेल कीं हें काम करण्यानें आपली प्रतिष्ठा वाढेल. अेखाद्याला वाटेल आपल्याला पुढें काहीं लाभ होओल तर अेखाद्याला वाटेल यानें गावाला लाभ होओल, प्राताला लाभ होओल अशा प्रकारें लोकाचे अनेक

हेतु असतील. आणि हे सारे विहित च आहेत, निषिद्ध नाहींत. कारण अेखाद्याला प्रतिष्ठा पाहिजे असेल तर त्याला ती अवश्य मिळायला पाहिजे. आपण त्याला प्रतिष्ठा द्यायला पाहिजे. ते विहित आहे. अेखादा आपली पार्टी मजबूत करू अिच्छितो, ते फार चागलें आहे. या कार्याने त्याची पार्टी मजबूत झाली तर चागलें च आहे. परतु येवढी च कामना नसते. लोक अिच्छितात कीं आपली पार्टी मजबूत व्हावी आणि समोरच्या प्रतिपक्षाची पार्टी ढिळढिळी व्हावी परतु अशानें देश कमजोर होतो हे त्याच्या लक्षात च येत नाहीं. जर दोन्ही पक्षाचें बळ वाढलें तर देश हि बलवान होओील ही गोष्ट त्याच्या ध्यानात येत नाही आणि आपापल्या पार्टीचें घोडे दामटण्याचा च ते विचार करतात. दुसऱ्याची ताकत कमी होण्याने आपला लाभ होओील, हा विचार चूक आहे. अेखाद्याच्या पार्टीला या कामामुळे लाभ होत असेल तर आमचा त्याला काहीं आक्षेप नाहीं. ही भावना जर आमच्या मनात ठसली तर जे वेगवेगळे लोक भूदान कार्यात येतात ते ठीक च आहे. कारण त्याचे हेतु विहित च आहेत. जसा ज्याचा हेतु तसें त्याला फळ मिळेल.

गीतेंत भगवतानीं ही गोष्ट सागितली आहे. — 'जो ज्या हेतूनें माझी सेवा करील, भक्ति करील, तसें त्याला फळ मिळेल.' अल्प बुद्धि राखली तर अल्प फळ मिळेल. मोठी बुद्धि राखली तर मोठें फळ मिळेल. त्या च प्रमाणें ज्या बुद्धीनें जो काम करील तसें त्याला फळ मिळेल. आपल्याला हि या कामात ही च दृष्टि ठेवली पाहिजे कुणी म्हणतो कीं अमुक मनुष्य अिलेक्शनमधें भाग घेत असतो. तर मी त्याला विचारतों कीं अिलेक्शनमधें भाग घेणें म्हणजे का व्यभिचार

आहे, का चोरी ? का खून आहे, का डाका ? जर कोणी अिलेक्शन-मध्ये भाग घेअू अिच्छील तर आपल्याला त्यावर काहीं बोलायला नको. तो काहीं वाअीट गोष्ट करीत नाहीं. अगर अेकाद्याचा निषिद्ध हेतु असेल तर त्याला मार बसेल. परंतु वेगवेगळे अुद्देश राखत असून हि ते जर विहित असले तर ठीक च आहे. तो काम करू शकतो हे सर्वांनीं समजायला पाहिजे. आपलें काम तर समुद्रासारखें आहे. त्याचें रूप कशाने बदलणारे नाहीं जी नदी याला मिळेल, ती समुद्र रूप होअील, तिचें पाणी खारें होअील. चागल्या अुद्देशाने जर कोणी काम करील आणि त्याचा अुद्देश जर अुपयुक्त असेल तर, त्याचें काम यशस्वी होअील. म्हणून ते सर्व यात येअू शकतात असा विश्वास कार्यकर्त्यांना असला पाहिजे. त्यामुळे आमची शुद्ध-शक्ति वाढेल. कोणत्या हि अुद्देशाने कोणी येअीना, आमच्या सहवासात येता च त्याचा अुद्देश अुन्नत होअील, ही श्रद्धा आम्ही राखली पाहिजे.

### निराग्रह वृत्ति

कार्यकर्त्यांत लहान-सहान गोष्टींत मतभेद होत असतात. प्रत्येकाला वाटतें कीं, आपल्या मतानें वागल्यास फायदा होअील, दुसऱ्याच्या मतानें वागल्यास फायदा होणार नाहीं. परंतु समाजात रहावयाचें म्हटलें म्हणजे वातावरण अनुकूल च हवें. सर्वांच्या मतानें च निर्णय व्हावयास पाहिजे अेक सुध्दा विरुध्द नको. अेखादी गोष्ट जर नीति, न्याय आणि सत्य याच्या विरुध्द असेल, तर च विरोध केला पाहिजे, नाहीं तर अेकमतानें निर्णय घ्यावयास हवा. जेथें सिध्दांताचा मतभेद आहे तेथें स्वत चा आग्रह राखायला हरकत नाहीं परंतु, सामान्य

बाबतींत आग्रह राखणें चूक आहे. आपण पाहतों कीं, जो मनुष्य वारंवार पैसे खर्च करतो, अखेर त्याचें सारें भांडवल खर्च होतें. तेव्हां आग्रह-शक्ति सुध्दां मनुष्याचें भांडवल च आहे. जर ती क्षुल्लक बाबतींत खर्च होईल, तर जेव्हां सत्याग्रहाचें काम पडेल, खंबीर राहण्याची वेळ येईल तेव्हां ती शक्ति पुरी पडणार नाहीं. म्हणून लहान-सहान गोष्टींत आपण आग्रह-शक्ति खर्च करणार नाहीं, तर आपल्याला भरपूर शक्ति राहील. मला माहीत आहे कीं असे लोक मोठमोठ्या प्रसंगीं हार खातात. म्हणून मीं हा दृष्टांत दिला आहे कीं, आग्रह-शक्ति आम्ही खर्च करूं नये. सामाजिक कार्य करायचें तर निराग्रह वृत्ति राखली पाहिजे.

नेकुडसेनी, मेदिनीपुर (बंगाल)
२४-१-'५५

---

(९)

## सत्य : आध्यात्मिक साधनेची पहिली अट

आज आशादेवींनीं असें सुचविलें कीं आध्यात्मिक साधनेचा आरंभ कोठून व्हावा, तिच्यांत प्राथमिक महत्त्व कोणत्या गोष्टीला द्यावें ह्या बद्दल मीं कांहीं सांगावें. ह्या प्रश्नाचें उत्तर निरनिराळ्या प्रकारानी देता येईल. सर्वांसाठीं अेक उत्तर असूं शकत नाहीं. आणि सर्वांसाठीं अेक अुत्तर कोणचें होअू शकतें ते मी मागाहून सांगेन.

### आत्म परीक्षण

आरंभीं मी हें सांगू अिच्छितो कीं प्रत्येकाने आपल्या मनाचे परीक्षण केलें पाहिजे. आमच्या ठिकाणीं कोणच्या गुणाची न्यूनता आहे व कोणच्या दोषाचा प्रभाव आमच्या मनावर अधिक आहे, हें आधीं आम्हीं पाहिलें पाहिजे. शरीराच्या प्रकृतीची आधीं चिकित्सा करण्यात येते व नंतर शरीरांत कोणच्या गोष्टीची अुणीव आहे किंवा कोणचा रोग आहे ह्याचा निर्णय करण्यात येतो व मग त्यासाठीं काय करायचें हे ठरते. हें काम वैद्य करीत असतो. त्या च प्रकारें मनुष्याने आपल्या मनातले दोष व अुणीवा काय आहेत हें पाहिलें पाहिजे ह्या कामीं दुसऱ्या मित्रांची मदत घेतली जाअू शकते पण निर्णय तर ज्याचा त्यानें केला पाहिजे जी न्यूनता आटळेल तिचे निवारण हें साधनेचे पहिलें पाअूल.

समजा आपल्या ठिकाणीं अहंकार आटळला तर त्याच्या त्यागासाठीं जी साधना आवश्यक असेल ती केली पाहिजे आपल्या ठिकाणीं क्रोधाची मात्रा अधिक दिसल्यास दया, क्षमा अित्यादि गुण वापरण्याचे अधिक प्रसंग कसे येतील त्याचा प्रयत्न झाला पाहिजे व ह्या गुणाचे चिंतन झालें पाहिजे. म्हणून सर्वांसाठीं ह्या प्रश्नाचे अेक अुत्तर असू शकत नाहीं पण काहीं दोष सर्वसाधारण असतात, त्याच्या निवारणाचा अेक सामान्य धर्म बनतो व त्यावद्दल सर्वसामान्य अुपदेश दिला जाअू शकतो पण ज्या भक्ताचें जें लक्षण असेल, त्याला अनुसरून त्याची साधना चालते. आपल्याला पटणाऱ्या अुपासनेचा स्वीकार तो करतो. मीं 'अुपासना' शब्दाचा प्रयोग केला आहे. अुपासनेंत गुणाचा विकास येअून जातो. आमच्यात क्रोध असेल तर आम्हीं दया गुणाच्या विकासाचा प्रयत्न केला पाहिजे.

## त्रिविध कार्यक्रम

हा कार्यक्रम त्रिविध आहे. (१) आमच्यांत क्रोध अधिक असेल तर दयाळु स्वरूपात आम्ही अीश्वराची अुपासना केली पाहिजे. अुदाहरणार्थ अिस्लाम धर्मात देवाला 'रहीम' व 'रहमान' म्हटलें आहे. त्या रूपात त्याची अुपासना करावी तसें पाहिलें तर अीश्वराच्या ठिकाणीं अनंत गुण असतात. पण आमच्यांत अमुक अेक गुणाची अुणीव आहे, म्हणून आम्ही 'रहीम' म्हणून त्याची अुपासना करतों. अशा च प्रकारें आमच्या ठिकाणीं निर्दयता असेल तर दयाळु परमेश्वराची अुपासना आम्हीं केली पाहिजे. आमच्यात सत्य कमी असेल तर सत्यमय अीश्वराची अुपासना केली पाहिजे (२) आम्हीं सृष्टीचें निरीक्षण करावें. पण तें अशा पद्धतीनें कीं सृष्टींत जी दया दिसून येत असेल तिचें चिंतन व्हावें. अशा प्रकारें जो गुण आपल्या ठिकाणीं कमी असेल त्याच्या विकासासाठीं सृष्टीची मदत घ्यावी. ह्याला 'साध्य' म्हणतात. परमेश्वरानें सृष्टींत दयेची काय योजना केली आहे ह्या दृष्टीनें केलेल्या सृष्टीच्या निरीक्षणाला ज्ञान-मार्ग म्हणतात. अीश्वराने सृष्टींत जी प्रेम-योजना केली आहे, तिचे चिंतन आम्हीं करावें (३) आपल्यात तो गुण आणण्याचा प्रयत्न करावा. ह्याला कर्मयोग म्हणतात. असा हा त्रिविध कार्यक्रम होअील.

## उपासनेचे भिन्न मार्ग

काहीं संप्रदाय प्रेमावर भर देतात. उदा० येशूनें 'गॉड अिज् लव्ह'— प्रेम च परमेश्वर आहे असें म्हटलें आहे. अिस्लामनें म्हटलें आहे कीं परमेश्वर 'रहीम' व 'रहमान' आहे. अुपनिषदांनीं 'सत्य ज्ञान अनन्तम्' असें म्हणून सत्यावर जोर दिला. बापूनीं सत्य आणि अहिंसेवर जोर

दिला आणि म्हटलें कीं सत्य आणि अहिंसा अेकरूप समजा अशा प्रकारें अुपासनेचे भिन्न भिन्न मार्ग मानले गेले आहेत मनुष्याला प्राय लोभ अधिक असतो म्हणून दानाचा अुपदेश केला जातो व परमेश्वराच्या अुदारतेचें चिंतन करण्यास सांगितलें जातें त्या च पद्धतीनें मनुष्याच्या ठिकाणीं क्रोध असेल तर त्यानें परमेश्वराच्या दयेचें चिंतन करावयास पाहिजे त्याच्या ठिकाणीं कामाची मात्रा अधिक असेल तर त्याला संयमाची साधना केली पाहिजे व अीश्वरी योजनेत कायदे कसे बनतात, त्यांचें नियंत्रण कसें केलें जातें ह्याचें मनन केलें पाहिजे काम, क्रोध, लोभ आदींतून मुक्त होण्याची सर्वसामान्य दृष्टि मीं अशा-प्रकारें तुम्हाला सांगितली

#### मुख्य दोष—असत्य

पण सर्वांहून अधिक महत्त्व मी ज्या गोष्टीला देतों व जिची अत्यंत आवश्यकता आहे, असें मला वाटतें ती गोष्ट मी आता तुम्हाला सांगतों नुकते च हीरालाल शास्त्री मला भेटण्यास आले होते त्यांची माझी चर्चा पंधरा दिवस रोज चालली होती मीं म्हटलें होतें कीं हल्लीं जीं सामाजिक मूल्यें प्रचलित आहेत, त्यांत खूप च मोठा बदल कर-ण्याची गरज आहे आतापर्यंत ज्यांहीं गोष्टींना महापातकें मानलें गेलें अुदा० सोन्याची चोरी, दारू पिणे, व्यभिचार, खून करणे अित्यादि महापातकें आहेत ह्या शिवाय दुसरीं अुपपातकें मानलीं जातात पण जगातील खून, व्यभिचार अित्यादि जितके म्हणून महान् दोष समजले गेले आहेत, ते सर्व गौण असून मुख्य दोष 'असत्य' आहे असें जोंपर्यंत आम्ही मानू लागणार नाहीं तोंपर्यंत आमच्या साधनेंत आज प्रगति होईल, असें मी समजत नाहीं 'असत्य' हा च अेक नैतिक दोष

आहे बाकीचे सर्व व्यावहारिक दोष आहेत. समाजात ही वृत्ति स्थिर झाली तर आम्ही आजच्या भानगडींतून सुटूं.

**मानसिक रोग**

समजा अेखादा माणूस आजारी पडला तो रोग प्रगट करतो, लपवीत नाहीं कारण प्रगट केल्याने डॉक्टराला त्याचें निदान करता येतें व औषधोपचार करता येतो, व आजारी माणूस रोग मुक्त होतो म्हणून माणूस रोग लपवीत नाहीं. पण दुनियेंत निंदा होईल असें अेखादें काम आपल्या हातून घडलें तर माणूस ते लपवितो अशा प्रकारें माणूस आपले मानसिक दोष लपवीत असल्यामुळे त्याला त्याच्या निवारणाचा अुपाय सापडत नाहीं व दुसऱ्याची मदत हि मिळू शकत नाहीं म्हणून जितकीं पापें म्हणून मानलीं जातात, तीं सर्व शरीराच्या रोगासारखीं च मनाचे रोग आहेत असा विचार समाजात ठसला पाहिजे असें मी अिच्छितों

**रोगी—दयेला पात्र असतो**

मनुष्याचे बहुतेक रोग त्याच्या दोषामुळे च होतात हे अुघड असलें तरी आम्ही रोगी माणसाचा तिरस्कार करीत नाही, अुलट त्याच्याकडे दयेच्या दृष्टीनें पाहतों सर्व च शारीरिक रोग माणसाच्या दोषामुळे अुत्पन्न होतात असें मी म्हणत नाहीं कारण असे सर्वसकट विधान करता येणार नाही. काहीं रोग असे असतात कीं ज्याचा मनुष्याच्या दोषाशीं संबंध नसतो पण मी माझी च गोष्ट सागतों. अगदीं लहानपणच्या रोगाबद्दल मला काहीं म्हणता येणार नाही, कारण त्याची माहिती मला नाही. पण मला समजू लागल्यापासून मला जे म्हणून रोग झाले ते सर्व माझ्या दोषामुळें च झाले मला रोग झाला कीं मी त्याच्या कारणाचा विचार

करतो व अमुक दोषामुळें तो झाला असे मला ज्ञान होने जोपर्यंत असा दोष सापडत नाहीं तोपर्यंत मी त्याचा पीच्छा सोडीत नाहीं. आणि मग काहींना काहीं तरी दोष सापडतो, वर्तनातील अव्यवस्थितपणा दिसून येतो. म्हणजे रोगाबद्दल रोगी जबाबदार असतो च. पण तरी हि आम्ही त्याला दोषी समजत नाहीं. उलट तो दयेला पात्र आहे असें समजतो.

### तिरस्काराचा दुष्परिणाम

ऐखाद्या रोग्याला दवाखान्यात नेलें तर त्याचा रोग गंभीर असला तरी तेथचे लोक त्याच्याकडे तिरस्कार दृष्टीने पाहत नाहींत. दयेच्या दृष्टीने पाहतात व आम्हाला त्याची सेवा करावयाची आहे असे मानतात. त्या च प्रमाणे तो हि आपला रोग छपवीत नाहीं. मानसिक दोषाबद्दल सुद्धा अशी च स्थिति असावी असे मी इच्छितो. आवश्यकता नसेल तेथें ते प्रगट करण्याची गरज नाहीं. आज सर्व लोकासमोर मानसिक दोष प्रगट करण्याची प्रेरणा मनुष्याला होत नाहीं. त्याला तशी हिमत च होत नाहीं कारण आजच्या समाजात त्याची त्यामुळे निंदा होते व त्याच्या दोषाकडे लोक तिरस्कार दृष्टीनें पाहतात ज्या रोगाकडे तिरस्कार बुद्धीनें पाहिलें जाते असे महारोगासारखे काहीं शारीरिक रोग आहेत. ते रोग लपविणाचा मनुष्य प्रयत्न करतो. माझ्या पोटात अल्सर (फोड) आहे, पण मी ही गोष्ट लपवीत नाहीं, प्रगट करतों. पण महारोग झालेल्या मनुष्याचा रोगाला छपविण्याचा प्रयत्न असतो. त्यामुळें त्याचा रोग दुरुस्त होऊ शकत नाहीं. ह्याचे कारण समाज त्याच्या रोगाकडे तिरस्कार बुद्धीनें पाहतो हे आहे. पण त्याचा परिणाम असा होतो कीं त्या मनुष्याचा रोग वाढत जातो व तो मनुष्य

सर्वांबरोबर मोकळेपणाने व्यवहार करतो. त्यामुळें त्याचा रोग दुसऱ्याला लागण्याचा धोका निर्माण होतो. म्हणून ह्यात सर्व प्रकारें धोका आहे.

**मूल्य बदलणें आवश्यक**

महारोगाप्रमाणे च मानसिक दोषांबद्दल तिरस्कारवृत्ति असल्यामुळे मनुष्य ते प्रगट करीत नाहीं मद्यपान, व्यभिचार अित्यादि आज समाजात जे दोष मानले जातात ते सर्व मामुली दोष असून नैतिक दोष अेक 'असत्य' हा च आहे असें मूल्य समाजांत स्थापन झालें तर समाज लवकर सुधरेल. विशेष परिस्थितीत कोणी हिंसा केली तर तो त्याचा दोष खरा च, पण मूळ नैतिक दोष असत्य आहे व बाकीचे दोष शारीरिक किंवा मानसिक दोष आहेत असें मूल्य समाजांत स्थिर झालें पाहिजे.

**दोष प्रकट करावे**

म्हणून माणसानें बिनदिक्कत आपले दोष प्रकट करावे असें मी अिच्छितो. काहीं लोकाना अशी भीति वाटते की ह्यानें दोष वाढतील. आणि म्हणून च ते म्हणतात कीं लोकनिंदेची गरज आहे. म्हणून लोकनिंदेचा विकास करण्यात आला. आज तिच्यावर जो अितका जोर दिला जात आहे त्यामुळें काहीं दोष कमी होत असतील, पण नंतर असत्याचा फैलाव होतो. असत्य फार मोठा दोष आहे. अशा प्रकारें छोटे दोष जाअून मोठा दोष येणें हा धोका निर्माण होतो. आज मुलें आपला अपराध छपवितात, पण अपराध लपविणें हा च सर्वात मोटा अपराध आहे असें शिक्षण त्याना मिळालें तर तीं तसें करणार नाहींत. ह्या दोषाकडे पाहण्याची समाजाची आज जी दृष्टि आहे ती बदलली व आम्ही ज्या दोषाना भयानक पापें मानतों तीं तशीं न मानलीं तर ह्या पापापासून समाजाची सुटका होअू शकते. पण त्याना लपवून आम्ही

सुटकेचा मार्ग च बंद करतो म्हणून सर्वांत प्रधान मूल्य सत्य हे आहे. आध्यात्मिक दृष्टीने पाहणारासाठीं ती च मुख्य वस्तु आहे

## सत्य मूलभूत सद्गुण

महापुरुषाच्या ठिकाणीं पुष्कळ दोष असतात कपि क्रोधी असत असें आम्ही ऐकतो पण खोटेपणा करणाऱ्या मनुष्याला कोणी सत्पुरुष मानलें असें होऊं शकत नाहीं म्हणून सत्य ही मूलभूत वस्तु आहे प्राचीन काळापासून आजपर्यंत त्याला महत्त्व दिलें गेलें आहे व त्याला मूलभूत वस्तु मानलें आहे मूलभूत वस्तु मानणे म्हणजे महत्त्व देणे असा हि अर्थ आहे पण काहा वेळा मूलभूत म्हणजे सामान्य मामुली वस्तु असा हि त्याचा अर्थ होतो उदा० मूलभूत (बुनियादि) शाळा म्हणजे प्राथमिक शाळा ह्या दृष्टीनें काहा लोक सत्याला मूलभूत गुण मानतात, व समजतात कीं तो तर मामुली गुण आहे, कॉलेजचा गुण नाहा आणि ह्या साठा च जे लोक आपल्या जीवनात असत्याला स्थान देतात व ज्याचा सर्व व्यवहार असत्यावर उभारलेला असतो ते हि मुलाना शाळात सत्य च शिकवावे, असत्य शिकवू नये असें अिच्छितात कारण ते बहुधा असें मानीत असावे कीं सत्य हा बाळपणचा गुण आहे, मुलें असत्य कॉलेजमध्ये गेल्यावर शिकून घेतील प्राथमिक शाळात मात्र सत्य च पाहिजे असे त्यानीं मानलें आहे अशा प्रकारे आम्ही सत्य केवळ मुलासाठीं किंवा सन्याशासाठीं शिल्लक ठेवलें आहे बाकी सर्वांसाठीं अपवाद ठेवले आहेत आणि ह्या अपवादाची संख्या अितकी जास्त आहे कीं, संस्कृत व्याकरणात ज्याप्रमाणें काहा ठिकाणीं नियमापेक्षा अपवादाची च यादी

मोटी असते त्याप्रमाणें च सत्याचा अुपयोग केव्हां करू नये ह्याची अेक लांबलचक यादी च बनलेली आहे. राजकारणात, व्यापारात, कोर्टात व लग्नादींत हि असत्य चालते. आणि वर असा युक्तिवाद हि करण्यात येतो की ते असत्य नव्हे च. म्हणजे हे लोक असत्याची व्याख्या च बदलू अिच्छितात.

**सत्य ही एकमात्र साधना**

सत्याचा अेलिमेन्टरी (मौलिक) गुण मानला आहे अेवढें च बस नाहीं. तें च अेक नैतिक तत्त्व असून बाकीचे सर्व गुण नैतिक नाहींत, सामान्य गुण किंवा दोष आहेत हा विचार नीतिशास्त्रात रूढ झाला पाहिजे. म्हणजे समाजात सुधारणा होअील व आध्यात्मिक साधनेला त्यामुळें मदत मिळेल. मनुष्य सत्याला दंडाच्या भीतीमुळें लपवीत असतो. त्यानें ते लपविणे ह्यात त्याचें चातुर्य मानलें जातें. म्हणून दोषाबद्दल दंड होअू नये अशी स्थिति पाहिजे. दोषाची दुरुस्ती झाली पाहिजे. कोणी आजारी पडले तर आपण त्याला शिक्षा थोडी च देतों? त्याला अुपवास करायला सांगतों, कडू औषध पिण्यास देतों व कधीं कधीं ऑपरेशन हि करतों, ही गोष्ट खरी. ह्याला दंड म्हणावयाचे तर म्हणा परंतु ही ट्रीटमेंट (अुपचार) आहे, सेवा आहे. म्हणून समाजातील सर्व दोषासाठीं अुपचार व्हावयास पाहिजे, दंड नको. ही गोष्ट समाजात रूढ झाली तर मन लवकर दुरुस्त होअू शकेल व समाज बदलू शकेल काहीं लोकाना ह्यात धोका वाटतो. त्याचें म्हणणे असे कीं दंडावर आधारलेली व्यवस्था गेली तर अुघड अुघड गुन्हे वाढतील. पण ही विचार-सरणि चुकीची आहे. आज दंड करून सर्व दोषाना झाकण्याची लपविण्याची प्रवृत्ति वाढली आहे ह्यामुळे अंत शुद्धि होत

नाहीं व दोष फैलावतात. म्हणून माझें असें मत आहे कीं सर्वांनीं च, विशेषत: आध्यात्मिक साधना करणारांनीं, सत्य केव्हां हि लपवूं नये. ही च सर्वोत्तम साधना आहे व ती च प्राथमिक, मधली व अखेरची साधना आहे. ती च अेकमात्र साधना आहे. अुपनिषदांत कवि म्हणतो–

> हिरण्मयेन पात्रेण सत्यस्यापिहितं मुखम् ।
> तत् त्वं पूषन्नपावृणु सत्य-धर्माय दृष्टये ॥

"सत्याचें मुख सुवर्णमय पात्रानें झांकलेलें आहे. मी सत्य-धर्मा आहें. म्हणून हे प्रभो, तें असत्याचें आवरण दूर कर"

**आरंभ कोठून व्हावा?**

म्हणून ही च सर्वोत्तम किंवा सर्वप्रथम साधना आहे. तिचा आरंभ शाळेपासून किंवा घरापासून व्हावा. हल्लीं मुलें आओीबापांपासून दोष छपवितात व मित्रांसमोर प्रकट करतात, असें घडतें. जे आओीबाप त्यांच्यावर अितकें प्रेम करतात, त्यांच्यासाठीं अेवढा त्याग करतात, त्यांची सेवा करतात त्यांच्यापासून गोष्ट लपविण्याची प्रवृत्ति मुलांना व्हावी व आपल्या खेळगडी मुलांच्या समोर मात्र त्यांनीं ती मोकळें-पणानें सांगावी ही केवढ्या आश्चर्याची गोष्ट आहे. त्यांचे खेळगडी त्यांना वाचविणारे नसतात, नुसते खेळणारे च असतात. तरी हि मुलें आओीबापांसमोर दोष प्रकट करीत नाहींत. कारण आओीबापांनीं त्यांना कधीं काळीं मारलेलें, धमकावलेले असतें किंवा भीति दाखविलेली असते.

आओी-बाप आपणांवर अत्यंत प्रेम करीत आहेत हें जाणून हि मुलें त्यांच्यापासून गोष्ट लपवितात. आओीबापांपासून जर मुलें गोष्ट लपवितात

तर ती ते सर्वांपासून लपविनील. कारण आईबापाशीं च ती सर्वांत अधिक मोकळेपणानें बोलू शकतात. आईबाप जितके प्रेमळ असतात, तितके दुसरे लोक असत नाहींत. म्हणून जो मुलगा आईबापापासून गोष्ट लपवील तो ती साऱ्या दुनियेपासून हि लपवील. कधीं कधीं मुलें आपल्या मित्रांना ती मोकळेपणानें सांगतात, पण तें अज्ञानामुळें होतें. मित्र आपली निंदा करतात असें त्यांना कळलें तर ते मित्रांपासून हि गोष्ट लपवितील म्हणून सत्याचा आरंभ शाळेपासून किंवा घरापासून झाला पाहिजे.

अेखाद्याकडून दोष घडला तर काहीं घडलें च नाहीं असें मानलें पाहिजे अेखाद्याचें नाक घाण असेल तर तें आम्ही साफ करतों, त्याला दोषी मानत नाहीं कोणी आजारी पडला तर आम्ही सांगतों दोन दिवस काहीं खाअू नकोस. त्या च न्यायानें कोणाकडून दोष घडला तर काहीं च घडलें नाहीं असें मानलें पाहिजे व त्याला सांगितलें पाहिजे कीं पुन्हा असें करू नकोस अशी अुदार-वृत्ति आम्ही राखली पाहिजे. त्या दोषापासून काय नुकसान होतें हें आम्ही त्याला समजावून सांगितलें पाहिजे ज्या प्रमाणें मनुष्याला रोग झाला तर त्याला आपण सांगतों कोणता रोग आहे, कसा झाला, म्हणजे तो त्यापासून वाचतो, त्या च प्रमाणें, कुटुंबांत, शिक्षणांत, नीतिशास्त्रांत व अध्यात्मांत सत्य असलें पाहिजे नीतिशास्त्र आणि अध्यात्म दुसऱ्या छप्पन्न गुणांवर जोर देवो वा न देवो, पण सत्य च मुख्य आहे असें त्यानें म्हटलें पाहिजे

**सत्य म्हणजे काय ?**

कधीं कधीं सत्याची व्याख्या काय असा प्रश्न विचारला जातो

पण असें विचारणें च चूक आहे. अेकदा अेका गृहस्थानें मला विचारलें सत्य काय आहे. मीं म्हटलें सत्य धजूर आहे त्याला वाटलें मी विनोद करीत आहे. पुन्हा त्याला मी म्हटलें सत्य धजूर आहे. हे तुम्हाला पटत नसेल तर तें बदाम आहे असें समजा ती गोष्ट हि त्याला पटली नाही. तेव्हा मी त्याला म्हटलें कीं सत्य काय वस्तु आहे हें तुम्हाला ठाअूक आहे असें दिसतें. कारण ज्या ज्या वस्तूचें मी नाव घेतों, ती ती तुम्हाला पटत नाहीं, मग तुम्हीं च सांगा सत्य काय आहे तें ? मग त्याला अनुसरून मी त्याची व्याख्या करीन. सत्याची व्याख्या हि सत्याच्या च कसोटीवर तपासून ठरेल. सत्याची कोणची च व्याख्या होअू शकत नाही. सत्य स्वयं-स्पष्ट आहे. त्याच्या अितके दुसरें कोणतें च तत्त्व जगात स्पष्ट नाहीं अहिंसा कशाला म्हणावें ह्याची व्याख्या करूं गेले, तर त्रास पडतो ( पण ती करता येअील.) पण सत्याबद्दल तशी स्थिति नाहीं

गीतेंत म्हटलें आहे कीं अनुरात सत्य हि नसनें. म्हणजे सत्य हा असा गुण आहे कीं लहान मूल हि तो समजू शकतो. पण मुलाला सत्य बोल असें आम्ही जेव्हा शिकवितों तेव्हा असत्य काय हें तो शिकत असतो कारण तो विचारतो सत्य बोलावें म्हणजे काय बोलावें ? त्याला खोटें म्हणजे काय हें सांगावें लागतें. अितकें सत्य स्वयं-स्पष्ट आहे पण आम्ही त्याला दाखवण्याचा प्रयत्न करतों व्यापार, व्यवहार सर्वत्र असत्य आवश्यक आहे असें म्हटलें जातें. ह्याचा अर्थ कोणच्या वस्तुला महत्त्व द्यावें, व कोणचीला देअूं नये हे आम्ही जाणत नाहीं म्हणून माझ्या दृष्टीनें मी असें च म्हणेन कीं आध्यात्मिक व व्यावहारिक दोन्ही दृष्टींनीं सत्याला मुख्य स्थान मिळालें पाहिजे आमच्यासमोर

सर्व प्रथम वस्तु सत्य ही आहे. त्याची आम्हीं अुपासना केली पाहिजे.

### सत्य आणि निर्भयता

सत्याची पूर्ति करू गेलें कीं दुसरे गुण आपोआप येअून जातात. पण आज असें होत नाहीं कारण आम्ही आमचे दोष प्रकट केलें तर समाजात आमची निंदा होते. ती निंदा सहन करण्याची हिंमत आमच्यात पाहिजे. म्हणून सत्याच्या रक्षणासाठीं निर्भयतेची गरज आहे, असा अनुभव येतो. जें काय व्हायचें तें होअू द्या, कोणी आमची कितीहि निंदा करो आम्ही सत्य च बोलणार असा निश्चय आज आम्हाला करावा लागतो. परंतु वस्तुत: सत्य अगदीं स्वाभाविक आहे. आज समाजाची स्थिति अुलटी आहे म्हणून सत्यासाठीं निर्भयतेची जरूर पडते. म्हणून तर निर्भयतेचें महत्त्व अितकें वाढलें आहे. सकारण किंवा अकारण आज निर्भयतेशिवाय सत्य आम्ही प्रकट करू शकत नाहीं बापूंनी तिला महत्त्व दिलें व गीतेनें तर अभयाला सर्व गुणांचा सेनापति मानला. पण बारकाअीनें पाहिलें तर अभय म्हणजे सत्याच्या रक्षणाची युक्ति अभयाशिवाय सत्याचें रक्षण होअूं शकत नाहीं. आज समाजाची जी स्थिति आहे ती नसती तर अभयाला अितकें महत्त्वाचें स्थान प्राप्त झालें नसतें.

### भय आणि अभय

वस्तुत जीवनात भय आणि अभय दोहोंची हि गरज आहे फक्त अभय च चाललें तर मूर्खपणा होअील. समोर साप पडला आहे आणि आम्ही भ्यालों नाहीं तर ती चूक होअील जेथें भिण्याची गरज आहे तेथें भ्यालें पाहिजे व जेथे ती नाहीं तेथें भिवा कामा नये. आम्ही रुळावरून

चाललों आहों, आगगाडी येत आहे, आम्ही भ्यालो नाहीं तर तो मूर्ख-पणा होईल. म्हणून काहीं ठिकाणीं भीतीची आवश्यकता असते. म्हणून काहीं जागीं भ्याले पाहिजे असें मुलाना शिकविणें ज्ञान च आहे. जास्त खाल तर त्रास होईल, विस्तवावर पाय टाकाल तर भाजेल, पुरात गेलात तर बुडाल असें शिकविणें ही ज्ञानाची च प्रक्रिया आहे कोणचें काम करण्यात धोका आहे ही गोष्ट ज्ञानाच्या प्रक्रियेत च येते. हें सर्व शिकविलें पाहिजे ते भय सुद्धा ज्ञानरूप आहे ह्या दृष्टीनें जीवनात भय आणि अभय दोहोंची गरज आहे गीतेनें हि म्हटलें आहे कोठें भ्यावें कोठें भिऊ नये हें माणसाला माहीत असलें पाहिजे

**सत्य हा च प्रथम गुण**

पण आज ह्याच्या उलट होत आहे आईबापाची भीति नसली पाहिजे, तर मुलें त्याना च भितात मूर्ख मित्राना भ्यालें पाहिजे, पण त्याना न भिता मुलें मोकळेपणानें सर्व गोष्टी सागतात म्हणजे आज समाजात सर्व उलटें चाललें आहे आज अभयाला जें इतकें महत्त्व मिळालें आहे ह्याचें कारण त्याच्याशिवाय आजच्या समाजात सत्याचें रक्षण होऊ शकत नाहीं म्हणून अभयाला सर्वप्रथम गुण मानला, पण वस्तुत सत्य हा च सर्व प्रथम गुण आहे.

---

# ईशोपनिषत्

## शांति-मंत्र

ॐ ते पूर्ण आहे, हे पूर्ण आहे पूर्णापासून पूर्ण निष्पन्न होते पूर्णातून पूर्ण काढून घेतले तरी, पूर्ण च शेष राहते

ॐ शांति शांति शांति

(१) हरि ॐ जगात जें काही जीवन आहे, ते हे सर्व ईश्वराने वसविलेले आहे म्हणून, त्याच्या नावानें त्यागून, तू यथा प्राप्त भोगीत जा कोणाच्या हि धनाविषयी, वासना राखू नकोस.

(२) इहलोकी कर्में करीत करीत च शंभर वर्षे जगण्याची इच्छा धरावी तुला देहवंताला हा च मार्ग आहे याहून वेगळा मार्ग नाही मनुष्याला कर्म चिकटत नाही, फल-वासना चिकटते

(३) आत्म-ज्ञानाचे शत्रुत्व करणारे, जे कोणी आत्म-घातकी जन आहेत, ते देह पडल्यानंतर, गाढ अंधारानें घेरलेल्या, आसुरी म्हणविलेल्या, योनीकडे वळत असतात

(४) ते आत्म-तत्त्व एक च एक, मुळी च हालचाल न करणारे, पण मनापेक्षा हि वेगवान् आहे देव त्याला गाठू शकत नाहीत त्यानें मात्र देवांना केव्हा च गाठलेले आहे धावणाऱ्या इतरांना, ते उभें राहून मार्गे टाकते प्रकृति-मातेच्या अंकावर, खेळणारा प्राण, त्याच्या च सत्तेवर, चळवळ करीत असतो

(५) ते हालचाल करतें, आणि ते हालचाल करीत नाही ते दूर आहे, आणि ते जवळ आहे ते ह्या सर्वांच्या आत, आणि ते ह्या सर्वांच्या बाहेर आहे

(६) जो निरंतर आत्म्यात च सगळी भूते, आणि सगळ्या भूतात आत्मा पाहतो, तो मग कोणाला हि आणि मनाला हि, कटाळत नाही.

(७) ज्याच्या दृष्टीने, आत्मा च सर्व भूते झाला, त्या निरंतर एकत्व पाहणाऱ्या, विज्ञानी पुरुषाला, मोह कुठला आणि शोक कुठला ?

(८) तो त्या तेजस्वी देह-रहित, अतएव व्रणादि देह-दोषापासून, आणि स्नाय्वादि देह-गुणापासून, सर्वथा अलिप्त, शुद्ध आणि पापवेध-मुक्त, अशा आत्म-तत्त्वाला चारी बाजूनी वेढून बसला तो कवि म्हणजे क्रांत-दर्शी, वशी व्यापक आणि स्वतंत्र झाला त्याने शाश्वत काळपर्यंत टिकणारे, सर्व अर्थ यथावत् साधले

(९) जे नेणिवेत गढून गेले, ते गाढ अंधारात शिरले जे जाणिवेत रमले, ते जणू त्याहून घोर अंधारात शिरले

(१०) आत्म-तत्त्व जाणिवेहून, वेगळें च म्हटले आहे आणि नेणिवेहून, वेगळें म्हटले आहे ज्यानी आम्हाला त्याचे दर्शन करविले, त्या धीर पुरुषाकडून आम्ही असे ऐकिले आहे

(११) जाणीव आणि नेणीव, ह्या दोहोंसह, जे त्या आत्म-तत्त्वाला जाणतात, ते त्या आत्म-तत्त्वाच्या आधारे, नेणिवेने मृत्यु तरून, जाणिवेने अमृत गाठतात

(१२) जे निरोधात गढून गेले, ते गाढ अंधारात शिरले जे विकासात रमले, ते जणू त्याहून घोर अंधारात शिरले

(१३) आत्म-तत्त्व विकासाहून, वेगळें च म्हटले आहे आणि निरोधाहून, वेगळें म्हटले आहे ज्यानी आम्हाला, त्याचें दर्शन करविलें, त्या धीर पुरुषाकडून आम्ही असें ऐकिले आहे

(१४) विकास आणि निरोध, ह्या दोहोंसह, जे त्या आत्म-तत्त्वाला जाणतात, ते त्या आत्म तत्त्वाच्या आधारें, निरोधानें मृत्यु तरून, विकासानें अमृत गाठतात

(१५) सुवर्णमय पात्रानें, सत्याचें मुख झाकलेले आहे हे विश्व-पोषक प्रभो, सत्य-धर्माचा मी उपासक, माझ्या दर्शनासाठी, तें तू अुघडें कर

(१६) तू ह्या विश्वाचे पोषण करणारा, आणि तू च एक निरीक्षण करणारा आहेस तू नियमन करणारा आणि तू उत्तम प्रवर्तन करणारा आहेस. तू सर्वांचें प्रजावत् पालन करणारा आहेस तुझे हे पोषणादि रश्मि, उलगडून, आणि एकवटून, दाखव तुझें जें तेजस्वी आणि परम कल्याणमय रूप, तें मी आता पाहत आहें तो जो परात्पर पुरुष, तो मी आहे

(१७) हा प्राण त्या चैतन्यमय अमृत-तत्त्वात लीन होवो, आणि मग शरीराची राख होवो ईश्वराचें नाव घेऊन, हे दृढसंकल्पमय जीवा, आठव त्याचें केलेलें आठव हे माझ्या जीवा, आठव आपले संकल्प सोडून, त्याचें केलेलें आठव

(१८) हे मार्गदर्शक देदीप्यमान प्रभो, विश्वात ब्रिणलेली सर्व तत्त्वे, तुला अवगत आहेत आम्हाला सरळ मार्गानें, त्या परम आनंदाकडे घेऊन जा वाकडे जाणारें पाप, तू आमच्यापासून पिटाळून लाव तुला आम्ही पुन्हा पुन्हा नम्र वाणीने विनवीत आहोत तुला आम्ही पुन्हा पुन्हा नम्र वाणीनें विनवीत आहोत

* * *

तें पूर्ण आहे, हें पूर्ण आहे पूर्णापासून पूर्ण निष्पन्न होतें
पूर्णातून पूर्ण काढून घेतले तरी पूर्ण च शेष राहतें.
ॐ शांति शांति शांति

# स्थितप्रज्ञ-लक्षण

यं ब्रह्मा वरुणेन्द्र-रुद्र-मरुतःस्तुन्वन्ति दिव्यैः स्तवैर्
वेदैः साङग-पद-क्रमोपनिषदैर्गायन्ति यं सामगाः ।
ध्यानावस्थित-तद्गतेन मनसा पश्यन्ति यं योगिनो
यस्यान्तं न विदुः सुरासुर गणा देवाय तस्मै नमः ॥

अर्जुन म्हणाला

१ स्थिरावला समाधींत स्थित-प्रज्ञ कसा असे
कृष्णा सांग कसा बोले कसा राहे फिरे कसा

श्रीभगवान् म्हणाले

२ कामना अंतरांतील सर्व सोडूनि जो स्वयें
आत्म्यांत चि असे तुष्ट तो स्थित-प्रज्ञ बोलिला ।

३ नसे दुःखांत उद्वेग सुखाची लालसा नसे
नसे तृष्णा भय क्रोध तो स्थित-प्रज्ञ संयमी

४ सर्वत्र जो अनासक्त बरें वाईट लाभतां
न उल्लासे न संतापे त्याची प्रज्ञा स्थिरावली

५ घेई ओढूनि संपूर्ण विषयांतूनि इंद्रियें
जसा कासव तो अंगें तेव्हां प्रज्ञा स्थिरावली ।

६ निराहार-बळें बाह्य सोडी विषय साधक
आंतील न सुटे गोडी ती जळे आत्म-दर्शनें

७ करीत असतां यत्न ज्ञात्याच्या हि मनास हीं
नेती ऐंचूनि वेगानें इंद्रियें दांडगीं चि कीं

८ त्यांस रोधूनि युक्तीनें रहावें मत्परायण
इंद्रियें जिंकिलीं ज्यानें त्याची प्रज्ञा स्थिरावली ।

९ विषयांचें करी ध्यान त्यास तो संग लागला
संगांतूनि फुटे काम क्रोध कामांत ठेविला

१० क्रोधांतूनि जडे मोह मोहानें स्मृति लोपली
स्मृति-लोपें बुद्धि-नाश म्हणजे आत्म-नाश चि

११ राग-द्वेष परी जातां आलीं हातांत इंद्रियें
स्वामित्वें विषयीं वर्ते त्यास लाभे प्रसन्नता

१२ प्रसन्नतेपुढें सर्व दुःखें जाती झडूनियां
प्रसन्नतेनें बुद्धीची स्थिरता शीघ्र होतसे ।

१३ अयुक्तास नसे बुद्धि त्यामुळें भावना नसे
म्हणूनि न मिळे शांति शांतीविण कसें सुख

१४ इंद्रियें वर्ततां स्वैर त्यांमागें मन जाय जें
त्यानें प्रज्ञा जशी नौका वाऱ्यानें खेंचली जळीं

१५ म्हणूनि इंद्रियें ज्यानें विषयांतूनि सर्वथा
ओढूनि घेतलीं आंत त्याची प्रज्ञा स्थिरावली ।

१६ सर्व भूतांस जी रात्र जागतो संयमी तियें
सर्व भूतें जियें जागीं ज्ञानी योग्यास रात्र ती

१७ न भंग पावे भरतां हि नित्य
समुद्र घेतो जिरवूनि पाणी
जाती तसे ज्यांत जिरूनि भोग
तो पावला शांति न भोग-लुब्ध

१८ सोडूनि कामना सर्व फिरे होऊनि निःस्पृह
अहंता ममता गेली झाला तो शांति-रूप चि ।

१९ अर्जुना स्थिति ही ब्राह्मी पावतां न चळे पुन्हां
टिकूनि अंत-काळीं हि ब्रह्म-निर्वाण मेळवी ॥

---

### नाम-माला

ॐ तत् सत् श्री नारायण तू पुरुषोत्तम गुरु तू ।
सिद्ध बुद्ध तू स्कंद विनायक सविता पावक तू ॥
ब्रह्म मज्द तू यह्व शक्ति तू ईशु-पिता प्रभु तू ।
रुद्र विष्णु तू राम-कृष्ण तू रहीम ताओ तू ॥
वासुदेव गो-विश्वरूप तू चिदानंद हरि तू ।
अद्वितीय तू अकाल निर्भय आत्मलिंग शिव तू ॥

### व्रत-पाठ

अ-हिंसा सत्य अ-स्तेय ब्रह्म-चर्य अ-संग्रह ।
शरीर-श्रम अ-स्वाद सर्वत्र भय-वर्जन ॥
सर्व-धर्मी समानत्व स्वदेशी स्पर्श-भावना ।
हीं अेकादश सेवावीं नम्रत्वें व्रत-निश्चयें ॥

## स्तवराज

[ महाभारतातील भीष्म-स्तवराज स्तोत्र ]

ओम्

१ हवनें तोषले देव प्राचुर्यें पोषलें जग
जाळिला जीव-संकोच यज्ञ-रूपास त्या नमो ।

२ ऋचांनीं अर्चितो ज्यास यजूंनीं यजितो जया
सामें सामावलीं जेथ वेद-रूपास त्या नमो ।

३ मुखीं नाम मनीं भाव नयनीं लय-लीनता
अंगा-अंगांत आवेश गीत-रूपास त्या नमो ।

४ अभेद खुलदाया जो भावानुगुण भेदला
धरिला देह ज्या साठीं धर्म-रूपास त्या नमो ।

५ फाकली पालवी जेथ झांकलें बीज आंतलें
योगी राबविती ज्यास देह-रूपास त्या नमो ।

६ मुखीं विद्या भुजीं वीर्य उदरीं प्रेम साठवे
पदीं सेवार्थ संचार वर्ण-रूपास त्या नमो ।

७ शिरीं शृंगारला स्वर्ग उरीं आकाश मोकळें
पदीं पैसावली पृथ्वी लोक-रूपास त्या नमो ।

८ दौडतो दिवसीं मासीं अयनीं हायनीं युगीं
घडितो मोडितो सृष्टि काल-रूपास त्या नमो ।

९ काळाचा जिरला वेग साधना ज्यांत आटली
दाटली जेथ ही माया विश्व-रूपास त्या नमो ।

१० पापें पुण्यें हि झाडूनि पुनर्जन्मांत निर्भय
मोह-क्षय जियें नांदे मोक्ष-रूपास त्या नमो ।

---

# सर्व-धर्म-वचन

१ ॐ देहे, प्राणें, मनें ।
वरणीय तें सवित्याचें,
तेज देवाचें, ध्याऊं या ।
प्रेरो बुद्धीस आमुच्या ॥ (त्रिवार गावें)

२ हे प्रभो, नेईं मज
असतांतून सत्याकडे,
तमांतून ज्योतीकडे,
मृत्यूंतून अमृताकडे ॥

३ जैसा वरणीय प्रभु, तैसा चि सत्यें गुरु ।
सु-मनाची त्या देणगी, जो करी देव-कार्य जगीं
त्या देवी शक्ति वरी, जो दीनांचें साह्य करी ॥

४ नमूं सिद्धास, नमूं अर्हंतास,
सम्यग् दर्शन ज्ञान चारित्र्य हा मोक्ष-मार्ग ॥

५ पाप तें टाळावें, शुभ आचरावें ।
स्व-चित्त शोधावें, म्हणती बुद्ध ॥

६ शेजाऱ्यावर प्रेम करूं ।
शत्रूवर हि प्रेम करूं ।
परस्परांवर प्रेम करूं ॥

७ आरंभीं देवाचें नांव, कृपाळु जो कनवाळू ॥
स्तुति त्या देवाची, प्रभु जो विश्वाचा ।
कृपाळु कनवाळू स्वामी शेवटच्या दिवसाचा ।
तुझी करूं भक्ति, तुझी च रे याचना.
सरळ मार्ग दाखिव तूं आम्हां—
ज्यां वरि तूं करितोसि कृपा त्यांचा;
न ज्यां वरि तुझा प्रकोप उतरे,
न वा भ्रमित जे त्यांचा ॥
अविनय दूर करी देवा,
मन मावळो, तृष्णा जिरो,
भूत-दया पसरो ॥

---

अष्टादशाक्षरमंत्र

ॐ नमो भगवते वासुदेवाय पुरुषोत्तमाय

---

गीताऔ माउली

गीताऔ माउली माझी तिचा मी बाळ नेणता
पडतां रडतां घेई उचलूनि कडेवरी ।।

# अधिकरण-माला

(१)

१ एक ऐतिह्य-कथन दोन दैन्य-प्रदर्शन ।

२ तीन कृष्णास शरण चार आत्म-प्रबोधन
पांच पाळूं स्व-धर्मास सहावा बुद्धि-योग तो
सात योगी स्थित-प्रज्ञ थोर आदर्श आमुचा ।।

(२)

३ आठ साधावया बुद्धि कर्म-योग अवश्यक
नौ नित्य-कर्म यज्ञार्थ दहावा लोक-संग्रह
अकरा शासन हें पाळूं बारा संन्यास संहरूं ।

४ तेरा दिव्य जन्म-कर्म चौदा कर्मीं अकर्मता
पंधरा प्राज्ञ-मुखें ज्ञान जेय मोह न संभवे ।

५ सोळा सांख्य योग एक सत्रा मुक्त सदा चि जो

(३)

६ अठ्रा योगारूढ होऊं करूं उद्धार आपुला
नौदा समाधि अभ्यास वीस योग्यास शाश्वती ।

७ एक्वीस् एक चि तें सूत्र बावीस् शरणता बरी
तेवीस् तोडूनियां मोह ज्ञान-विज्ञान-साधन ।

८ चोवीस् मरणपर्यंत राखूं स्मरण संतत
पंच्वीस् भूत-लयोत्पत्ति सव्वीस् बोध क्षयोदय

(४)

९ सत्तावीस् ईश्वरी सत्ता अठ्ठावीस् हरि-भावना
नव्वीस् निष्कामता-भक्ति तीस ईश-समर्पण ।

१० एक्तीस् विभूति-संक्षेप बत्तीस् त्याचा चि विस्तर ।

११ तेतीस् तें ईश्वरी रूप चौतीस् तदवलोकन
पस्तीस् क्षमापन-स्तोत्र छत्तीस् रूप-विसर्जन ।

१२ सदतीस् भक्त-तुलना अड्तीस् सुलभ साधनें
नौतीस् ईश्वर-भक्ताचें गाइले गुण गोड जे ॥

(५)

१३ चाळीस् झाडूनियां क्षेत्र केलें क्षेत्रज्ञ-शोधन
एकेचाळ् प्रकृति-त्याग बेचाळ् निर्लिप्त-आत्मता ।

१४ त्रेचाळ् त्रिगुण-संसार चव्वेचाळ् गुण-मुक्त जो ।

१५ पंचेचाळ् छेदिला वृक्ष शेचाळ् जीवात्म-दर्शन
सत्तेचाळ् जीवनीं व्याप्त अठ्ठेचाळ् पुरुषोत्तम ॥

(६)

१६ नव्वेचाळ् संपदा दोन पन्नास् असुर-वर्णना
एकावन् नरक-द्वारें टाळूं शास्त्रीय संयमें ।

१७ बावन् विभागिली श्रद्धा स्वाभाविक गुणीं त्रिधा
त्रेपन् आहार-यज्ञादि चोपन् ॐ-तत्-सदर्पण ॥

(७)

१८ पंचावन् त्याग-मीमांसा छप्पन्नीं कर्म-निर्णय
सत्तावन् त्रिविधा वृत्ति अठ्ठावन् पूर्ण साधना
नव्वावन् अर्जुना बोध साठीं ग्रंथ समापिला ॥

ॐ श्रीकृष्णार्पणमस्तु

हरये नमः । हरये नमः । हरये नमः

---

## गीताईचें ध्यान

भक्तातें प्रतिबोधिलीस समरीं
नारायणें श्रीवरें
सुक्तें ! संग्रथिलीस मान्य मुनिनें
वेदान्त-विद्याकरें
मातें ! षष्ट्यधिकारिणी सततशी
अष्टादशाध्यायिनी
तूतें मी अनुसंधितों निशिदिनीं
गीते ! भय-द्वेषिणी ॥

---

## अष्टादशी

निर्वीर्य तूं नको होऊं न शोभे हें मुळीं तुज
भिकार दुबळी वृत्ति सोडुनी ऊठ तूं फसा २.३

२ शीतोष्ण विषय-स्पर्श सुख-दुःखांत घालिती
करीं सहन तूं सारे येती जाती अनित्य ते २.१४

३ विनाशी देह हे सारे बोलिले, त्यांत शाश्वत
नित्य निःसीम तो आत्मा अर्जुना झुंज ह्यास्तव २.१८

४ कर्मांत चि तुझा भाग तो फळांत नसो कधीं
नको कर्म-फळीं हेतु अकर्मी वासना नको २.४७

५ फळ लाभो न लाभो तूं निःसंग सम होउनी
योग-युक्त करीं कर्मे योग-सार समत्व चि २.४८

६ नेमिलें तूं करीं कर्म करणें हें चि थोर कीं
तुझी शरीर-यात्रा हि कर्मांविण घडे चि ना ३.८

७ यज्ञार्थ कर्म सोडूनि लोक हा बांधिला असे
यज्ञार्थ आचरीं कर्म अर्जुना मुक्त-संग तूं ३.९

८ मज अध्यात्म-वृत्तीनें सर्व कर्मे समर्पुनी
फलाशा ममता सर्व सोडुनी झुंज तूं सुखें ३.३०

९ ब्रह्मांत होमिलें ब्रह्म ब्रह्मानें ब्रह्म लक्षुनी
ब्रह्मीं मिसळलें कर्म तेव्हां ब्रह्म चि पावला ४.२४

१० ब्रह्मीं ठेवूनियां कर्मे संग सोडूनि जो करी
पापें न लिप्त तो होय पद्म-पत्र जसें जळें ५.१०

११ उद्धरावा स्वयें आत्मा खचूं देऊं नये कधीं
आत्मा चि आपुला बंधु आत्मा चि रिपु आपुला ६.५

१२ म्हणूनि सगळा काळ मज आठव झुंज तूं
मन बुद्धि समर्पूनि मज निःशंक पावसी ८.७

१३ जें खासी होमिसी देसी जें जें आचरिसी तप
जें कांहीं करिसी कर्म तें करीं मज अर्पण ९.२७

१४ अज्ञानें तोडुनी सर्व कर्म-बंध शुभाशुभ
योग-संन्यास सांधूनि मिळसी मज मोकळा ९.२८

१५ माझ्या कर्मांत जो मग्न भक्तीनें भरला असे
जगीं निःसंग निर्वैर मिळे तो मज मत्पर ११.५५

१६ मन माझ्यांत तूं ठेव बुद्धि माझ्यांत राख तूं
म्हणजे मग निःशंक मी चि होशील तूं स्वयें १२.८

१७ प्रेमानें ध्यास घेऊनि यजीं मज नमीं मज
प्रिय तूं मिळसी मातें प्रतिज्ञा जाण सत्य हो १८.६५

१८ सगळे धर्म सोडूनि अेका शरण ये मज
जाळीन सर्व मी पापें तुझीं, शोक करूं नको १८.६६

---

सर्व-सार

वेद-वेदांत-गीतानां विनुना सार अुद्धृतः
ब्रह्म सत्यं जगत् स्फूर्तिः जीवन सत्य शोधनम्

---

# साम्य-सूत्राणि

| (१) | (२) |
|---|---|
| १ अभिधेय परम-साम्यम् | ५ छंदसि बहुलम् |
| २ सवधेन | ६ देहेन स्वधर्मः |
| ३ प्रयोजनवत्त्वात् | ७ मुक्तात्मा |
| ४ ऋजुबुद्धेस्तु | ८ युक्त्या समन्वय. |

९ भक्त-जनेषु
१० ततः प्रज्ञालाभः

(३)

११ कर्मयोगोऽनंतफलः
१२ बहुविध-प्रेरणे.
१३ जितांतरायस्य

(४)

१४ विकर्मणा संधानम्
१५ ततः स्फोटः
१६ सच्छरणस्य

(५)

१७ कर्ममातृकमकर्म
१८ द्विरूपं तु
१९ व्यक्तलिंगमेकम्
२० अव्यक्तलिंगमपरम्
२१ अनिर्वचनीयमुभयम्
२२ बिंदु-देवतादिवत्
२३ शुक-जनकयोरेकः पंथाः
२४ वैशेष्य तु

(६)

२५ आरोढुमिच्छेत्
२६ ऐकाग्रतया
२७ साभीष्टा शुद्धिपूर्विका
२८ गणित सहकारि
२९ साम्येन मंगलम्
३० बालवत्
३१ श्रद्धयोपेतस्य

(७)

३२ मायिनो ग्रहणेन
३३ भक्तिरसं लब्ध्वा
३४ काम्यं क्षम्यं हरिस्पर्शात्
३५ निष्कामाश्चतुर्विधाः

(८)

३६ शुभं शनैः संचिनुयात्
३७ मृति-स्मृतिः शुद्धये
३८ तद्भाव-भावितः
३९ संनद्धश्च
४० आ प्रायणात्

(९)

४१ प्रात्यक्षिकी
४२ सुसुखं कर्तुम्
४३ अधिकार-सामान्यात्
४४ समर्पणेन योगः
४५ क्रियाविशेषानपेक्षः
४६ व्यापकत्वात्
४७ अकुतोभयम्
४८ स्वल्पेनापि

(१०)

४९ क्रमेण प्रतिपत्तिः
५० स्थूलात् सूक्ष्मं प्रपद्ये
५१ मानुषं सौम्यम्
५२ सृष्टौ रम्यम्

५३ प्राणिषु चिन्तनम्
५४ दुरात्मसु चिन्त्य तदेव

(११)

५५ कृत्स्नं न कामयेत
५६ अंशोऽपि समावेशात्
५७ अनधिकृतत्वाच्च
५८ मत्कर्मादौ तात्पर्यम्

(१२)

५९ ऐकाग्र्यं च समग्रं च
६० तुल्यं तु
६१ सगुणं साधकं देहभृत
६२ बाधकं तदप्यमर्यादम
६३ बोध्यं रामानुजयोर् दृष्टान्तेन
६४ कृष्णसखयोश्च
६५ आत्मप्रतीतेरभेदं
६६ अमृतं पर्युपास्यम्

(१३)

६७ शरीरात् प्रवृहेत्
६८ अन्यथा संस्कारासंभव
६९ क्लिष्ट-जीवितं च
७० महावाक्यमनुचिंतयेत्
७१ ततः शासनमुक्ति
७२ आत्मशक्तेर् भानात्
७३ आविः सन्निहिततरम्
७४ विशल्या

(१४)

७५ प्रकृतिः शोध्या
७६ श्रम-संजात-वारिणा
७७ यन्ति प्रमादमतन्द्रा
७८ वेगस्य शमनं स्वधर्मेण
७९ स्वाभाविकत्वात्
८० सत्त्वस्य सत्त्वेन
८१ भक्त्यैव तु निस्तार

(१५)

८२ पुरुषकाराद् भक्तिरभिन्ना
८३ तया स सुकर
८४ नैतं सेवार्थम्
८५ सैव भक्तिरनहंकृता चेत्
८६ ज्ञानं समरसम्
८७ अत्र वेदार्थः परिसमाप्त

(१६)

८८ अेषा दिवो दुहिता
८९ सदसतो पस्पृधाते
९० चतुष्पर्वाण्युत्तरोत्तरम्
९१ अपूर्वं मानवस्य
९२ स्वाम्यादि परिहरेत्
९३ शास्त्रीय-संयमेन

(१७)

९४ संयतेन स्वैरम्
९५ तदर्थं त्रिविधी

९६ सात्विकं संपादयेत्
९७ आहार-शुद्धौ
९८ सर्वेषामविरोधेन
९९ नाम्ना साद्‌गुण्यम्
१०० तद्धि पापापहारि

(१८)

१०१ अथातस्त्याग-मीमांसा
१०२ निकषः सार्वभौमः
१०३ क्रियोपरमे वीर्यवत्तरम्
१०४ अनेन स्वधर्मो विवृतः
१०५ अष्टकं भावयेत्
१०६ काष्ठेव निष्ठा
१०७ तुरीयं त्रिकोणम्
१०८ अहं-मुक्तिः शब्दादहं-मुक्तिः शब्दात्

---

## सेवक की प्रार्थना

हे नम्रता के सम्राट् !
दीन भंगी की हीन कुटिया के निवासी !
गंगा, यमुना और ब्रह्मपुत्रा के जलों से सिंचित
इस सुन्दर देश में
तुझे सब जगह खोजने में हमें मदद दे !
हमें ग्रहणशीलता और खुला दिल दे;
तेरी अपनी नम्रता दे;
हिन्दुस्तान की जनता से
एकरूप होने की शक्ति और उत्कंठा दे।
हे भगवन् !
तू तभी मदद के लिए आता है,
जब मनुष्य शून्य बनकर, तेरी शरण लेता है।
हमें वरदान दे,
कि सेवक और मित्र के नाते
जिस जनता की हम सेवा करना चाहते हैं,
उससे कभी अलग न पड़ जायें।
हमें त्याग, भक्ति और नम्रता की मूर्ति बना,
ताकि--इस देश को हम ज्यादा समझें
और ज्यादा चाहें।

—गांधीजी